


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




# नवी क्षितिजे

अंक ५५ – २००२

**संपादक**
श्री. नाना जोशी

**रचना**
हर्मिष देव्हारे

**अक्षरजुळणी**
अभिजित पंडित

**मुद्रण व्यवस्था**
संतोष राणे
शारदा ऑफसेट, ठाणे.

**मुखपृष्ठ छपाई**
स्क्रिन आर्टस्, ठाणे.

**मालक, मुद्रक, प्रकाशक आणि पत्रव्यवहार**
श्री. नाना जोशी
४ अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२.

## अनुक्रमणिका



**नवी क्षितिजे संबंधी**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १५०/-
* ५३, ५४, ५५ व ५६ अशा चार अंकांची किंमत रु. २०१
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १७० ते १७५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणारे नाही. थोडक्यात ५० या अंकासाठी वर्गणी पाठवल्यास ४९ व्या अंकापासूनच अंक पाठविण्यात येईल.

अनुक्रमणिका



## संपादकीय

नवी क्षितिजेचा ५५ वा अंक या अंकात **डॉ. पॉल डिरॅक** या फारशा प्रसिद्ध नसलेल्या एका महान संशोधकाबद्दल सौ. सुमती जोशी यांनी फार परिश्रम घेऊन तयार केलेले लेख आहे. तो वाचकांच्या पसंतीस उतरेल याबद्दल मला खात्री आहे. नोबेल पारितोषिक विजते प्रख्यात शास्त्रज्ञ **नील्स बोर** यांनी **डॉ. पॉल डिरॅक** यांच्याबद्दल पुढील उद्गार काढले होते. "Of all Physcisists DIrac has the Purest soul" (सर्व पदार्थ विज्ञान शास्त्रज्ञात पॉल डिरॅक हेच एकमेव असे कमालीचा शुद्ध आत्मा असलेले शास्त्रज्ञ)

दुसरा लेख श्री. विठ्ठलराव गोठणकरांचा आहे. हा लेख लिहिताना त्यांना नवी क्षितिजेचे एक मान्यवर लेखक व माझे गेल्या काही दशकांचे स्नेही **श्री. ज. द. जोगळेकर** यांचे माझ्या करवी फार अनमोल सहाय्य झालेले आहे. याचा अर्थ त्यात त्रुटी असल्या तर त्याला ते (जोगळेकर) जबाबदार आहेत असा कोणी करून घेऊ नये ही विनंती. हा लेख प्रसिद्ध करताना माझ्या मनात थोडा संदेह होता. तो असण्याचे कारण एकच. या लेखाचा पहिला भाग मूळ लेखक **डॉ. प्रा. रिचर्ड इअटोन** (EATON) यांच्या लेखावरून तयार करण्यात आलेला आहे. प्रा. इअटोन हे इस्लामी इतिहासाचे चांगले जाणकार म्हणून रास्तपणे प्रसिद्ध आहेत. अशा विद्वान माणसाच्या लेखनातील त्रुटी दाखविणारा भाग या लेखाचा दुसरा भाग आहे. श्री. विठ्ठलराव गोठणकरांसारख्या साक्षेपी पण सामान्य वाचकाने त्या दाखविणे हे फारच धाडसाचे आहे. हे मला ठाऊक असूनही हा लेख प्रसिद्ध करण्याचा निर्णय मी घेतला.

तिसरा लेख बडोद्याचे ख्यातनाम नरेश **कै. सयाजीराव महाराज** यांच्यासंबंधी आहे. सयाजीरावानी महाराष्ट्रात आपण ज्या सामाजिक सुधारणांचा उदोउदो करतो त्या सर्व सुधारणा या शतकाच्या सुरवातीच्या काळात केल्या होत्या. इतकेच नव्हे भारताची आधुनिककरणाकडे वाटचाल होण्यास उपयुक्त करतील अशा इतरही अनेक गोष्टी सयाजीराव महाराजांनी केल्या. उदा. मोफत प्राथमिक शिक्षण, बँकेची स्थापना, वाचनालयांची स्थापना व ती व्यवस्थित चालवित यासाठी प्रशिक्षणाची सोय इत्यादी गोष्टी मोठ्या आवर्जून केल्या होत्या. या शिवाय तत्कालीन राष्ट्रीय नेत्यात महाराजांच्या बदल आदराची भावना होती व महाराजांच्या स्वतंत्र्य बाण्याचा ते गौरवही करीत असत. असे आहे तरी महाराष्ट्रातील (तथाकथित) प्रगतीशील विचारवंतानी महाराजांबद्दल आवर्जून लिहिले नाही व त्यांचे नावही आजकाल कोण घेत नाही. हे कां व्हावे? हा प्रश्न माझ्या मनात नेहमीच येतो. त्याचे एक संभाव्य उत्तर माझे मित्र चित्रकार **कै. श्री. द. ग. गोडसे** यांनी माझे आणखी एका स्नेही **श्री. सुनील तांबे** यांच्याबरोबर झालेल्या संभाषणात दिले होते. त्यांचे म्हणणे असे होते की या सर्व सुधारणा **सयाजीराव महाराजांनी** महाराष्ट्राबाहेर बडोद्यात केल्या होत्या म्हणून महाराष्ट्रातील विचारवंतानी त्यांच्याकडे दुर्लक्ष केले. हे विधान वरवर पहाता योग्य आहे असे वाटते पण वस्तुस्थिती काय आहे? वाचनालये, ग्रंथ प्रकाशन यांच्याशी महाराष्ट्रातील

अनुक्रमणिका

विचारवंताचे काही देणे घेणे नाही का? सार्वत्रिक मोफत प्राथमिक शिक्षण, आदिवासी मुलांकरिता सयाजीरावानी आर्थिक पाठिंबा देऊन पुरस्कारलेली वसतीगृहे, स्थापलेली महाविद्यालये, जनतेसाठी बांधलेली रुग्णालये या गोष्टीविषयी महाराष्ट्रातील विचारवंताना काहीच कर्तव्य नव्हते का? म्हणूनच सयाजीराव महाराजांकडे महाराष्ट्रातील विचारवंत यात लाल निशाणी नसलेले (वा तसे निदान सांगणारे) उदारमतवादी, मार्क्सवादी, त्याच्या शाखा व अनेक उपशाखा या लालनिशाणी विचारवंताचा, आणि त्यांचे सहप्रवासी समाविष्ट आहेत) यापैकी कोणाही सयाजीराव महाराजांची पुण्यतिथी साजरी करण्यासाठी आवर्जून पुढाकार घेताना आढळत नाही.

म्हणूनच माझ्या मनातील प्रश्नाचे उत्तर अन्य ठिकाणी शोधावे लागेल. आपणा सर्व भारतीयांच्या मानगुटीवर घट्ट मांड देऊन बसलेल्या जातीव्यवस्थेत कदाचित उत्तर सापडेलही धनंजय कीर यांनी लिहिलेल्या Shahu Chatrapati – A Royal Revolutionary या संबधीचा पुरावा त्या चरित्रातील पानापानावर आढळेल. आपल्यासारख्या सामान्य वाचकास तो सादर केल्याबद्दल आपण कै. धनंजय कीर यांचे सदैव ऋणी राहिले पाहिजे. काय असेल ते असो. श्री. श्रीकृष्ण खोत यांच्या या लेखाने वाचकांच्या विचारास चालना मिळेल व त्यातून या प्रश्नाची उकलही होण्यास मदत होईल.

नवी क्षितिजे अंक अनेक महिन्यांनी प्रसिद्ध होतात याची खंत मलाही आहे. पण मला ज्याच्यावर मात करता येत नाही, अशा अडचणी येत असल्याने मला ही दरम्यानचा काळ मर्यादित करता आलेला नाही. ही वस्तुस्थिती आहे त्याबद्दल क्षमस्व.

**– नाना जोशी**

---

प्राचिन भारताचा इतिहास लिहिण्यासाठी फारच कमी नव्हे जवळजवळ काहीच लिखित स्वरूपाचा पुरावा उपलब्ध नसल्या कारणाने अनेक प्रकारची अनुमाने बसवून त्या इतिहासाची जुळवाजुळव करावी लागते. या संबधात अनेक युरोपीय विद्वानानी फारच मोलाची कामगिरी बजावलेली आहे. त्या पैकी जेम्स प्रिनसेप (James Princep) हे एक. कोलकता येथील ब्रिटिशांच्या टांकसाळीत नाणी पाडण्याकरता जे सोने, चांदी, तांबे वापरले जाते यांत हिण वापरण्यात आले आहे का याचा तपास घेण्यासाठी ते परिक्षक होते. भारताचा इतिहास उलगडून दाखविण्यात अजून तरी ज्याची कोणी बरोबरी केलेली नाही असा एक महत्त्वाचा शोध **जेम्स प्रिनसेप** यांनी इ. स. १८३७ साली लावला. **सांची** येथील महान बुद्ध स्तुपाच्या कठड्यावर तोवर ज्याचा उलगडा झाला नव्हता अशा लिपीतील मजकूरावरून त्यांनी एका अज्ञात लिपीतील दोन मुळाक्षरे ओळखण्याची कामगिरी पार पाडण्यात यश मिळविले. तोवर काही मुळाक्षरांबद्दल अंदाज बांधण्यात आला होता. पण पंडिताना त्याबद्दल खात्री नव्हती. **प्रिनसेप** यांनी D (ड) आणि N (न) ही मुळाक्षरे ओळखली व त्याबद्दल कसलाही संदेह नव्हता. या अगोदर अंदाज म्हणून कां होईना ओळखल्या गेलेल्या 'तात्पुरत्या' मुळाक्षरांत या दोनांची भर घातल्यानंतर त्यातून असे सुचित झाले की

कठड्यावर खोदलेल्या मजकूर **'पाली'** भाषेत आहे. या दोन अगदी पक्केपणे मान्य झालेल्या मुळाक्षरानी ती भाषा 'पाली'च आहे याची खात्री पटली. संस्कृत भाषेतून अनेक 'प्राकृत' भाषांचा उगम झालेला आहे. त्यापैकी **पाली** ही एक. **बुद्धाच्या** काळात पाली भाषा मगध विभागात जनता भाषा होती. **बौद्धानंतर** जे **'बुद्ध-धम्मीय'** प्रमाणित व पवित्र ग्रंथ समजले जातात त्यातील बहुतेक ग्रंथ पाली भाषेतच आहेत. **प्रिनसेप** यांना त्यावेळी त्यांना वाटत असलेल्या संभाव्य 'भाषे'बद्दल प्राप्त झालेली अंर्तभेदी दृष्टी, त्या जोडीला त्या मजकूराच्या लिपीतील जवळजवळ सर्वच मुळाक्षरांची ओळख पक्केपणी पटलेली होती. अशा प्रकारे हत्यारबंद झाल्यानंतर त्यांनी त्या कठड्यावर खोदलेल्या आखिव व रेखीव लिपीला इंग्रजीत 'Pin-man' हे नांव दिले गेले होते. मजकूराचे भाषांतर करण्याचे काम हाती घेतले. **प्रिनसेप** यांनी केलेले भाषांतर हे पहिले भाषांतर होते. त्यांनी सांची स्तुपाच्या कठड्यावर खोदलेल्या व आढळलेल्या तुकड्यांचे भाषांतर केले. या लिपीला **'अशोक ब्रम्ही'** असे नांव मागाहून देण्यात आले. या मजकूरात हा स्तुप उभारणीच्या कामात लागलेल्या दगडांची देणगी दिलेल्या व्यक्तींची नांवे खोदलेली होती. हे काम हातावेगळे केल्यानंतर त्यांनी दुसऱ्या काही स्तुपांच्या ठिकाणी खोदल्या गेलेल्या अधिक 'लांबलचक' मजकुरांचे भाषांतर करण्याचे काम हाती घेतले.

या 'लांबलचक' मजकुरासारख्या मजकुराची अनेक छायाचित्रे हिंदुस्थानातील अनेक भागातून त्यांच्याकडे आली होती. हिंदुस्थानच्या प्राचिन इतिहासाबद्दल दिलचस्पी असणाऱ्या, ओरिसा, गुजरात, अलाहाबाद, दिल्ली या दूरवरच्या भागातील पंडितांकडून त्यांच्याकडे ही छायाचित्रे आली होती. या पंडिताना आपल्याला अज्ञात असलेल्या लिपीतील मजकुराने चांगलेच दिग्मूढ केले होते. गुजरात राज्यातील 'गिरनार' या ठिकाणी खोदलेला मजकूर आढळतो. त्या संबधी **जेम्स टॉड** यांनी लंडन येथील **डब्ल्यू. एच. ॲलन** या प्रकाशन संस्थेने इ. स. १८३९ साली प्रकाशित केलेल्या Travels in Western India या ग्रंथात पुढील विधान केले होते. इ. स. १८२२ या वर्षी **टॉड** हे **गिरनार** येथे होते. त्यांनी हा मजकूर पाहिला आणि आपली प्रतिक्रिया नोंदविला. 'आपल्या विचाराधिन असलेले जे स्मारक आहे ते एका काळ्या Granite दगडाचे म्हणजेच ठिसूळ नाही अशा चांगल्या भरभक्कम दगडांचे स्मारक आहे. हे स्मारक भला मोठ्या छत्रीच्या आकाराचे ग्रानाइट दगडांचे आहे. थोडक्यात वर्णन करावयाचे झाल्यास शरीरावर असणाऱ्या भल्या मोठ्या वाळूका (Wart) सारखे ते आहे. ते जणू जमिनीतून वर आल्यासारखे वाटते. शिवाय हे स्मारक लोखंडी लेखणीने (Iron pen) खोदल्याकारणाने त्याचे रुपांतर लिखित ग्रंथात झाले आहे. या खोदलेल्या मजकुरापैकी काही भाग डोंगराच्या कड्यावर, काही महाकाय खांबावर खोदलेला आहे. या सगळ्यात अनवट गोष्ट म्हणजे या महाद्विपकल्पात हा खोदलेला मजकूर ज्या ठिकाणी आढळला (पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर) त्या सर्व ठिकाणी या मजकुरात वापरलेले शब्दप्रयोग एकच आहेत एवढाच संदेश त्यातून देण्यात येत होता.

**– जॉन के** (John Keay)

---

अनुक्रमणिका

# विज्ञान

## एकलक्षी संशोधक - पॉल डिरॅक

**- सौ. सुमती जोशी**

पुरातन काळापासून माणूस अज्ञाताचा शोध घेत आहे. आपल्या सभोवती घडणाऱ्या नैसर्गिक घटनांमागे कोणती प्रेरकशक्ती काम करते आहे ते मानवाला जाणून घ्यायचे असते. जिज्ञासा हा माणसाचा स्थायीभाव आहे. कसे, का, कुठे, केव्हा, कोणी, कोणती, किती अशी ही कची बाराखडी माणसाला स्वस्थ बसू देत नाही. म्हणूनच माणूस या विश्वाच्या रचनेचे गूढ उकलण्याची धडपड करीत असतो. हा शोध घेत असताना मन, बुद्धी आणि निसर्ग यांचा एक अद्‌भुत पाठशिवणीचा खेळ चालू असतो. प्रत्यक्ष शोध लागण्यापूर्वी संशोधकांना प्रकाश-अंधार, आशा-निराशा यांच्या हिंदोळ्यावर स्वार व्हावे लागते. सापडल्यासारखे वाटत असताना कधी कधी सत्य हातातून निसटते. अशा वेळी मनाची उभारी ठेवून चिकाटीने पुन्हा प्रयत्नांचे शिवधनुष्य पेलावे लागते. अर्थात् एवढ्या परिश्रमानंतर प्रत्यक्ष सत्य गवसल्यावर होणारा आनंद वर्णनातीत असतो. ही सर्व आंदोलने शास्त्रज्ञ स्वत: अनुभवतात. पण खरं पाहिलं असता हे सर्व अनुभव म्हणजे साऱ्या जगाचा अनमोल ठेवा असतो. या सांस्कृतिक ठेव्याचा वेध घेणे, नवनवीन शोधांबद्दलची माहिती करून घेणे म्हणजे मानवाने बुद्धिसामर्थ्याच्या जोरावर मिळवलेल्या नैपुण्याचा परिचय करून घेणे. सर्वसामान्य माणसांना मात्र विज्ञानातील परिभाषा आणि गणितातील सूत्रे, समीकरणे यांची भीती वाटते. एखादी सुंदर कथा, कादंबरी, कविता, समीक्षात्मक लेख माणसे चटकन वाचतात पण विज्ञानलेखनापासून दोन हात दूर राहण्याकडे त्यांचा सामान्यपणे कल असतो. म्हणूनच विज्ञानलेखकांना एक महत्त्वाची भूमिका बजावावी लागते. विज्ञानांतील जटिल सिद्धांत सोपे करून, आकर्षक पद्धतीने मांडणी करून वाचकांपुढे सादर करावे लागतात. किंवहुना सुशिक्षित माणसांचा हात हातात धरून या अनोख्या विश्वाचे दर्शन घडवताना लेखकाला आपले सर्व कसब पणाला लावावे लागते. पण त्याचबरोबर वाचकांनाही विषयाच्या आकलनासाठी 'अवधान देण्याची' कामगिरी पार पाडावी लागते.

पुंजयामिकी-क्वांटम मेकॅनिक्स हा भौतिक शास्त्रातील एक अवघड विषय. आइन्स्टाइन, रुदरफोर्ड, नील्स बोर, मॅक्स प्लँक, श्रॉडिंजर, हाइझेनबर्ग आणि इतरही अनेक नामवंत भौतिकतज्ज्ञांनी या ज्ञानशाखेच्या विकासाला हातभार लावला. **पॉल डिरॅक** यांनी पुंजयामिकीला गणिती समीकरणांचा कणा बहाल केला आणि पुंजविद्युतगतिकी (क्वांटम



अनुक्रमणिका

इलेक्ट्रोडायनॅमिक्स) या नवीन ज्ञानशाखेचा पाया घातला. **पॉल डिरॅक** यांच्यासारखे विज्ञानातील मूलभूत संशोधक एका विशिष्ट देशाचे हित पहात नाहीत. देशकालाच्या मर्यादा ओलांडून ते साऱ्या जगाचे होतात. अखिल मानवजातीला ललामभूत ठरणाऱ्या **पॉल डिरॅक** यांच्या जीवनकार्याचा परिचय करून देण्यासाठी हा लेखप्रपंच.

पॉलचा जन्म ८ ऑगस्ट १९०२ साली इंग्लंडमधील ब्रिस्टल येथे झाला. बालकाच्या जन्मवेळेनुसार आकाशस्थ ग्रहांच्या स्थितीवरून बालकाची कुंडली मांडण्याची आपल्याकडे प्रथा आहे. **आर्थर कोस्लरने** आपल्या आत्मचरित्रात स्वत:च्या जन्मवेळी अवतीभवतीची सामाजिक व राजकीय परिस्थिती कशी होती ती विस्तृतपणे सांगून एक आगळीवेगळी सामाजिक कुंडली वाचकांपुढे ठेवली आहे. त्याच धर्तीवर **पॉल डिरॅक** यांची- आपल्या चरित्रनायकाची कुंडली तयार करायची असल्यास युरोपमध्ये इ. स. १९०२ साली कोणत्या महत्त्वाच्या घटना घडल्या हे पाहणे उचित ठरेल. सुप्रसिद्ध फ्रेंच कादंबरीकार व टीकाकार **झोला** याचा मृत्यू १९०२ साली झाला. साहित्य जगताने खेद करावा अशा या घटनेबरोबर दुसरी **एक** चांगली घटनासुद्धा याच साली घडली. भविष्यात साहित्याचे नोबेल पटकावणाऱ्या **जॉन स्टेईनबॅकचा** जन्म झाला. **शेरलॉक होम्सची** 'दि हाउंड ऑफ बास्करव्हिलास' ही सुप्रसिद्ध रहस्यमय कादंबरी याच वर्षी प्रकाशित झाली. **थ्री सिस्टर्स, दि इम्मॉरॅलिस्ट, 'दि व्हरायटीज** ऑफ **रिलिजियस अेक्सपीरिअन्स'** यासारख्या अजरामर साहित्यकृती याच वेळी लिहिल्या गेल्या. मोनेने 'वॉटर्लू ब्रिज' हे सुप्रसिद्ध पेंटिंग याच वर्षी काढले. **'पॉम्प अँड सर्कमस्टन्स'** हे जागतिक कीर्तीचे काव्यही **अेल्गारने** १९०२ सालीच लिहले. युरोपमध्ये साहित्य व कला जगतात अशा प्रकारच्या घटना घडत असताना विज्ञान जगतात कोणते शोध लागत होते ते पाहू. किरणोत्सारी मूलद्रव्यांच्या रूपांतराचा सिद्धांत **रुदरफर्ड** आणि **सॉडी** यांनी प्रकाशित केला. युरेनियम आणि थोरियम या मूलद्रव्यांचा ऱ्हास झाला की नवनवीन किरणोत्सर्गी द्रव्यांची एक मालिकाच निर्माण होते हे त्या दोघांनी दाखवून दिले. सापेक्षतावादाचा सिद्धान्त जगाला सांगणाऱ्या **आइन्स्टाइनने** याच वर्षी बर्नमधील पेटंट ऑफिसमध्ये कारकून म्हणून काम करण्यास सुरुवात केली. पृथ्वीवरील वातावरणाचे ट्रोपोस्फीअर, स्ट्रॅटोस्फीअर, आयनोस्फीअर असे भाग पडतात हे शास्त्रज्ञांनी दाखवून दिले. रेडियमचे आण्विक वस्तुमान (ॲटॉमिक वेट) २२५.९३ इतके असते हे **मारी क्युरीने** सिद्ध केले. **विलिस कॅरिअर** या तंत्रज्ञाने पहिले वातानुकल करणारे यंत्र 'अेअर कंडिशनर' बनवले. याच वर्षी **चार्लस् डिरॅक** आणि ब्रिटिश नौदलकमानकन्या **फ्लॉरेन्स होल्टन** या दांपत्याला पुत्ररत्न झाले. वैज्ञानिक जगतात आपल्या अभूतपूर्व कार्याचा ठसा उमटविणाऱ्या **पॉलचा** जीवनप्रवास येथून सुरू झाला.

विशप रोड प्राथमिक शाळेत लहानग्या **पॉलने** आपल्या शिक्षणाचा श्रीगणेशा केला. शाळेत एक हुशार विद्यार्थी म्हणून **पॉल** प्रसिद्ध होता. गणितामध्ये पॉलला विशेष गती होती.

**पॉलचा** भाऊ **रेजिनाल्ड** पॉलपेक्षा दोन वर्षांनी मोठा होता. **'बिट्रीस'** ही पॉलची धाकटी बहिण. ती पॉलपेक्षा चार वर्षांनी लहान होती. **पॉलचे** वडिल स्विस होते तर आई ब्रिटिश ! त्यामुळे मुलांची स्विस नागरिक म्हणून नोंदणी झाली; पण मुले इंग्लंडमध्येच लहानाची मोठी झाली. **पॉलच्या** वडिलांचा स्वभाव रागीट होता. शिस्तीलाही ते फार कडक होते. पॉलचे वडिल इंग्लंडमध्ये शिक्षक होते. ते फ्रेंच शिकवीत असत. लहानपणाची एक आठवण **पॉलने** स्वत: लिहून ठेवली आहे.

वडिल फ्रेंचचे शिक्षक असल्यामुळे आपल्या मुलांना व्याकरणदृष्ट्या बिनचूक फ्रेंच बोलता आले पाहिजे असे त्यांना वाटत होते आणि ते स्वाभाविक होते. परंतु त्यासाठी त्यांनी शोधलेला उपाय मात्र चुकीचा ठरला. **'पॉलने** माझ्याशी फ्रेंचमध्ये बोलले पाहिजे' असा फतवा त्यांनी काढला. परंतु "आपले विचार या परभाषेत परिणामकारकतेने व्यक्त करता येत नाहीत म्हणून काहीतरी बोलण्यापेक्षा गप्प बसलेले बरे" असा विचार करून छोटा **पॉल** मौन धारण करून घरात वावरू लागला. **पॉल** स्वभावत:च अबोल होता की कोवळ्या वयातील या अनुभवामुळे तो मितभाषी झाला हे सांगणे कठिण असले तरी पुढील जीवनात शांत, विचारी आणि अबोल अशीच **पॉलची** प्रतिमा झाली हे मात्र खरे !

सर्वसामान्यपणे शालेय जीवनात मुलामुलींचा मित्रपरिवार असतो. कित्येकदा कोवळ्या वयात झालेल्या मैत्रीचे बंध मोठ्या वयातही टिकतात. किंबहुना अनेकदा ते बंध रक्ताच्या नात्यांपेक्षा अधिक जवळचे, प्रेमाचे आणि दृढ असतात. पण **पॉलला** शालेय जीवनात कोणीही मित्र नव्हते. **पॉलने** स्वत: सांगितलेली लहानपणातील आणखी एक आठवण त्याच्या वडिलांच्या कडक स्वभावाची आणि कंजुषपणाची ओळख करून देणारी आहे. **पॉल** म्हणतो, "वर्षातून एकदा माझे आईवडिल मुख्याध्यापकांतर्फे देण्यात येणाऱ्या मेजवानीला हजर राहात असत. तसेच महिन्यातून एकदा माझ्या आईच्या मैत्रिणी चहापानाला आमच्या घरी येत असत. एकदा आई आणि मी बाहेर गेलो होतो. "चल **पॉल,** आज आपण मजा करू या" आई म्हणाली, मीही खुश झालो." तुला बोटीत बसायला आवडेल की प्राणीसंग्रहाला भेट द्यायला?" असे आईने विचारल्यावर मी चटकन प्राणीसंग्रहालयाची निवड केली. आम्ही खूप मजा केली. पण घरी जाताना आईने मला बजावले की ही गोष्ट वडिलांना सांगायची नाही. कारण त्यांच्या दृष्टीने ही 'उधळपट्टी' ठरली असती. पण योगायोगाने त्या वर्षी परिक्षेत निबंधाला विषय आला "प्राणीसंग्रहालयाला भेट." अर्थातच **पॉलने** उत्कृष्ट निबंध लिहिला. वडिलांनी ताबडतोब विचारले, "तू प्राणीसंग्रहालय बघितले नसताना तू हा निबंध कसा लिहिलास?" **पॉल** म्हणतो, "त्यावेळी मी काहीतरी सांगून स्वत:ची सुटका करून घेतली."

वयाच्या बाराव्या वर्षी **पॉलने** मर्चंट्स् व्हेंचर्स टेक्निकल कॉलेजमध्ये प्रवेश केला. मातृभाषा (इंग्लिश) सोडून अन्य भाषा शिकण्याची **पॉलला** एकंदरीत फारशी आवड

नसावी. ''या शाळेत ग्रीक आणि लॅटिन या भाषांचा अभ्यासक्रम नसल्यामुळे मी खुश होतो' असे **पॉलने** नमूद केले आहे. सॉकर आणि क्रिकेट यासारखे खेळ **पॉल** खेळत असे. परंतु खेळातही **पॉलला** फारसे यश मिळवता आले नाही. या शाळेत विज्ञान शिक्षणाची उत्तम सोय होती. येथील शिक्षकांनी **पॉलची** विज्ञानाची आवड वृद्धिंगत केली. या अबोल विचारी मुलाची जिज्ञासा जागृत करणारे आणि विचारांना व अभ्यासाला योग्य दिशा देणारे शिक्षक **पॉलला** टेक्निकल कॉलेजमध्ये लाभले.

१९१८ साली वडिलांच्या सांगण्यावरून **पॉलने** ब्रिस्टॉल विश्वविद्यालयात इलेक्ट्रिकल इंजिनिअरिंगच्या अभ्यासास सुरुवात केली आणि १९२१ साली आपले शिक्षण पूर्ण केले. पुढील जीवनात **पॉलने** 'इलेक्ट्रिकल इंजिनिअर' या आपल्या पदवीशी निगडित असलेला व्यवसाय कधीच निवडला नाही. पण आयुष्यातील हे तीन वर्षाचे शिक्षण नक्कीच व्यर्थ झाले नाही. या शिक्षणामुळे आपला काय फायदा झाला हे पुढे **पॉलने** लिहून ठेवले आहे. **पॉल** म्हणतो, ''या शिक्षणामुळे माझ्या दृष्टीकोनात आमूलाग्र बदल झाला. हे शिक्षण घेण्यापूर्वी मला तंतोतंत जुळणाऱ्या समीकरणात विशेष रस वाटत असे. किंबहुना समीकरणे ही तंतोतंत जुळलीच पाहिजेच असा माझा हट्ट असे. परंतु अदमासे जुळणाऱ्या गणिताच्या राशी व्यवहारात चालवून घ्याव्या लागतात हे मला या शिक्षणामुळे समजले. अदमासावर आधारलेल्या सिद्धान्तातसुद्धा कधी कधी फार मोठा अर्थ दडलेला असतो असे मला जाणवले. या शिक्षणामुळेच पुढील जीवनात मला वेगळ्या प्रकारचे यशस्वी संशोधन करता आले. माझ्या संशोधनात स्थापत्यशास्त्रातील गणिती सिद्धान्ताचा उपयोग मी करत राहिलो. माझ्या सर्व लेखनात अशा प्रकारच्या गणिताचा उल्लेख नेहमीच येतो. **आपला सर्व अभ्यास तंतोतंत जुळणाऱ्या समीकरणांवर आधारित असला पाहिजे''** असे एखाद्या शास्त्रज्ञाने ठरविले तर त्याला भौतिकशास्त्रात फारशी प्रगती करता येणार नाही.''

**पॉल डिरॅक** यांनी अभ्यास करण्याच्या स्वत:च्या पद्धतीचे सविस्तर विवेचन आपल्या लेखनात केले आहे. आठवड्याचे सहा दिवस भरपूर वाचन आणि चिंतन व रविवारी भरपूर भ्रमण ! दूरवर मोकळ्या रस्त्यावर एकट्यानेच फिरायला जायला आवडत असे. डोंगराळ प्रदेशात फिरून नैसर्गिक सौंदर्याचा आस्वाद घेतांना ते हरखून जात. केंब्रिजजवळच्या गॉग-मॅगॉग टेकड्यांवर ते नेहमी फिरायला जात असत. उंच डोंगरमाथ्यावर चढण्याची त्यांना हौस होती. आल्प्स, कॉकेशस यामधील शिखरे त्यांनी पादाक्रांत केली होती. मोकळ्या वातावरणात त्यांच्या चित्तवृत्ती उल्हसित होत अशा वेळी त्यांचे चिंतनही अधिक सघन होई!

**पॉलने** हा अभ्यासक्रम पूर्ण केला तेव्हा पहिल्या महायुद्धातून जग नुकतेच बाहेर येत होते. युद्धाची झळ पोचलेली माणसे कंटाळली होती. नेमक्या याच वेळेस आइन्स्टाइनचा सापेक्षतावादाचा सिद्धान्त जगापुढे आला. **पॉल**सारख्या बुद्धिजीवी, हुशार भौतिकतज्ज्ञांना त्या सिद्धान्ताने पूर्णपणे घेरले. त्याच्या बुद्धीला एक आगळे आव्हान मिळाले. शालेय जीवनापासून

**पॉलला** अवकाश आणि काळ या दोहोंविषयी विलक्षण ओढ होती. त्यांच्या परस्परसंबंधावर **पॉलने** खूप विचार केला होता. "काळ ही एक स्वतंत्र मिती आहे. अवकाश आणि काळ यामध्ये काही संबंध असण्याची शक्यता आहे. चार मिती म्हणून अवकाश आणि काळ यांचा विचार करावयास हवा." असे **पॉलला** वाटत होते. परंतु शालेय जीवनात **पॉलला** फक्त युक्लीडची भूमिती माहित असल्यामुळे त्याला त्या दिशेने स्वतंत्र विचार करता आला नाही. इंजिनिअरिंगची पदवी प्राप्त केल्यावर **पॉलने** नोकरी शोधण्याचा प्रयत्न केला. परंतु तो निष्फळ ठरला. नेमक्या त्याचवेळी सुदैवाने ब्रिस्टल महाविद्यालयात गणित शिकण्याची सुसंधी **पॉलला** मिळाली. विशेष म्हणजे **पॉलला** शिष्यवृत्ती मिळाल्यामुळे हे सर्व शिक्षण विनामूल्य होणार होते. **पॉलने** या संधीचा पुरेपूर फायदा घेतला. गणितासारख्या सर्वसामान्यांना अवघड वाटणाऱ्या विषयाचा सखोल अभ्यास येथे **पॉलने** केला. ही **डिरॅकच्या** वैज्ञानिक कारकीर्दीची नांदी ठरली.

केंब्रिज ही इंग्लंडमधील प्रख्यात शैक्षणिक संस्था. इ. स. १२०९ मध्ये ऑक्सफर्डमधले काही विद्यार्थी केंब्रिजमध्ये गेले. इ. स. १२३० साली केंब्रिज विद्यापीठाची स्थापना झाली. सात शतकांचा इतिहास असलेल्या या विद्यापीठात आज एकूण एकतीस वेगवेगळी कॉलेजेस मोठ्या दिमाखाने उभी आहेत. सुरुवातीला केंब्रिजमध्ये महिलांना प्रवेश नव्हता. पण दुसऱ्या महायुद्धानंतर १९४८ साली केंब्रिजमध्ये महिलांसाठी कॉलेज सुरु झाले. उशीरा का होईना पण ज्ञानाची दालने स्त्रियांना खुली झाली. जगभरातील अगणित प्रज्ञावान विद्यार्थ्यांनी केंब्रिजमध्ये ज्ञानग्रहण केले आहे. आणि अनेक ज्ञानशाखांमधील क्रांतीकारक शोध केंब्रिजमधील दिग्गजानी लावले आहेत. केंब्रिज, ऑक्सफर्डसारखी विद्यापीठे म्हणजे ज्ञानाच्या आदानप्रदानाची प्रमुख केंद्रे. अशा 'ज्ञाननिष्ठांची मांदियाळी' असलेल्या केंब्रिजमध्ये **पॉलने** इ. स. १९२३ साली प्रवेश केला. येथे संशोधन करण्यासाठी **पॉलला** वैज्ञानिक आणि औद्योगिक संस्थांतर्फे शिष्यवृत्ती मिळाली होती. येथेच **पॉल डिरॅक** यांच्या कारकीर्दीची मुहूर्तमेढ रोवली गेली.

**पॉल डिरॅक** यांनी पुंजयामिकीला किती महत्त्वाचे योगदान दिले आणि पुंजविद्युतगतिकीचा प्रारंभ करण्यास कसा हातभार लावला हे समजण्यासाठी अणुरचनेविषयीची प्राथमिक माहिती वाचकांना असणे आवश्यक आहे. तसेच प्रकाशकिरणांचे खरे स्वरूप काय आहे हे शोधण्याच्या शास्त्रज्ञांच्या प्रयत्नांचे आकलन झाल्यास **पॉल डिरॅक** यांचे कार्य समजणे सुलभ होईल, म्हणून या विषयाचा थोडक्यात परिचय आधी करून घेऊ या.

**गॅलिलिओ, न्यूटन आणि यामिकी (मेकॅनिक्स)**

**गॅलिलिओ गलेली** (१५६४ ते १६४२) या इटालियन भौतिकज्ञाने भौतिकशास्त्राला गणितीय रूप दिले. त्याने लंबकाचे नियम प्रस्थापित केले. उंचावरून पडणाऱ्या वस्तूचे गतिविषयक नियमही गॅलिलिओने सांगितले. दुर्बिणीतून आकाश निरीक्षण करून सूर्यकेंद्रित



अनुक्रमणिका

विश्वाची कल्पना सांगून तत्कालिन धर्ममार्तंडांचा रोष ओढवून घेतला. त्यानंतर **रेने देकार्तने** आधुनिक गणिताचे मूलभूत तंत्रज्ञान विकसित केले. 'हे विश्व म्हणजे एक यंत्र आहे.' असे **देकार्त** म्हणत असे. **आयझॅक न्यूटनने** हे मोठे यंत्र कोणत्या नियमानुसार चालते ते नियम जगापुढे मांडले.

आयझॅक न्यूटनने (१६४२ ते १७२७) अभिजात भौतिकशास्त्राचा पाया घातला. नैसर्गिक घटनांची कारणमीमांसा निवडक सिद्धांताद्वारे गणिताच्या रूपाने करता येते हे न्यूटनच्या सिद्धांतावरून प्रथम निदर्शनास आले. एकोणिसाव्या शतकापर्यंत विकसित झालेले तंत्रज्ञान हे मूलत: न्यूटनच्या अभिजात भौतिकशास्त्रावर आधारित होते. या काळापर्यंत निर्माण झालेली हरतऱ्हेची यंत्रे, त्यांची जोडणी, त्या यंत्रांचे कार्य इत्यादि बाबतीतील सर्व प्रश्नांची समाधानकारक उत्तरे न्यूटोनियन यामिकी व भौतिकीच्या आधारे देता येत होती. न्यूटन हा एकांडा शिलेदार होता. आपले गतिविषयक नियम प्रस्थापित करण्यासाठी लागणारे अनेक छोटे मोठे प्रयोग तो एकटाच करीत असे. गणित हा भौतिकशास्त्राचा 'कणा' आहे याची न्यूटनला जाणीव होती. आपल्या गतिविषयक नियमाना गणितीय आधार देण्यासाठी त्याने स्वत:च 'कॅलक्युलस' ही गणितीय पद्धती विकसित केली आणि आपल्या सिद्धान्ताला गणितीय प्रमाण बहाल केले.

प्रकाश किरणांचे स्वरूप काय आहे. प्रकाश किरण कशाचा बनलेला आहे हा वर्षानुवर्षे मानवाला पडलेला गहन प्रश्न होता. भौतिकतज्ज्ञांच्या दृष्टीने 'प्रकाश' हा कुतूहलाचा विषय होता. न्यूटनने प्रयोगाच्या सहाय्याने त्याचे उत्तर देण्याचा प्रयत्न केला होता. प्रकाश किरण सरळ रेषेत प्रवास करतो. म्हणून प्रकाशाचे खरे स्वरूप बंदुकीच्या गोळ्यांसारखे म्हणजेच सुट्या कणांसारखे असले पाहिजे असे न्यूटनचे मत होते. डच शास्त्रज्ञ **हायझेन्स** (Hiygens) हा न्यूटनचा समकालीन (१६२९ ते ९५). प्रकाश कणरूप आहे की तरंगरूप हा प्रश्न सतराव्या शतकात हायझेन्सने उपस्थित केला. व्यतीकरण (इंटरफिअरन्म), विवर्तन (डिफ्रॅक्शन) आणि ध्रुवीकरण (पोलारायझेशन) हे लहरींचे गुणधर्म आहेत. प्रकाशकिरण कोठल्याही सूक्ष्म छिद्रातून अंधाऱ्या खोलीत सोडला आणि वाटेत एखादा अडथळा आला तर प्रकाशाचे विवर्तन होते हे हायझेन्सने दाखवून दिले. त्यावरून प्रकाशकिरण लहरींच्या स्वरूपात असले पाहिजेत असा निष्कर्ष त्याने काढला. परंतु प्रकाशकिरणांच्या वाटेत अडथळा आला नाही तर प्रकाशकिरण सरळ रेषेत का जातात याचे स्पष्टीकरण हायझेन्सला देता येत नव्हते. याउलट प्रकाशाचे विवर्तन का होते याचा उलगडा न्यूटनला करता येत नव्हता. त्यामुळे प्रकाश कणरूप आहे की तरंगरूप हा प्रश्न अनिर्णित राहिला.

**थॉमस यंग आणि तरंगरूप प्रकाश**

त्यानंतर एक शतकाचा कालावधी लोटला. **थॉमस यंग** या ब्रिटिश शास्त्रज्ञाने पुन्हा एकदा हा प्रश्न धसास लावला. प्रकाशकिरण तरंगरूप असतात हे त्याने सप्रयोग सिद्ध केले. त्याविषयीची माहिती घेण्यापूर्वी लहरींच्या संदर्भातील सर्व संज्ञांचा अर्थ समजावून घेऊ.



अनुक्रमणिका

आकृति क्र. १.




लहरींच्या दोन लागोपाठ येणाऱ्या शिखांमधील अंतराला लहरींची 'तरंगलांबी' (वेव्हलेंग्थ) म्हणतात. शिखा आणि मध्यस्थिती यामधील अंतराला 'आयाम' (ॲम्प्लीट्युड) म्हणतात. प्रत्येक सेकंदात लहरींच्या किती शिखा एखाद्या ठराविक बिंदूच्या पुढे जातात त्याला लहरींची वारंवारता (फ्रिक्वेन्सी) म्हणतात. तरंगलांबी आणि वारंवारता यांचा गुणाकार म्हणजे लहरींचा वेग. येथे आपण प्रकाश लहरींचा विचार करीत आहोत. त्यांचा वेग ३ X $१०^{५}$ कि. मी / सेकंद किंवा ३ X $१०^{८}$ मीटर / सेकंद असा असतो, त्यात बदल होत नाही. म्हणजेच प्रकाश लहरींची वारंवारता जितकी जास्त तितकी तरंगलांबी कमी आणि वारंवारता जितकी कमी तितकी तरंगलांबी जास्त हे ओघाने आलेच.

**थॉमस यंगने** इ. स. १८०३ साली एक साधा प्रयोग केला. त्याने दोन रेखाछिद्रे असलेला पडदा घेतला. त्याच्या एका बाजूने प्रकाशकिरण जाऊ दिले व विरुद्ध बाजूला असलेल्या भिंतीवर मिळणाऱ्या प्रतिमांचे निरीक्षण केले. जेव्हा एकच रेखाछिद्र उघडे होते तेव्हा पडद्यावर एक वर्तुळाकृती प्रकाशित भाग भिंतीवर दिसला. परंतु जेव्हा दोन्ही रेखाछिद्रे उघडली ठेवली तेव्हा भिंतीवर प्रकाश आणि अंधाराचे एकाआड एक पट्टे दिसले. यातील मधला पट्टा सर्वाधिक प्रकाशमान दिसला.

या प्रयोगाचे स्पष्टीकरण देण्यासाठी व्यवहारातले एक सोपे उदाहरण घेऊ या. एखाद्या डबक्यात थोड्या अंतरावर एकाच वेळी दोन दगड टाकले तर दोन्ही दगडांमुळे पाण्याच्या पृष्ठभागावर लहरी निर्माण होतात. पण त्या लहरी एकमेकांमध्ये व्यत्यय (इंटरफिअरन्स) आणतात. जेव्हा दोन्ही लहरींच्या शिखा अथवा द्रोणी एकत्र होतात तेव्हा एक मोठी लहर



अनुक्रमणिका

तयार होते. याउलट जेव्हा एका लहरीच्या शिखा व दुसऱ्या लहरीच्या द्रोणी एकत्र होतात तेव्हा पाण्याचा पृष्ठभाग सपाट होतो. **यंगच्या** प्रयोगात दोन रेखाछिद्रातून निर्माण होणाऱ्या लहरींच्या शिखा अथवा द्रोणी एकत्र येतात तेव्हा तो भाग अधिक प्रकाशमान दिसतो. याउलट एका रेखाछिद्रातील लहरींच्या शिखा दुसऱ्या रेखाछिद्रातील लहरींच्या द्रोणीशी एकत्रित होतात तेव्हा तो भाग अंधारा दिसतो. प्रकाशाच्या व्यतीकरणामुळेच प्रकाश व अंधाराचे एकाआड एक पट्टे दिसतात. 'व्यतीकरण' फक्त लहरींमध्येच घडून येते; यावरून 'प्रकाशकिरण लहरीस्वरूप असतात' असे यंगने सांगितले.

इ. स. एकोणीसशेच्या सुमारास सुप्रसिद्ध वैज्ञानिक **आल्बर्ट आइन्स्टाइन** हे प्रकाशविद्युती (फोटोइलेक्ट्रिक) परिणामांचा सैद्धांतिक अभ्यास करत होते. प्रकाशाचे खरे स्वरूप काय आहे याचा शोध त्यांनाही घ्यायचा होता. धातूच्या पत्र्याच्या पृष्ठभागावर प्रकाशकिरणांचा मारा केला की त्यातून इलेक्ट्रॉन्स बाहेर पडतात हे त्यांनी पाहिले होते. परंतु असे का होते याचे स्पष्टीकरण मात्र त्यांना देता येत नव्हते.

**मॅक्स प्लँक आणि पुंजभौतिकी -**

इ. स. १९०० साली **मॅक्स प्लँक** हे जर्मन भौतिकतज्ज्ञ कृष्णवर्णी पदार्थातील (ब्लॅक बॉडीज) उत्सर्जनाचा अभ्यास करत होते. जो पदार्थ सर्व प्रकारच्या विद्युतचुंबकीय लहरी शोषून घेतो किंवा उत्सर्जित करू शकतो अशा पदार्थाला भौतिकशास्त्रात 'परिपूर्ण कृष्णवर्णीय पदार्थ' म्हणतात. एखादा धातूचा पत्रा तापवला तर तो लाल रंगाने उजळून निघतो. एकोणिसशे सालापर्यंत भौतिकतज्ज्ञांना अणुरचनेची फारशी कल्पना नव्हती. तापलेल्या पदार्थामधून ऊर्जा सातत्याने उत्सर्जित होते आणि ऊर्जेचा साठा संपेपर्यंत ही प्रक्रिया चालू राहते असे त्यांना वाटत होते. परंतु **मॅक्स प्लँकने** या कल्पनेला जबरदस्त धक्का दिला. उत्तेजित झालेले अणु काही विशिष्ट प्रमाणातच ऊर्जा उत्सर्जित करतात. ही प्रक्रिया सातत्याने न होता टप्प्याटप्प्याने होते. 'ऊर्जा खंडित पुंजाच्या स्वरूपात उत्सर्जित होते' ही शक्तीपुंजाची संकल्पना **मॅक्स प्लँकनी** प्रथमच शास्त्रीय जगतापुढे मांडली. या शक्तिपुंजालाच **मॅक्स प्लँकने** 'क्वांटम' (पुंज) असे नाव दिले. **प्लँकच्या** या सिद्धान्तामुळे भौतिकशास्त्राचा मूळ पायाच बदलला. **प्लँक** हा 'पुंजयुगाचा जनक' ठरला. त्यामुळेच भौतिकशास्त्राचे अभिजात (क्लासिकल) भौतिकशास्त्र आणि आधुनिक (मॉडर्न) भौतिकशास्त्र असे दोन भाग पडले. तसेच आपल्या सिद्धान्ताचे गणिती स्पष्टीकरण देताना **प्लँकला** एका स्थिरांकाचा शोध लागला. तो स्थिरांक एच् (h) या अक्षराने दर्शविला जातो. त्याचे माप ६.६३ x १०$^{-३४}$ ज्यूल / सेकंद अशी असते. यालाच **प्लँकचा** स्थिरांक असे म्हणतात.

एखाद्या विशिष्ट रंगाच्या प्रकाशाच्या प्रत्येक पुंजातील ऊर्जा सारखीच असते. तसेच जांभळ्या रंगाची अधिक संख्येची वारंवारता (फ्रिकवेन्सी) असलेल्या प्रकाशकिरणातील पुंजात अधिक ऊर्जा असते आणि लाल रंगाच्या कमी वारंवारता असलेल्या प्रकाश-किरणातील पुंज कमी ऊर्जेचे असतात. म्हणूनच एखाद्या धातूला उष्णता दिल्यावर तो प्रथम



अनुक्रमणिका

लाल रंगाने उजळतो आणि अधिक उष्णता दिल्यास त्यातून निळसर जांभळ्या रंगाचे प्रकाशकिरण उत्सर्जित होतात.

**आइन्स्टाइन आणि फोटॉन -**

वर नमूद केल्याप्रमाणे प्रकाशविद्युत परिणामांच्या सहाय्याने **आइन्स्टाइन** प्रकाशकिरण तरंगरूप आहेत की कणरूप याचा शोध घेत होते. **मॅक्स प्लँकच्या** पुंजसिद्धान्तामुळे **आइन्स्टाइनच्या** संशोधनाला भक्कम आधार मिळाला. **प्लँकच्या** पुंजभौतिकीनंतर लगेचच म्हणजे १९०५ साली **आइन्स्टाइन** यांनी तीन शोधनिबंध प्रकाशित केले. यातील दुसरा शोधनिबंध प्रकाशविद्युत परिणामांच्या सखोल अभ्यासातून लिहिला होता. प्रकाशकिरण हा सूक्ष्म कणांचा बनलेला असून तो बंदुकीच्या गोळ्यांच्या मालिकेसारखा असतो. या प्रत्येक कणाला 'फोटॉन' म्हणू या असे **आइन्स्टाइन** यांनी सांगितले. हे फोटॉन कण जेव्हा धातूच्या पृष्ठभागावर आदळतात तेव्हा ते आपली ऊर्जा मुक्त इलेक्ट्रॉन वीजकांच्या कणांना देतात. ही ऊर्जा मिळाल्यावर इलेक्ट्रॉन उत्सर्जित होतात. म्हणजे फोटॉनमुळे इलेक्ट्रॉन वीजक स्थानभ्रष्ट होतो. याच संशोधनाकरिता **आइन्स्टाइन** यांना १९२१ सालचे भौतिकशास्त्राचे नोबेल पारितोषिक देण्यात आले.

**पुंजयामिकी या नवीन ज्ञानशाखेबद्दल आइन्स्टाइन म्हणतात,**

"जुने कोठार नष्ट करून त्याजागी गगनचुंबी इमारत उभी करावी असा अर्थ नवीन सिद्धान्त निर्माण करण्यात अभिप्रेत नसतो. उलट एखाद्या उंच डोंगरावर चढावे, भोवतालच्या परिसराचे अधिक विस्ताराने दर्शन घ्यावे, प्रारंभबिंदू आणि परिसर यामध्ये अनपेक्षितपणे काही संबंध सापडावेत अशा प्रकारचा अनुभव नवीन सिद्धान्त प्रस्थापित करताना येतो. ज्या स्थानापासून आपण डोंगर चढायला सुरुवात केली त्या स्थानाचे अस्तित्व अबाधित असते, इतकेच नव्हे तर वर चढल्यावर ते स्थान पाहता येते. फक्त उंचावरून पाहात असल्यामुळे ते स्थान लहान असल्याचा भास होतो. शिवाय वरून दिसणाऱ्या विशाल प्रदेशाचा तो एक छोटासा भाग असतो." **आइन्स्टाइन** यांच्या या रूपकामुळे अभिजात आणि आधुनिक भौतिकशास्त्राच्या परस्परसंबंधाची आपल्याला उकल होते.

**इलेक्ट्रॉन, प्रोटॉन आणि न्यूट्रॉन - (वीजक, धानक, वस्तुक)**

प्रकाशाचे खरे स्वरूप काय आहे याचा शोध घेता घेता शास्त्रज्ञ पुंजभौतिकीपर्यंत कसे येऊन पोचले ते आपण थोडक्यात पाहिले. एकीकडे हा शोध घेत असता शास्त्रज्ञ दुसऱ्या एका गहन प्रश्नाची उकल करण्यात व्यग्र होते. पदार्थ (मॅटर) कशाचे बनलेले असतात हे त्यांना समजून घ्यायचे होते. त्यांना मूलद्रव्यांचा शोध लागला. पण ही मूलद्रव्ये कशाची बनलेली असतात हा प्रश्न सोडवला डाल्टनने. **डाल्टन** (१७६६-१८४४) हा ब्रिटिश रसायनशास्त्रज्ञ. तो आधुनिक अणुसिद्धांताचा जनक. सर्व मूलद्रव्ये अत्यंत छोट्या कणांची बनलेली असतात. त्या सूक्ष्म कणांना 'ॲटम-अणू' असे नाव दिले. भारतात कणादाने हीच गोष्ट सांगितली होती. अणु अभेद्य आहे. त्याचे पृथ:करण करता येत नाही हे **डाल्टनचे** मत



अनुक्रमणिका

एकोणिसाव्या शतकापर्यंत सर्वांनाच मान्य होते. पण १८९७ साली **जे. जे. थॉम्प्सन** या ब्रिटिश शास्त्रज्ञांनी हे मत चुकीचे आहे हे सिद्ध केले. कोणत्याही पदार्थाच्या अणुमध्ये ऋणभारित इलेक्ट्रॉन्स (वीजक) असताना हे त्यांनी सिद्ध केले. अणुरचनेविषयी त्यांनी आपला अंदाज वर्तवला होता. त्या रचनेला प्लम पुडिंग रचना म्हणतात. अणु म्हणजे जवळ जवळ $१०^{-१०}$ मी. त्रिज्येचा धनभारित गोलक असतो. कलिंगडात ज्याप्रमाणे बिया पसरलेल्या असतात त्याप्रमाणे त्या धनभारित गोलकात कांही विशिष्ट जागी इलेक्ट्रॉन्स (वीजक) विखुरलेले असतात असे थॉम्प्सन यांनी सुचविले. या संकल्पनेसाठी १९०६ सालचे नोबेल पारितोषिक **जे. जे. थॉम्प्सन** यांना देण्यात आले.

अणुच्या केंद्रकाचा आणि धनभारित प्रोटॉन्सचा (धानकाचा) शोध लावण्याचे श्रेय जाते, **सर अर्नेस्ट रुदरफोर्ड** (१८७१-१९३७) यांच्याकडे. हे मूळचे न्यूझीलंडचे रहिवासी. पण त्यांची कर्मभूमी होती ब्रिटन. **जे. जे. थॉम्प्सन** यांच्या मार्गदर्शनाखाली **रुदरफोर्डने** किरणोत्सर्जनावर संशोधन केले. हेलियम या मूलद्रव्याच्या अणुमधील इलेक्ट्रॉन्स (वीजक) काढले तर त्याच्या केंद्रात धनभारित प्रोटॉन्स (धानक) आणि न्यूट्रॉन्स (वस्तुक) उरतात. अशा हेलियमच्या केद्रकापासून निघणाऱ्या किरणोत्सर्गाला अल्फा कण म्हणतात. हे अल्फा कण धातुच्या अत्यंत पातळ पडद्यावर आदळले तर ते इतस्तत: विखुरतात याचे **रुदरफोर्डला** विलक्षण आश्चर्य वाटले. प्लम पुडिंग मॉडेलमध्ये सुचविल्याप्रमाण धनभारित कण सगळीकडे पसरले असते तर अल्फा कण असे इतस्तत: विखुरले गेले नसते. धनभारित अल्फा कण आरपार न जाता जोरदारपणे परावर्तित केले जातात त्याअर्थी त्यांना अडवणारे धनभारित कण अणुच्या केंद्रस्थानी एकत्रित झाले असले पाहिजेत असे **रुदरफोर्ड** यांनी दाखविले आणि केंद्रकाचा शोध लावला. अर्थात अणुची 'प्लम पुडिंग' रचना निकालात निघाली. इ. स. १९११ यांनी **रुदरफोर्ड** यांनी अणुरचनेचा अंदाज वर्तविला. त्यानुसार अणुच्या केंद्रस्थानी धनभारित कण आणि अणुचे वस्तुमान एकत्र झालेले दिसते. तसेच अणुच्या आकाराच्या तुलनेत (त्रिज्या जवळ जवळ $१०^{-१०}$ मी) केंद्रकाची त्रिज्या अगदी लहान (१०-१४ मी) असते. म्हणजेच अणु जवळ जवळ पोकळ असतो. अणुमध्ये ऋणभारित इलेक्ट्रॉन्स (वीजक) आणि धनभारित प्रोटॉन्स (धानक) यांची संख्या समान असते. म्हणूनच अणुचा एकूण विद्युतप्रभार शून्य होतो. सूर्याभोवती ग्रह ज्याप्रमाणे फिरतात त्याप्रमाणे केंद्रकाभोवती इलेक्ट्रॉन्स (वीजक) वर्तुळाकार कक्षेत भ्रमण करतात असे रुदरफोर्डने सुचविले. तसेच किरणोत्सर्गी पदार्थाचा अभ्यास करताना किरणोत्सर्गी पदार्थाचे सतत विघटन होत असते; त्यामुळे त्याचे वस्तुमान कमी होते हे त्यांच्या लक्षात आले. प्रारंभी घेतलेल्या वस्तुमानाच्या अर्धे वस्तुमान शिल्लक राहण्यासाठी जो काळ लागतो त्याला त्या किरणोत्सारी पदार्थाचे 'हाफ लाइफ' असे म्हणतात. (उदा. रेडियमचे हाफ लाइफ सोळाशे वर्षे आहे) किरणोत्सर्गावरील संशोधनाबद्दल १९०८ सालचे नोबेल देऊन **रुदरफोर्ड** यांना गौरविण्यात आले.



अनुक्रमणिका

आकृती क्र. २.



**कार्बन या मूलद्रव्याचा अणु केंद्रस्थानी ६ प्रोटॉन्स (धानक) (पांढरे) आणि ६ न्यूट्रॉन्स (वस्तुक) (काळे) दिसत असून त्याभोवती विशिष्ट कक्षेत भ्रमण करणारे ६ इलेक्ट्रॉन्स (वीजक) दिसत आहेत.**

### नील्स बोर आणि पॉल डिरॅक -

**रुदरफोर्ड** यांनी सुचविलेल्या अणुरचनेत ज्या त्रुटी होत्या त्या दूर करण्याचे काम त्यांचा डॅनिश शिष्य **नील्स बोर** यांनी केले. **नील्स बोर** यांनी सुचविलेल्या अणुरचनेनुसार इलेक्ट्रॉन्स विशिष्ट कक्षांमधून फिरतात. या कक्षांचे केंद्रकापासूनचे अंतर विवक्षित असते. तसेच प्रत्येक परिभ्रमणकक्षेत जास्ती जास्त किती इलेक्ट्रॉन्स (वीजक) सामावू शकतात ते $२n^{२}$ या सूत्राने दर्शविले जाते. येथे 'एन' हे अक्षर भ्रमणकक्षेचा क्रमांक दर्शविते. या सूत्रानुसार पहिल्या भ्रमणकक्षेत जास्तीत जास्त २, दुसऱ्यात ८, तिसऱ्यात १६, चौथ्यात ३२ याप्रमाणे इलेक्ट्रॉन्स (वीजक) सामावतात.

**बोरची** आकडेमोड हायड्रोजनच्या अणुवर बेतलेली होती. हायड्रोजनच्या अणुमध्ये पहिल्या भ्रमणकक्षेत फक्त एक इलेक्ट्रॉन (वीजक) असतो. अणुची ही कमीतकमी ऊर्जेची



अनुक्रमणिका

अवस्था असते. भौतिकतज्ज्ञ या अवस्थेला 'ऊर्जेची निम्नतम अवस्था' किंवा 'तळस्थिती' असे म्हणतात. हायड्रोजन अणुला उत्तेजित केले तर हा इलेक्ट्रॉन (वीजक) बाहेरील भ्रमणकक्षेत उडी मारतो. इलेक्ट्रॉन (वीजक) किती लांब उडी मारेल आणि कितव्या भ्रमणकक्षेत जाईल हे आपण त्याला दिलेल्या ऊर्जेवर अवलंबून असते. ऊर्जा जितकी अधिक तितका इलेक्ट्रॉन (वीजक) अधिक दूर जातो. पण हा ऊर्जेचा स्रोत थांबवला तर तो इलेक्ट्रॉन (वीजक) आतील भ्रमणकक्षेत उडी मारतो व शेवटी मूळ स्थानी परत येतो; यावेळी इलेक्ट्रॉन (वीजक) प्रकाशरूपाने ऊर्जा उत्सर्जित करतो. ही ऊर्जा बाहेरील भ्रमणकक्षेत उडी मारताना शोषलेल्या ऊर्जेइतकी असते. व इलेक्ट्रॉन (वीजक) दूरवरच्या भ्रमणकक्षेतून मूळ स्थितीत येईपर्यंत जेवढ्या उड्यांच्या शक्यता वर्तवता येतील तेवढ्या प्रकाशरेषा हायड्रोजनच्या वर्णपटात असतात. हायड्रोजन या अत्यंत साधी रचना असलेल्या अणूपासून मिळणाऱ्या वर्णपटात शंभराहून अधिक रेषा का असतात व त्यांची मांडणी एका विशिष्ट पद्धतीनेच का झालेली असते या शास्त्रज्ञांना पडलेल्या कोड्याचे उत्तर **नील्स बोर** यांनी दिले होते. हे सर्व स्पष्टीकरण देण्यासाठी **मॅक्स प्लँकच्या** पुंजसिद्धान्ताची **बोरला** मदत झाली. ऊर्जा ही पुंजरूपातच अस्तित्वात असते आणि ऊर्जेचे शोषण व उत्सर्जन प्रवाही रूपात होत नसून पुंजरूपात होते हा **प्लँकचा** सिद्धान्त वर्णपटाच्या स्पष्टीकरणासाठी लागू झाला. या अतुलनीय कामगिरीबद्दल **नील्स बोर** यांना १९२२ सालचे भौतिकशास्त्राचे नोबेल देण्यात आले.

केंब्रिजमध्ये **पॉल डिरॅकची** भौतिकशास्त्रातील प्रतिभावंतांशी गाठ पडली. **राल्फ फाउलर** हे **पॉल डिरॅक** यांचे पर्यवेक्षक होते. तसेच ते नोबेल पारितोषिक विजेते **चंद्रशेखर** यांचेही पर्यवेक्षक होते. राल्फ फाउलर (१८८५-१९४४) यांनी **पॉल डिरॅक** यांना पुंजसिद्धांताची तोंडओळख करून दिली. केंब्रिजमध्ये **रुदरफोर्ड, नील्स बोर** यांचे संशोधनकार्य चालू होतेच. १९२५च्या मेमध्ये **पॉल डिरॅक** आणि **नील्स बोर** या दोन प्रज्ञावंतांची भेट झाली. पुंजसिद्धांतातील मूलभूत समस्या सर्वांना समजावून सांगण्यासाठी **बोर** यांनी एक व्याख्यान दिले. बुद्धी आणि विचारशक्तीला आव्हान देणाऱ्या या व्याख्यानाला **पॉल डिरॅक** आवर्जून उपस्थित राहिले. या व्याख्यानावरून आपले मत मांडतांना **पॉल डिरॅक** म्हणतात, "लोक अवाक् होऊन **बोरचे** व्याख्यान ऐकत होते. परंतु मी मात्र त्यांच्या व्याख्यानाने फारसा प्रभावित झालो नाही. **बोरचा** युक्तिवाद प्रामुख्याने गुणात्मक होता. **बोरने** ते सिद्धान्त समीकरणांच्या स्वरूपात संख्यात्मक पद्धतीने सांगावेत अशी माझी इच्छा होती. **बोरच्या** व्याख्यानात अशा समीकरणांचा उल्लेख क्वचितच होता. त्यामुळे माझ्या बाबतीत **बोरचे** ते व्याख्यान नवनवीन समीकरणांचा शोध घेण्यास उद्युक्त करणारे ठरले नाही. माझ्या पुढील संशोधनावर **बोरच्या व्याख्यानाचा प्रत्यक्ष परिणाम झाला नाही.'**

**ईस्थर सलमान** ही **आइन्स्टाइनची** विद्यार्थीनी. १९२२ ते २५ या काळात ती बर्लिन विद्यापीठात भौतिकशास्त्राचा अभ्यास करत होती. १९२५ पासून ती इंग्लंडला आली. **पॉल**



अनुक्रमणिका

**डिरॅक** यांच्या अनेक याठवणी **ईस्थरने** लिहून ठेवल्या आहेत. **ईस्थरने डिरॅक** यांना प्रथम पाहिले ते केंब्रिजमधील कॅव्हेंडिश प्रयोग शाळेतील चर्चासत्रात. १९२७ साल होते. एका खिडकीखाली **रुदरफोर्ड** यांच्या पत्नी सर्वांकरिता चहा देत होत्या. इतक्यात **रुदरफोर्ड** चहा घ्यायला टेवलापाशी आले. "बहुतेक लोकांनी अजून चहाचा पहिला कपही घेतला नाही आणि तुम्हाला चहाचा दुसरा कप हवाय !" असे **सौ. रुदफोर्ड** म्हणत असतानाच समोरचा दरवाजा उघडला गेला आणि एका तरुणाने तेथे प्रवेश केला. **रुदरफोई** यांनी चहाचा कप तिथेच ठेवला आणि ते भराभर त्या तरुणाच्या दिशेने गेले आणि त्याला पहिल्या रांगेत मोठ्या सन्मानपूर्वक बसविले. **'पॉल डिरॅक'** लोक कुजवुजले ! इतक्यात **फाऊलरही** स्वत: हजर झाले आणि **डिरॅक**जवळ बसले. **पॉल डिरॅक** यांच्या विद्वतेची, आणि बुद्धिमत्तेची चमक अल्पावधीतच केंब्रिजमधील या सर्व भौतिकशास्त्रज्ञांना झाली होती. त्यांच्या वागण्याबोलण्यातून **डिरॅक** यांच्याविषयीचा आदरभाव पावलोपावली व्यक्त होत होता. **डिरॅक** यांचा हा सन्मान होता.

याच संदर्भातील **ईस्थर** यांची आणखी एक आठवण **पॉल डिरॅक** यांच्या बुजरेपणाची आणि एकांतप्रियतेची ओळख करून देणारी आहे. एकदा **रुदरफोर्ड** यांनी आपल्या घरी भोजनसमारंभ आयोजित केला होता. **ईस्थर** आपल्या यजमानांबरोबर तेथे गेली होती. सर्व मित्रमंडळी जमली होती. अर्थात **पॉल डिरॅकही** होतेच. दुसऱ्या दिवशी **पॉल डिरॅक** भेटल्यावर **ईस्थरनी** त्यांना विचारले, "कालचा समारंभ तुला कसा काय वाटला?" त्यावर डिरॅक उत्तरले, "मी आजपर्यंत कोणत्याही समारंभाला गेलेलो नाही. त्यामुळे त्या समारंभाची दुसऱ्या समारंभाशी तुलना करून त्याबद्दल मत व्यक्त करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही." हे उत्तर प्रत्यक्ष अनुभव असल्याशिवाय कोठचेही विधान करावयाचे नाही या त्यांच्या बालपणातील आठवणींशी सुसंगत आहे.

प्रकाशकिरण कणरूपही असतात आणि लहरींचेही गुणधर्म दाखवतात हे शास्त्रज्ञ प्रयोगाने पडताळून पाहात होते. इ. स. १९२३ साली **आर्थर कॉम्पटन** यांनी क्ष किरणांवर प्रयोग केले. विद्युतचुंवकीय लहरींमध्ये कण आणि लहर या दोन्हीचे गुणधर्म आढळतात. असे **कॉम्प्टन** यांनी सिद्ध केले. विद्युतचुंबकीय लहरींचे स्वरूप द्वैती असले पाहिजे असे त्यांनी सांगितले. विद्युतचुंबकीय लहरींचे कणसदृश गुणधर्म सिद्ध केल्याबद्दल **कॉम्प्टन** यांना १९२७ सालचे नोबेल मिळाले.

इलेक्ट्रॉन (वीजक), प्रोटॉन (धानक) यासारखे अतिसूक्ष्म मूलकण हे खरोखर कणस्वरूप आहेत की त्यांचे अस्तित्त्व लहररूपात असते हा प्रश्न आता भौतिकतज्ज्ञांना सतावत होता. अनेक भौतिकतज्ज्ञ या प्रश्नाची उकल करण्याच्या प्रयत्नात असतानाच फ्रेंच **प्रिन्स लुई दि ब्रॉली** यांनी १९२३ साली एक खळबळजनक सिद्धान्त मांडला. "फक्त लहरी कणरूप नसतात तर हे मूलकणसुद्धा लहरीस्वरूप असतात. पदार्थामध्ये (Matter)

प्रत्येक मूलकणाशी संगत एका लहरीचे अस्तित्व असतेच ही संकल्पना **दि ब्रॉलीने** आपल्या डॉक्टरेटच्या प्रबंधात प्रामुख्याने मांडली होती.

**प्लँकचे** समीकरण  E = u म्यू  E = ऊर्जा  u = प्लँकचा स्थिरांक (म्यु) = वारंवारता

**आइन्स्टाइनचे** समीकरण  E = mc2  E = ऊर्जा  m = वस्तुमान  c = प्रकाशाचा वेग.

या दोन समीकरणांचा आधार घेऊन **दि ब्रॉलीने** स्वत:चे नवे समीकरण मांडले.

लॅम्डा $\lambda = \frac{h}{mv}$ येथे  लॅम्डा = तरंगलांबी m = वस्तुमान, v = प्रवेग.

मूलकणाशी संलग्न असणाऱ्या लहरीची लांबी त्याचे वस्तुमान आणि प्रवेग यांच्या गुणाकाराच्या व्यस्त प्रमाणात बदलते हे **दि ब्रॉलीने** सिद्ध केले. ऊर्जेचे पुंजस्वरूप आणि तरंग-कण द्वैतता या भौतिकशास्त्रातल्या दोन क्रांतिकारी घटना **दि ब्रॉलीच्या** सिद्धांतामुळे जोडल्या गेल्या. इलेक्ट्रॉनसारखे मूलकण कधी लहरीप्रमाणे तर कधी तरंगाप्रमाणे वागतात असे **दि ब्रॉलीचे** मत होते. मूलकणांचे द्वैती स्वरूप सिद्ध केल्याबद्दल **दि ब्रॉली** यांना १९२९ सालचे नोबेल सन्मानपूर्वक देण्यात आले.

इलेक्ट्रॉन (वीजक) कणांची तरंग-कण द्वैतता **दि ब्रॉली** यांनी सिद्ध केली. हे इलेक्ट्रॉन्स (वीजक) अणुकेंद्राभोवती भ्रमण करतात. हे भ्रमण विशिष्ट नियमानुसार होत असते. हे नियम पुंजसंख्यांनी दर्शवतात. प्रमुख पुंजसंख्या 'एन्', (भ्रमण कक्षेतील) 'पुंजसंख्या एल्' आणि मॅग्नेटिक लोहचुंबकी भ्रमणकक्षा पुंजसंख्या 'एम्' ने दर्शविण्यात येते. १९२४ सालापर्यंत शास्त्रज्ञांना फक्त तीन पुंजसंख्या माहित होत्या. १९२४ साली **वुल्फगांग पॉली** यांनी इलेक्ट्रॉनचे परिवलन दर्शविणारी 'एस्' ही चौथी स्पिन (फिरकी) पुंजसंख्या शोधली. **वुल्फगांग पॉली** हे ऑस्ट्रियन भौतिकतज्ज्ञ. **पॉली** यांनी अवघ्या २१व्या वर्षी आइन्स्टाइनच्या सापेक्षता सिद्धान्तावर प्रबंध लिहून डॉक्टरेट मिळवली. **पॉली** यांच्या संशोधनामुळे अणुभोवती भ्रमण करणाऱ्या इलेक्ट्रॉनची (वीजकाची) स्थिती चार पुंजसंख्यांनी व्यक्त करता येऊ लागली. अणुकेंद्राभोवती भ्रमण करणाऱ्या कोणत्याही दोन इलेक्ट्रॉन (वीजक) कणांच्या चारही पुंजसंख्या समान असणार नाहीत' असा सिद्धान्त **पॉली** यांनी मांडला. अणुच्या पहिल्या भ्रमणकक्षेत दोन इलेक्ट्रॉन (वीजक) असतात. या दोन इलेक्ट्रॉनच्या (वीजकांच्या) तीन पुंजसंख्या समान असल्या तरी चौथी एस् ही पुंजसंख्या भिन्न असते. त्यांचे परिवलन परस्परविरुद्ध दिशेने होते. यालाच '**पॉलीचे** अपवर्जन तत्त्व' (Pauli's exclusicon principle) असे म्हणतात.



अनुक्रमणिका

आकृती क्र. ३




**सॉडिंजर यांच्या स्थिर तरंग लहरी**

**अ (a) एक वलय असलेली साधी स्थिर तरंगलहर**

**ब (b) दोन वलये असलेली स्थिर तरंग लहर**

**क (c) तीन वलये असलेली स्थिर तरंग लहर**

'इलेक्ट्रॉन वीजक कणाची तरंग-कण द्वैतता' **दि ब्रॉली** यांनी सिद्ध केली. अणुकेंद्राभोवती भ्रमण करणाऱ्या प्रत्येक इलेक्ट्रॉनशी (वीजकाशी) संगत अशी एक लहर असते. त्या लहरीचे स्वरूप **अेर्विन श्रॉडिंजर** (१८८७-१९६१) या ऑस्ट्रियन भौतिकज्ञानी दाखविले. इलेक्ट्रॉनशी (वीजकाशी) संलग्न असणाऱ्या लहरींचे व्यतीकरण (इंटरफिअरन्स) होते व त्यातून स्थिर तरंग (standing wave) निर्माण होतो असे **श्रॉडिंजर** यांचे म्हणणे होते. या स्थिरतरंग संकल्पनेतूनच 'वेव्ह मेकॅनिकस' - **'तरंग यामिकी'** या नवीन शाखेची निर्मिती झाली. या स्थिरतरंगाचे अस्तित्व गणिती समीकरणाने **श्रॉडिंजर** यांनी सिद्ध केले. त्याला **श्रॉडिंजर** समीकरण म्हणतात. १९३६ सालचे 'नोबेल' देऊन त्यांच्या कार्याचा गौरव करण्यात आला. इलेक्ट्रॉन्स (वीजक) हे स्थिरतरंगरूप असतात याबद्दल **श्रॉडिंजर** यांना खात्री होती. पण हे तरंग कोण निर्माण करते हे त्यांना माहित नव्हते. ज्यामुळे हे तरंग निर्माण होतात त्या अज्ञाताला **श्रॉडिंजरने** psi 'साय' हे ग्रीक अक्षर



अनुक्रमणिका

दिले. **श्रॉडिंजरच्या** तरंग समीकरणामुळे कोणत्याही अणुमध्ये कशा प्रकारच्या स्थिरतरंगलहरी निर्माण होतील ते ठरविता येते. हायड्रोजनच्या अणुमध्ये केंद्रस्थानी एक प्रोटॉन (धानक) असून भ्रमणकक्षेत एक इलेक्ट्रॉन (वीजक) असतो. **बोरच्या** अणुरचनेनुसार हायड्रोजनच्या अणुच्या पहिल्या भ्रमणकक्षेचा व्यास आणि **श्रॉडिंजच्या** तरंग समीकरणानुसार येणारा हायड्रोजन अणुचा व्यास हा सारखाच असतो. म्हणजेच हायड्रोजनच्या अणुचा आकार निश्चित करण्याकरिता **श्रॉडिंजरच्या** तरंग सीकरणाचा उपयोग होतो.

**वर्नर हाइझेनबर्ग** (१९०१ ते १९७६) हे जर्मन भौतिकतज्ज्ञ. तेही अणुरचना आणि पुंजयामिकी या दोन्ही विषयांचा सखोल अभ्यास करीत होते. अणुकेंद्राभोवती इलेक्ट्रॉन (वीजक) भ्रमण करतात हे आता सर्वांना मान्य झाले होते. परंतु इलेक्ट्रॉन (वीजक) या मूलकणांच्या हालचालींचे नियम अजून उलगडले नव्हते. आण्विक स्तरावरील प्रयोगात सुरुवातीला काय होते आणि अखेरीस काय उरते एवढेच शास्त्रज्ञांना समजते. पण या दोहोंच्या मधल्या काळात प्रत्यक्षात काय हालचाली होतात, काय घटना घडतात हे आपल्याला डोळ्यांनी दिसत नाही पण शास्त्रज्ञांना त्याचा अंदाज वर्तवता येतो. म्हणूनच इ. स. १९२५ च्या सुमारास **हाइझेनबर्गने** प्रयोगाचे निष्कर्ष सारणीच्या (Matrics) स्वरूपात मांडण्यास सुरुवात केली. ६६ वर्षापूर्वी **हॅमिल्टन** या आयरिश गणितज्ज्ञाने स्तंभ आणि पंक्तींच्या रूपात सर्व माहिती नोंदविण्याची पद्धत विकसित केली होती. तिला मॅट्रायसेस-सारण्या असे म्हणतात. या सारण्यांच्या सहाय्याने प्रारंभीच्या परिस्थितीत कोणकोणत्या संभाव्यता असतात ते आजमावता येते. यालाच **हाइझेनबर्ग** यांनी 'सारणी यामिकी' असे नाव दिले. अणुरचनेच्या संदर्भातील अनेक प्रश्नांची उत्तरे सारणी यामकीच्या आधारे देता येतात. सारणी यामिकीत इलेक्ट्रॉन्सचा (वीजक) निव्वळ कण रूपात विचार केला जातो.

आता भौतिकतज्ज्ञांपुढे दोन उपपत्ती आल्या. **दि ब्रॉलीच्या** तरंग कण द्वैततेवर आधारलेली श्रॉडिंजरची तरंग यामिकी (वेव्ह मेकॅनिकस) आणि मूलकणांच्या विश्लेषण न करता येणाऱ्या घटनांवर आधारलेली **हाइझेनबर्गची** सारणीयामिकी (मॅट्रिकस मेकॅनिक्स) **हाइझेनबर्गने** सारणी यामिकी विकसित केल्यानंतर सुमारे वर्षभरांनी एक महत्त्वाची गोष्ट **श्रॉडिंजरच्या** लक्षात आली. या दोन्ही यामिकी वरवर पाहता भिन्न वाटल्या तरी अंकगणितीयदृष्ट्या समान आहेत. मूलकणांचे संशोधन करण्याकरिता या दोन्ही उपपत्ती फार उपयुक्त असल्यामुळे पुंजयामिकी (क्वांटम मेकॅनिक्स) या शाखेत त्या दोन्ही उपपत्ती समाविष्ट केल्या.

**श्रॉडिंजरच्या** स्थिर तरंगलहरीच्या संकल्पनेनुसार हायड्रोजनच्या अणुमधील इलेक्ट्रॉन (वीजक) हा पसरलेल्या 'स्थिरतरंगाच्या' रूपात असून त्याला कंपनासाठी तीन मिती उपलब्ध असतात. तसेच इलेक्ट्रॉनसारख्या वीजका सारख्या मूलकणांबरोबर एक लहर संलग्न असते हेही भौतिकतज्ज्ञांना मान्य झाले होते. नेमक्या याच सुमारास **मॅक्स बॉर्न** या जर्मन



अनुक्रमणिका

भौतिकज्ञांनी **श्रॉडिंजरच्या** स्थिरतरंगसिद्धान्ताला पूर्तता देणारा सिद्धान्त मांडला. या स्थिर तरंग लहरी मन:चक्षुंसमोर साकारण्याची आवश्यकता नाही कारण त्या लहरी वास्तवात नसतात. त्या फक्त 'संभाव्यता' लहरी असतात. प्रत्येक लहरीला आयाम (amplitude) असतो हे आपण लहरीची माहिती करून घेताना पाहिले आहे. या संभाव्यता लहरीचा आयाम ज्या ठिकाणी सर्वात जास्त असतो तेथे भ्रमण करणारा इलेक्ट्रॉन (वीजक) सापडण्याची शक्यता जास्तीत जास्त असते. १९२६ साली त्यांनी हा शोधनिबंध प्रकाशित केला. भौतिकज्ञांनी त्याला मान्यता दिली. **मॅक्स बॉर्न** यांच्या या संशोधनामुळे पुंजयामिकीमध्ये 'संभाव्यता' वर्तवता येऊ लागल्या. **श्रॉडिंजरची** तरंगयामिकी आणि **हाइझेनबर्गची** सारणी यामिकी या दोन समानार्थी सिद्धान्तासाठी 'पुंजयामिकी' या शब्दाचा वापर प्रथम **मॅक्स बॉर्न** यांनी केला. **मॅक्स बॉर्न** आणि **वेर्नर हाइझेनबर्ग** यांनी ग्योटिंजेन विद्यापीठात एकमेकांच्या सहकार्याने संशोधन केले. १९५४ सालचे भौतिकशास्त्राचे नोबेल **मॅक्स बॉर्न** यांना देण्यात आले.

सारणी यामिकीवरोबर **हाइझेनबर्ग** यांनी अनिश्चितता तत्वाचा प्रस्ताव मांडला आणि तंतोतंतपणाचा विज्ञानाचा पायाच उखडला गेला. विज्ञानात अचूकतेला महत्त्व आहे. पण वस्तुचा आकार जर खूप लहान असेल तर मोजमापात अचूकता राखणे खूप कठीण होते. पुंजयामिकीतील मूलकण इतके सूक्ष्म असतात की ते सूक्ष्मदर्शक यंत्रातूनही दिसत नाहीत. म्हणून पुंजयामिकीतील घटना एका ठराविक मर्यादेपेक्षा अधिक नेमकेपणाने मोजता येत नाहीत. संदिग्धतेची आडकाठी असल्यामुळे अनिश्चिततेचा आधार घेतल्याशिवाय आपल्याला पुढचा विचार करताच येत नाही असे **हाइझेनबर्ग** यांचे मत होते. त्यांचे संशोधन **'हाइझेनबर्गचे अनिश्चिततेचे तत्त्व'** (uncertaint of principle) म्हणून प्रसिद्ध झाले. या तत्त्वानुसार कोणत्याही मूलकणाची स्थिती आणि संवेग (मोमेंटम = m x v) या दोन्ही गोष्टी एकाच वेळी नेमकेपणाने मोजता येत नाहीत. म्हणजेच पदार्थाच्या मूलकणाची स्थिती नेमकेपणानी सांगितली तर आपल्याला त्याचा संवेग अचूकतेने सांगता येणार नाही आणि जर त्या मूलकणाचा संवेग तंतोतंत समजला तर त्याच्या स्थितीवद्दल अचूकतेने सांगता येणार नाही. अनिश्चिततेच्या तत्त्वाचे हे प्राथमिक मर्म आहे.

प्रत्येक मूलकणाची प्रारंभीची स्थिती आणि संवेग या दोन्ही गोष्टी एकाच वेळेस अचूकतेने समजत नसल्यामुळेच **न्यूटनचे** गतिविषयक नियम त्या मूलकणांना लावता येत नाहीत. प्रत्यक्ष तर सोडाच पण तात्त्विकदृष्ट्यासुद्धा ही गोष्ट सर्वथैव अशक्य आहे. गेली तीनशे वर्षे भौतिकशास्त्र **न्यूटनच्या** ज्या गतिविषयक नियमांवर आधारलेले होते ते नियम मूलकणांचा अभ्यास करताना कोलमडून पडले. पुंज क्रांतीबद्दल आपले मत व्यक्त करताना **हाइझेनबर्ग** म्हणतात, "नवनवीन घटनांमुळे जेव्हा विचार करण्याच्या पारंपारिक पद्धतीत बदल करणे भाग पडते तेव्हा असा बदल करणे नामवंत भौतिकज्ञांनाही कठीण होते. ज्या वैचारिक पायावर पूर्ण भौतिकशास्त्र आधारलेले होते तो पायाच उखडल्याची भावना निर्माण



अनुक्रमणिका

होते. अत्यंत हुशार आणि बिनीचे शास्त्रज्ञसुद्धा असा वैचारिक बदल करण्यास नाखुषी दर्शवितात तेव्हा विज्ञानात क्रांती कशी घडून येते याचे आपल्याला आश्चर्य वाटते.'' हा रोख बहुधा **आल्बर्ट आइन्स्टाइन** यांच्यावर असावा कारण अनिश्चिततेचे तत्त्व त्यांना अजिबात मान्य नव्हते. भौतिकशास्त्रात अचूकता अत्यावश्यक आहे असे त्यांचे ठाम मत होते. ईश्वर जुगार खेळत नाही. 'गॉड डझ नॉट प्ले डाइस' या शब्दात त्यांनी आपली नापसंती दर्शविली होती.

१९२५ च्या मे महिन्यात **पॉल डिरॅक** आणि **वेर्नेर हाइझेनबर्ग** यांची भेट झाली. हाइझेनबर्ग ज्यू नव्हते. त्यामुळे नाझी जर्मनीमध्ये त्यांचा छळ झाला नाही. बर्लिनमध्ये त्यांनी भौतिकशास्त्राचे प्राध्यापक म्हणून काम केले. दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकन सैनिकांनी जर्मन शास्त्रज्ञांना कैद केले. **हाइझेनबर्ग** यांना त्यावेळी इंग्लंडमध्ये पाठवले होते. १९४६ साली तेथून सुटका झाल्यावर ते पुन्हा जर्मनीला परत गेले. भौतिकशास्त्राच्या विकासासाठी **मॅक्स प्लँक** ही संस्था स्थापन करून **हाइझेनबर्ग** यांनी ती विकसित केली. भौतिकशास्त्राचे नोबेल मिळवणाऱ्या या शास्त्रज्ञाने भौतिकशास्त्र सर्वसामान्य नागरिकांनासुद्धा समजावे म्हणून खूप मेहनत घेतली. पियानोवादनात ते निष्णात होते. तसेच टेबल टेनिस हा खेळही ते उत्तम खेळत असत. **पॉल डिरॅक** यांची **हाइझेनबर्गशी** भेट झाली तेव्हा **हाइझेनबर्ग** यांनी पुंजयामिकीवरचा आपला पहिला शोधनिबंध प्रकाशित केला होता. **पॉल डिरॅक** यांनी तो वाचला. अभ्यासला. क्रमपरिवर्तन न होण्याच्या अतिशय महत्त्वाच्या संकल्पनेचा परिचय **हाइझेनबर्ग** यांनी त्या शोधनिबंधात करून दिला होता. त्यानंतर **डिरॅक** यांनी पुंजयामिकीवरचा आपला शोधनिबंध प्रकाशित केला. **पॉल डिरॅक** यांनी याआधी सात शोधनिबंध प्रकाशित केले होते. पण शास्त्रीय जगताने त्याची फारशी दखल घेतली नव्हती. या शोधनिबंधाने मात्र भौतिकतज्ज्ञांमध्ये खळबळ उडवून दिली. त्यात **पॉल डिरॅक** यांनी $pq - qp = h/2\pi\, i$ हे समीकरण जगापुढे मांडले होते. हेच समीकरण **बॉर्न** आणि **जॉर्डन** यांनी स्वतंत्रपणे शोधले होते. दोन भिन्न व्यक्तींनी आपल्या स्वतंत्र अभ्यासातून एकच समीकरण शोधावे ही घटना सर्वांनाच स्तिमित करणारी होती. **डिरॅक** यांचा शोधनिबंध वाचल्यावर आपली प्रतिक्रिया काय झाली हे सांगताना **बॉर्न** म्हणतात, ''माझ्या वैज्ञानिक कारकीर्दीतील हा आश्चर्यकारक योगायोग होता. **डिरॅक** हे नावसुद्धा मला परिचित नव्हते. हा लेखक खूपच तरुण आहे. तरीसुद्धा त्याचे लेखन बिनचूक आणि प्रशंसनीय आहे.''

**ईस्थर** सल्मान यांनी **पॉल डिरॅक** यांची **हाइझेनबर्ग** यांच्या संदर्भात सांगितलेली एक आठवण येथे देत आहे. **पॉल डिरॅक** हे अत्यंत अबोल म्हणून प्रसिद्ध होते. एकदा **पॉल डिरॅक ईस्थरच्या** घरी जेवायला गेले होते. शास्त्रीय जगतात **हाइझेनबर्गच्या** अनिश्चिततेचा क्रांतिकारी सिद्धान्त हा चर्चेचा ताजा विषय होता. **ईस्थरने डिरॅक** यांचे त्याबद्दलचे मत विचारल्यावर **डिरॅक** म्हणाले, ''प्रथमदर्शनी मला तो सिद्धान्त तितकासा समजला नाही. परंतु मग मात्र त्याचा अर्थ माझ्या ध्यानात आला. मी त्यावर विचार करू



अनुक्रमणिका

लागलो. त्या सिद्धान्ताचे कोणकोणते परिणाम होतील त्याचा शोध मी घेऊ लागलो. त्यानंतर लगेचच मी माझा शोधनिबंध प्रकाशित केला." त्यानंतर **पॉल डिरॅक** यांनी **ईस्थर** व तिचे पती **मायर** या उभयतांना अनिश्चिततेचा अर्थ समजावून सांगितला. दुसऱ्या दिवशी प्रयोगशाळेत गेल्यावर ईस्थरने हा किस्सा आपल्या सहकाऱ्यांना सांगितला. अचंबित होऊन त्यांनी ईस्थरला विचारले, "खरंच का **पॉल डिरॅक** इतकं सगळं बोलले?"

१९२६ च्या मे महिन्यात पुंजयामिकी या विषयावरील आपला प्रबंध **पॉल डिरॅक** यांनी पूर्ण केला आणि पी. एच. डी. ही पदवी संपादन केली. त्यानंतर **पॉल डिरॅक** यांना पुढील अभ्यासासाठी परदेशात जाण्याची संधी मिळाली. **मॅक्स बॉर्न, हाइझेनबर्ग** ही प्रज्ञावान मंडळी कार्यरत होती त्या गॉटिंजेन शहरी जाण्याची **पॉल डिरॅक** यांची इच्छा होती. परंतु त्यांचे पर्यवेक्षक **फाऊलर** यांना **डिरॅकनी** 'कोपनहेगन' येथे जावे असे वाटत होते. कोपनहेगन हे पुंजयामिकीचे त्या काळातील एक महत्त्वाचे केंद्र होते. **नील्स बोर, पॉली** यासारखे पुंजयामिकीवर काम करणारे अतिरथी महारथी कोपनहेगनमध्ये एकत्रित झाले होते. अशा ठिकाणी **पॉल डिरॅक** यांच्या बुद्धिमत्तेचे आणि संशोधनाचे चीज होईल असा **फाउलर** यांचा अंदाज होता. अखेर **डिरॅक** यांनी दोन्ही ठिकाणी काही काळ वास्तव्य करायचे ठरविले. १९२६ च्या सप्टेंबरमध्ये **पॉल डिरॅक** कोपनहेगनला आले. तेथे त्यांची पुन्हा एकदा **नील्स बोर** यांच्याशी गाठभेट झाली. अभ्यासाचे विषय समान असलेले समपातळीवरील दोन ज्ञानार्थी एकत्र आल्यावर गप्पांना काय तोटा ! दोघेजण भटकायला बाहेर पडत. त्यावेळी दोघेजण आपल्या विषयाशी संलग्न भरपूर गप्पा मारीत. पण यात बोलण्याचा सिंहाचा वाटा **बोरचा** असे आणि अर्थातच संलग्न श्रोत्याची भूमिका **पॉल** पार पाडत असे !

कोपनहेगनमधील याच वास्तव्यात **पॉल डिरॅक** यांनी पुंजयामिकीत प्रमाणभूत ठरलेला रूपांतरणाचा सिद्धांन्त मांडला. स्वत: **डिरॅक** त्याविषयी म्हणतात, "या सिद्धान्तामुळे मला स्वत:ला खरोखरीच समाधान लाभले. उभ्या आयुष्यात केलेल्या विविध संशोधनापैकी या सिद्धान्ताने मला जास्तीत जास्त आनंद दिला. हा रूपांतरणाचा सिद्धान्त माझा सर्वात आवडता सिद्धान्त आहे." रूपांतरणाच्या शोधनिबंधात **पॉल डिरॅक** यांनी अत्याधुनिक भौतिकशास्त्राच्या विकासाचे एक महत्त्वाचे साधन दिले. त्याला 'डेल्टा फंक्शन' असे म्हणतात. त्याबद्दल **डिरॅक** म्हणतात, "डेल्टा एक्स d(x) हे खरोखर एक्सचे योग्य काम नव्हे. पण काही अनुक्रमाने केलेल्या क्रियांची मर्यादा दर्शविण्यासाठी त्याचा उपयोग करता येईल. पुंजयामिकीमध्ये **डेल्टा** एक्सचा वापर केला तर चुकीचे निष्कर्ष निघणार नाहीत."

१९२७च्या फेब्रुवारी **डिरॅक** कोनहेगनमध्ये राहिले. हा मुक्काम **पॉल डिरॅक** यांच्या आयुष्यात संस्मरणीय ठरला. १९२७ पर्यंत पुंजयामिकी या भौतिकी ज्ञानशाखेचा अभ्यास अनेक तज्ज्ञ मंडळी करीत होती. तसेच **आइन्स्टाइन** यांनी सापेक्षतावादाचा सिद्धान्त शास्त्रीय जगतापुढे मांडला होता. परंतु या दोन्ही सिद्धान्ताना एका सूत्रात बांधणारा एक सिद्धान्त

अस्तित्वात नव्हता.

१९२७ सालच्या सॉल्हवे परिषदेत **पॉल डिरॅक** यांची पुन्हा एकदा **नील्स बोर** यांच्याशी गाठ पडली. "सध्या तू कोणत्या समस्येची उकल करण्यात गुंतला आहेस?" **बोरने डिरॅकला** विचारले. **डिरॅक** उत्तरला, इलेक्ट्रॉन्स (वीजका) संबंधीचा सापेक्षतावादी सिद्धान्त शोधण्याचा प्रयत्न करतो आहे. **डिरॅक** यांचे हे उत्तर ऐकून **नील्स बोर** बुचकळ्यात पडले. ते म्हणाले, "पण या समस्येची उकल तर **क्लीनने** आधीच केली आहे." **डिरॅक** मात्र **नील्स बोर** यांच्या या मताशी सहमत नव्हते.

१९७९ साली जेरुसलेममध्ये **आइन्स्टाइन्सची** जन्मशताब्दी साजरी करण्यासाठी **पॉल डिरॅक** तेथे गेले होते. तेव्हा (५० वर्षानंतर) त्यांनी १९२७ च्या सॉल्हवे परिषदेविषयीचे आपले मत व्यक्त केले. "**आइन्स्टाइन** आणि **बोर** यांच्या वादविवादात मी सहभागी झालो नाही. मी त्यांचे युक्तिवाद लक्षपूर्वक ऐकत होतो परंतु मला त्यात विशेष रस नव्हता. मला त्याविषयीचे बिनचूक समीकरण शोधायचे होते. बिनचूक समीकरण शोधून काढणे हे गणिती भौतिकतज्ज्ञाचे आद्य कर्तव्य ठरते. त्या समीकरणावर भाष्य करणे त्यामानाने गौण असते. पुंजयामिकीवद्दलचे संपूर्ण ज्ञान अजून आपल्याला मिळालेले नाही. सध्या भौतिकज्ञांना **बोरचे** संभाव्यतेचे स्पष्टीकरण मान्य करणे सोईचे होत असले तरी भविष्यात **आइन्स्टाइन** यांचेच भाकीत खरे ठरेल अशी दाट शक्यता आहे."

इ. स. १९२७ पर्यंत एकूण सहा भौतिकतज्ज्ञांनी लहरींचे सापेक्षतावादी समीकरण अगदी स्वतंत्रपण शोधले होते. **क्लीन** आणि **श्रॉर्डिंजर** हे त्यांत प्रमुख होते. परंतु त्या सर्वांनी शोधलेल्या समीकरणाचा संभाव्यता घनतेशी (प्रॉबेबिलिटी डेन्सिटी) संबंध जोडता येत नव्हता. नेमकी हीच गोष्ट **डिरॅक** यांना मान्य नव्हती कारण **पॉल डिरॅक** यांनी मांडलेल्या रूपांतरणाच्या सिद्धान्ताची मध्यवर्ती कल्पना ही संभाव्यता घनताच होती. रूपांतरणाचा सिद्धान्त हा **डिरॅक** यांचा अत्यंत आवडता सिद्धान्त होता. त्यामुळे या सिद्धांन्ताशी विसंगत असलेला दुसरा सिद्धान्त प्रमाण मानण्याची **डिरॅक** यांची तयारी नव्हती. म्हणून संभाव्यता घनतेशी संबंध जोडता येईल असे सापेक्षतावादी समीकरण शोधण्यास **डिरॅक** यांनी सुरुवात केली. १९२८ साली **पॉल डिरॅक** यांनी असे समीकरण शोधले आणि त्याचबरोबर सापेक्षतावादी पुंजयामिकीच्या दृष्टीने इलेक्ट्रॉन (वीजका) सारख्या मूलकणांचे परिवलन कसे होते याचा सुद्धा शोध **पॉल डिरॅक** यांनी लावला. त्या दृष्टीने **पॉल डिरॅक** यानी कामाला सुरुवात केली. क्षेत्र या जुन्याच कल्पनेचा आधार **डिरॅक** यांनी घेतला. 'क्षेत्र' हा विशिष्ट प्रदेश असतो. या प्रदेशातील प्रत्येक बिंदुवरील एखाद्या परिणामाचा प्रभाव आपल्याला मोजता येतो. उदा. लोखंडाच्या किस्यात काही विशिष्ट कमानींचे नक्षीकाम तयार झाले की चुंबकीय क्षेत्राची कल्पना स्पष्ट होते. या चुंबकक्षेत्रातील प्रत्येक बिंदूवर विशिष्ट बल (strength) आणि दिशा असलेले 'बल' कार्यरत असते. क्षेत्र ही कल्पना एकोणिसाव्या शतकांतील भौतिकतज्ज्ञांनी विकसित केली. इ. स. १८६१ मध्ये **जेम्स मॅक्सवेल** यांनी या संकल्पनेची

परिपूर्ती केली. 'कोणत्याही प्रकारच्या प्रकाशलहरी (दृष्य प्रकाश, रडारलहरी', क्ष किरण, अवरक्त प्रारण) विद्युत् आणि चुंबकीय क्षेत्राच्या स्वरूपात दाखविता येतात' हे त्यांनी प्रात्यक्षिकाने सिद्ध केले. "विद्युत्चुंबकीय क्षेत्र पुंज स्वरूपात म्हणजेच 'फोटॉन्स' या कणरूपात असते आणि हे फोटॉन्स असते. त्या क्षेत्राचे प्रतिनिधी म्हणून काम करतात''हे इ. स. १९०५ साली **आइन्स्टाइन** यांनी दाखवून दिले होते. क्षेत्र हे एखाद्या सरंजामशहाचे साम्राज्य आहे अशी कल्पना केली तर 'फोटॉन्स' कणांना सैनिक किंवा महसूल वसूल करणारे अधिकारी अशी उपमा देता येईल. हे अधिकारी सरंजामशहाच्या इच्छेची जाणीव त्या क्षेत्रात करून देतात. वस्तुजाल (**मॅटर**) आणि विद्युतचुंबकीय प्रारण यांचा एकमेकांवर काय परिणाम होतो यावर काम करण्याचे **डिरॅक** यांनी ठरविले. इलेक्ट्रॉन्स (वीजक) आणि प्रोटॉन्स (धानक) या मूलकणांची हालचाल कशी होते हे समजण्यासाठी प्रोटॉन्सशी संलग्न असलेले क्षेत्र विचारात घ्यावेच लागेल याची **डिरॅक** यांना कल्पना होती. **हॅमिल्टन** यांनी 'सारण्या' ही गणिताची शाखा विकसित केली होती. हे पूर्वी आलेच आहे. या दोन दोन सारण्यांचा वापर करून इलेक्ट्रॉनला (वीजकाला) तरंग लहरींचे समीकरण लागू होते व इलेक्ट्रॉन्स वीजकाचे परिवहन होत असते हे इ. स. १९२७ साली **वुल्फगॉंग पॉली** यांनी दाखवले होते. संभाव्यता धनता असलेल्या सापेक्षतावादी तरंगसमीकरणाचा शोध घ्यायचा प्रयत्न **पॉल डिरॅक** करीत होते. पण अजून मार्ग सापडत नव्हता. आकाशात वीज चमकावी तशी एक दिवस अचानक त्यांच्या मनात एक कल्पना तरळली. "हे समीकरण शोधण्यासाठी फक्त दोन X दोन सारण्याच वापरल्या पाहिजेत असे नाही. त्याऐवजी आपण ४ X ४ सारण्या वापरल्या तर ..........?'' इतकी साधी गोष्ट आपल्याला आधी कशी सुचली नाही याचे त्यांना राहून राहून आश्चर्य वाटत होते. आपल्या उत्तरायुष्यात त्याबद्दल भाष्य करताना **पॉल डिरॅक** म्हणत असत, "मागे वळून पाहताना, इतक्या बाळबोध मुद्यावर आपण किती दीर्घकाळ अडून बसतो हे फार चमत्कारिक वाटते.'' चार X चार सारण्यांचा वापर करून **पॉल डिरॅक** इच्छित समीकरण शोधण्यात गढून गेले. बुद्धिमत्ता, चिकाटी आणि व्यासंग या त्रयींच्या आधारे **पॉल डिरॅक** यांनी समीकरण शोधले. पुंजयामिकीला सापेक्षता सिद्धान्ताची ज़ोड देऊन त्यांनी इलेक्ट्रॉनचे (वीजकाचे) संपूर्ण विवरण **डिरॅक** समीकरणाच्या चार घटकांनी करता येते ही अभिनव क्रांतीकारक कल्पना मांडली. विशिष्ट क्षेत्रात विशिष्ट स्थितीत असलेला विशिष्ट अणु प्रोटॉन शोषून घेईल की उत्सर्जित करील याची संभाव्यता **डिरॅक** यांच्या गणिती संशोधनाने देता आली. तसेच या समीकरणामुळे इलेक्ट्रॉनची (वीजकाची) परिवलन गतीसुद्धा वर्तवता येऊ लागली. वास्तविक **डिरॅक** इलेक्ट्रॉनच्या (वीजकाच्या) परिवलनगतीचा शोध घेत नव्हते पण या समीकरणामुळे इलेक्ट्रॉन वीजकासारख्या मूलकणांना अर्धा पुंज परिवलनगती असते हे अगदी अनपेक्षितपणे समजले. **डिरॅक** समीकरणाचा हा 'बोनस' होता. हाच **पॉल डिरॅक** यांच्या पुंजप्रभाव क्षेत्र सिद्धान्त (क्वांटम फील्ड थिअरी). या सिद्धान्तामुळेच **मॅक्सवेलचे** विद्युतचुंबकीय क्षेत्राचे गतिशास्त्र आणि

पुंजसिद्धान्त यांची सांगड घालता आली. यालाच **पॉल डिरॅक** यांनी पुंजविद्युतगतीशास्त्र (क्वांटम इलेक्ट्रो डायनॅमिक्स) असे नाव दिले. ही उपशाखा **पॉल डिरॅक** यांनीच प्रस्थापित केली. **पॉल डिरॅक** यांची ही कामगिरी सर्वसामान्यांना समजेल अशा शब्दात अशी सांगता येईल, "आरशावर प्रकाशकिरण पडल्यावर ते चकाकतात आणि ती 'प्रभा' पुन्हा परावर्तित केल्यावर आण्विक पातळीवर काय घडत असावे हे तंतोतंतपणे १९२७ साली प्रथमच **डिरॅक** क्षेत्रप्रभाव सिद्धान्तामुळे लोकांना समजले."

कोपनहेगननंतर **पॉल डिरॅक** गॉटिंजेनमध्ये गेले. गॉटिंजेनमध्ये **डिरॅकची रॉबर्ट ऑपनहाइमर (१९०४-१९६७)** यांच्याशी भेट झाली. **रॉबर्ट ऑपनहाइमर** हे जन्मजात बुद्धिमत्तेचे वरदान लाभलेले आगळेवेगळे व्यक्तिमत्त्व. भौतिक, रसायन या दोन्ही शास्त्रात पारंगत, काव्य, भाषा, तत्त्वज्ञान, चित्रकला, स्थापत्यशास्त्र यात उत्तम गती असलेल्या या तरुणाला संस्कृतसह सात-आठ विविध भाषा बोलता येत होत्या. अमेरिकेतील अणुबॉंब प्रकल्पाचे यशस्वी नेतृत्व **ऑपनहाइमर** यांनीच केले होते. या संपन्न व्यक्तिमत्त्वामुळे **पॉल डिरॅक** प्रभावित झाले. पुढे या परिचयाचे दाट मैत्रीत रूपांतर झाले. सहवासाने **ऑपनहाइमर** यांचा एक आगळावेगळा गुणविशेष **डिरॅक** यांच्या लक्षात आला. सुप्रसिद्ध इटालियन कवी **दाँते** याच्या काव्याचा अभ्यास करण्यात **ऑपनहाइमर** बराच काळ घालवीत असत. पुंजयामिकी सारख्या अनेक अवघड विषयात पारंगत असणाऱ्या शास्त्रज्ञाला **दाँतेचे** काव्य हा दुर्बोध साहित्यप्रकारही लीलया पेलताना पाहून **डिरॅक** स्तिमित झाले. हे परस्परविरोधी वाटणारे दोन विषय एकाच व्यक्तिला कुशलतेने कसे काय हाताळता येतात ही शंका **डिरॅक** यांना स्वस्थ बसू देईना. त्यांनी **ऑपनहाइमर** यांना स्पष्टच विचारले, "भौतिकशास्त्र आणि काव्य हे दोन्ही विषय तुला कसे काय अभ्यासता येतात? भौतिकशास्त्रात आपण लोकांना माहित नसलेल्या गोष्टी अगदी सोप्या भाषेत समजावण्याचा प्रयत्न करतो, पण काव्यात याच्या उलट परिस्थिती असते." **ऑपनहाइमर** यांनी हे बोलणे हसण्यावारी नेले असले तरी **पॉल डिरॅक** यांच्या विविध विषयांबद्दलच्या संकल्पना किती स्पष्ट होत्या ते आपल्या लक्षात येते.

१९२७ साली **पॉल डिरॅक** गॉटिंजेनहून लेडनला व तेथून साल्हवे परिषदेत हजेरी लावण्यासाठी ब्रुसेल्सला गेले. तेथे प्रथमच त्यांची **आइन्स्टाइनशी** गाठ पडली. **डिरॅक** यांनी **आइन्स्टाइनबद्दल** फार चांगले उद्गार काढले. अर्थात् उभयतांच्या मनात परस्परांविषयी आदरभाव होता. पुंजयामिकीची अचूक मांडणी करण्याचे सारे श्रेय **डिरॅक** यांनाच दिले पाहिजे असे **आइन्स्टाइन** म्हणत असत. असे असले तरीही या दोघांमधील संपर्क बेताचाच राहिला. ज्येष्ठ आणि श्रेष्ठांशी घनिष्ट संबंध ठेवण्याची असोशी **डिरॅक** यांच्या व्यक्तिमत्त्वात नव्हती हेच त्याचे कारण असावे.

१९२७ साली ब्रुसेल्समध्ये झालेल्या पाचव्या सॉल्हवे परिषदेकरिता **नील्स बोर, आइन्स्टाइन, पॉल डिरॅक** इत्यादि अनेक नामवंत भौतिकतज्ज्ञ जमले होते. इलेक्ट्रॉन

(वीजक) कणांचे कण-लहर असे द्वैती स्वरूप भौतिकतज्ज्ञांना बुचकळ्यात टाकणारे होते. इलेक्ट्रॉन (विजक) कधी कणांचे गुणधर्म दाखवितात तर कधी लहरींचे ! याचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न १९२७ साली **नील्स बोर** यांच्या नेतृत्वाखाली कोपनहेगनमध्ये करण्यात आला. "इलेक्ट्रॉन वीजकासारखे मूलकण लहरींच्या स्वरूपात प्रवास करतात. पण कणांच्या स्वरूपात ते येतात. निरीक्षण क्रियेत इलेक्ट्रॉनचे (वीजकाचे) कणात रूपांतर होते. हे रूपांतर होताना इलेक्ट्रॉनशी वीजकाशी संलग्न असलेली लहर कोलमडून पडते. इलेक्ट्रॉन (वीजक) लहरस्वरूपात असताना तो निश्चित कुठे आहे ते सांगता येत नाही पण त्याबद्दल फक्त संभाव्यता वर्तवता येते. परंतु इलेक्ट्रॉन वीजक कणरूपात असताना त्याची स्थिती निश्चित होते. 'हेच सुप्रसिद्ध पुंजयामिकीचे कोपनहेगन स्पष्टीकरण' ! शास्त्रज्ञ विश्वातील सर्व घटना सूत्रांच्या रूपात मांडण्याचा प्रयत्न करतात. "वास्तवाचे संपूर्ण आकलन करणे हे सारासार विचारांच्या पलिकडले आहे ही गोष्ट शास्त्रज्ञांना प्रथमच या परिषदेत मान्य करावी लागली. नेमकी हीच गोष्ट **आइन्स्टाइन** यांना मान्य नव्हती. म्हणूनच त्यांनी म्हटले, "The most incomprehensible thing about the world is that it is comprehensible."

या परिषदेनंतर **पॉल डिरॅक** केंब्रिजला परतले. केंब्रिजमधील सेंट जॉन कॉलेजचे 'सन्माननीय सभासद' म्हणून **पॉल डिरॅक** यांची नेमणूक झाली. त्यासंबंधीचा वृत्तान्त असा - सेंट जॉन कॉलेजच्या सभासदांची वार्षिक सभा भरली होती. तेथील श्रेष्ठ सभासदांनी नवीन सभासदांची निवड करायची होती. **पॉल डिरॅक** यांची श्रेष्ठता त्यांचे पर्यवेक्षक **फाउलर** यांना चांगलीच माहित होती. अत्यंत अबोल आणि प्रसिद्धि पराङ्मुख असल्यामुळे सभासदांचे **डिरॅक** यांच्याकडे काहीसे दुर्लक्ष झाले असावे असे **फाउलर** यांना वाटत होते. म्हणूनच "आज तुम्ही **पॉल डिरॅक** यांची सन्मान्य सभासद म्हणून निवड केली नाहीत तर ट्रिनिटि कॉलेज उद्याच तो सन्मान **पॉल डिरॅक** यांना देईल." असे त्यांनी सांगितले. अर्थातच सभासदांनी **पॉल डिरॅक** यांना तो सन्मान एकमुखाने जाहीर केला आणि विद्वान शास्त्रज्ञांची बूज राखण्याचे श्रेयही पटकावले !

पुंजप्रभावक्षेत्र सिद्धान्त मांडल्यावर अर्थातच **पॉल डिरॅक** स्वस्थ बसले नाहीत. **डिरॅक** समीकरणाच्या चार घटकांपैकी दोन घटकांमुळे इलेक्ट्रॉनच्या (वीजकांच्या) परिवलनाची माहिती होते तर त्याच समीकरणाच्या दुसऱ्या दोन घटकांमुळे इलेक्ट्रॉनची (वीजकाची) ऊर्जा किती असते ते समजते. वैयक्तिक इलेक्ट्रॉनची (वीजकाची) ऊर्जा किती आहे हे समजण्यासाठी जर आपण **डिरॅक** समीकरण सोडवले तर आपल्याला दोन उत्तरे मिळतात त्यापैकी एक धन तर दुसरे ऋण असते. उदा. एखाद्या संख्येचे वर्गमूळ शोधायचा प्रयत्न केला तर आपल्याला अशी दोन उत्तरे मिळतात. ४९ हा धन सात + ७ आणि ऋण सात -७ या दोन्ही संख्यांचा वर्ग असतो. **डिरॅक** समीकरणाने मिळालेल्या उत्तरापैकी ऋण उत्तर हे अडचणीत टाकणारे होते. ऋण संख्या ही संकल्पना बीजगणितात रुढ झाली आहे. पण दैनंदिन व्यवहारात आपल्याला ऋण संख्या दाखवता येत नाही. पण येथे ऋण संख्या हे

ऊर्जेचे परिमाण दर्शविते. ऋण ऊर्जा ही संकल्पना स्वीकारली तर **आइन्स्टाइनच्या** समीकरणानुसार ऋण ऊर्जेबरोबर ऋण वस्तुमान ही कल्पना ओघानेच मान्य करावी लागते. पण ऋण वस्तुमान ही सर्वथैव अशक्य गोष्ट आहे. मूलकणांचे वस्तुमान शून्यापेक्षा कमी असते या विधानाचा अर्थ लावायचा कसा? हा पेच **पॉल डिरॅक** यांना पडला होता. "या समस्येचा मला उपसर्ग झाला" असे **डिरॅक** यांनी कबूल केले होते. ऋणऊर्जा आणि ऋण वस्तुमान या संकल्पनेचे शास्त्रीय स्पष्टीकरण शोधण्याचा प्रयत्न **डिरॅक** करत होते. **डिरॅक** समीकरण कायम ठेवून ऋण ऊर्जेपासून आपली सुटका कशी करून घ्यावी याचा मार्ग **डिरॅक** शोधत होते. याबाबत **पॉल डिरॅक** म्हणतात,

'इलेक्ट्रॉनची (वीजकाची) ऋण ऊर्जेची अवस्था आपल्याला टाळता येणार नाही म्हणून पुंजक्षेत्र सिद्धान्तातच तिचा समावेश केला पाहिजे असे माझ्या लक्षात आले. त्याकरिता पोकळीचे नवे चित्र रेखाटावे लागेल. समजा ही पोकळी ऋण ऊर्जेच्या अवस्थानी भरलेली आहे अशी कल्पना केली तर त्या पोकळीत यातील प्रत्येक अवस्थेत एक इलेक्ट्रॉन (वीजक) याप्रमाणे ऋण ऊर्जेच्या इलेक्ट्रॉन्सचा वीजकांचा महासागर तयार होईल. आपल्याला या महासागराच्या पृष्ठभागाचा विचार करावयाचा आहे. महासागरात जागा नसल्यामुळे काही इलेक्ट्रॉन (वीजक) पृष्ठभागावर असतील. प्रोटॉन्स कण जर या पृष्टभागावरील इलेक्ट्रॉन्सवर (वीजकावर) आदळले तर ते आपली ऊर्जा इलेक्ट्रॉन्सना (वीजकांना) देतील व ते इलेक्ट्रॉन्स (वीजक) स्थानभ्रष्ट होऊन बाहेर उडी मारतील. अर्थात्‌ या इलेक्ट्रॉनच्या (वीजकांच्या) मूळ जागी एक होल (hole) छिद्र निर्माण होईल. इलेक्ट्रॉन (वीजक) निघून गेल्यामुळे या छिद्रातील ऋणभार नाहीसा होईल, पर्यायाने छिद्रामध्ये इलेक्ट्रॉनच्या (वीजकाचा) ऋणभाराच्या विरुद्ध म्हणजेच धनभार असलाच पाहिजे. म्हणजेच ऋण ऊर्जेच्या इलेक्ट्रॉन्सना सामावून घेतले तरीसुद्धा इलेक्ट्रॉन्स (वीजक) सदृश पण धनभार असलेल्या नवीन कणांचे अस्तित्व असल्याचे भाकीत **डिरॅक** यांना वर्तवावेच लागले. इलेक्ट्रॉन्स वीजकामुळेच हे कण निर्माण झालेले असल्यामुळे त्यांचे वस्तुमान इलेक्ट्रॉन्स वीजकांच्या वस्तुमानाइतकेच असले पाहिजे हे तर्कसंगत होते. **डिरॅक** यांनी प्रतिवस्तुचे (अँटिमॅटर) अस्तित्व शोधले होते. परंतु **डिरॅक** यांनी सर्व सिद्धान्त मांडल्यावर ते कण प्रोटॉन्स (धानक) असावेत असे म्हटले. प्रोटॉन्स (धानक) हे इलेक्ट्रॉन्सच्या (वीजकांच्या) दोन हजार पट जड असतात. त्यामुळे **डिरॅक** यांनी वर्तविलेली नवीन मूलकणांच्या अस्तित्वाची कल्पना बरोबर असली तरी वरील विधान मात्र चुकीचे होते. ही 'चूक' त्यांनी जाणूनबुजून केली असावी कारण याविषयी भाष्य करताना **डिरॅक** म्हणतात, "तत्कालिन भौतिकतज्ज्ञांनी कोणत्याही नवीन मूलकणांच्या अस्तित्वाला मान्यता दिली नसती म्हणून नवीन मूलकणांच्या अस्तित्वाची संकल्पना मांडण्याचा धीर मला झाला नाही." अर्थात **पॉल डिरॅक** यांनी शोधलेल्या नवीन समीकरणामुळे मात्र इलेक्ट्रॉन्स वीजकाइतके वस्तुमान असलेले धनभारित मूलकण असलेच पाहिजेत हे सिद्ध होत होते. म्हणूनच **डिरॅक** गंमतीने म्हणत असत, "माझ्यापेक्षा माझे हे-



अनुक्रमणिका

समीकरण अधिक हुशार होते.'' जे **पॉल डिरॅक** यांना जमले नाही ते त्यांच्या समीकरणामुळे निर्विवाद सिद्ध झाले.

१९२८ साली **पॉल डिरॅक** यांनी आपल्या समीकरणावरून प्रतिवस्तूच्या (Antimatter) अस्तित्वाचा प्रस्ताव मांडला असला तरी प्रत्यक्ष प्रयोगाने ही गोष्ट सिद्ध होण्यासाठी १९३२ साल उजाडावे लागले. त्याचे असे झाले -

**चार्लस् थॉम्सन रीज विल्सन** या स्कॉटिश भौतिकतजाने मूलकणांचा अभ्यास करण्याकरता १९१२ साली क्लाउड चेंबर विकसित केला होता. इ. स. १९३० साली कॅलटेकच्या प्रयोगशाळेचे प्रमुख **रॉबर्ट मिलिकन** यांनी **कार्ल अँडरसन** या तरुण भौतिकतज्ज्ञाला क्लाउड चेंबरच्या सहाय्याने कॉस्मिक (वैश्विक) किरणांचा अभ्यास करावयास सांगितले. दोन वर्षे **अँडरसन** सतत प्रयोग करीत होते. अवलोकनाच्या नोंदी ठेवीत होते. त्यावरून निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न करीत होते. २ ऑगस्ट १९३२ रोजी या अथक प्रयत्नांना यश आले. क्लाउड चेंबरच्या सहाय्याने **अँडरसन** यांनी अतिशय शक्तिमान विद्युतचुंबक तयार केला आणि काही वैश्विक किरण आले आहेत का हे शोधण्यासाठी त्यांचे छायाचित्रे घेतली. २ ऑगस्ट रोजी मिळालेल्या छायाचित्रामध्ये एक कण क्लाउड चेंबरपासून निघून डावीकडे वळलेला दिसला. त्याने आखलेला मार्ग, घेतलेले वळण आणि त्याच्या प्रवेगात झालेला बदल यावरून या कणाचे वस्तुमान इलेक्ट्रॉन (वीजक) कणाइतके असले पाहिजे असा निष्कर्ष त्यांनी काढला. पण तो ज्या दिशेने वळला त्यावरून तो धनभारित असला पाहिजे असे त्यांच्या लक्षात आले. तो इलेक्ट्रॉन, प्रोटॉन, न्यूट्रॉन (वीजक, धानक, वस्तुक) यापैकी कोणताही मूलकण नाही याबद्दल त्यांची खात्री होती. खरं म्हणजे ते छिद्र 'होल' होते. या नवीन मूलकणाला **अँडरसन** यांनी ''पॉझिटिव्ह इलेक्ट्रॉन'' म्हणजेच ''पॉझिट्रॉन'' असे नाव दिले. **पॉल डिरॅक** यांनी आपल्या समीकरणात ज्याची संभाव्यता व्यक्त केली होती तेच हे मूलकण ! भौतिकविज्ञानाच्या इतिहासात प्रथमच फक्त सैद्धांतिक दृष्ट्या नवीन मूलकणांच्या अस्तित्वाची संभाव्यता **पॉल डिरॅक** यांनी व्यक्त केली होती.

१९३२ साली पॉझिट्रॉन धनवीजक या मूलकणांचा शोध लागला. त्याच वर्षी जेम्स चॅडविक या केंब्रिजमधील भौतिकतज्ज्ञांनी 'न्यूट्रॉन' वस्तूक या मूलकणांचा शोध लावला. अणुच्या केंद्रस्थानी धनभारित प्रोटॉन्सच्या धानकाच्या बरोबर विद्युतभारविरहीत न्यूट्रॉन वस्तुक कण असतात असे **जेम्स चॅडविक** यांनी सिद्ध केले. एकंदरीत भौतिकशास्त्राच्या दृष्टीने १९३२ हे वर्ष खळबळजनक ठरले. इलेक्ट्रॉन्स (वीजक) आणि पॉझिट्रॉन्स (धनवीजक) हे एकमेकांना भेटले म्हणजे ते एकमेकांना नष्ट करतात. त्या प्रक्रियेत दोन फोटॉन्स-दोन प्रकाशझोत निर्माण होतात. याउलट फोटॉन्स जेव्हा वस्तुजालामधून जातात तेव्हा आभासी इलेक्ट्रॉन्स (वीजक) आणि आभासी पॉझिट्रॉन (धनवीजक) निर्माण होतात. स्तिमित करणाऱ्या ऋण ऊर्जा या संकल्पनेतून क्वांटम इलेक्ट्रोडायनॉमिकस हे नवीन शास्त्र उदयास आले. इ. स. १९३३ च्या सॉल्हवे परिषदेत पॉझिट्रान धनवीजक आणि न्यूट्रॉन्स



अनुक्रमणिका

(वस्तूक) या दोन मूलकणांवर सर्वांगपरिपूर्ण चर्चा झाली. या चर्चेत **नील्स बोर, क्युरी, पॉल डिरॅक, वुल्फगॉंग पॉली, वेर्नेर हाइझेनबर्ग** यासारख्या पुंजभौतिकी तज्ज्ञांनी उत्साहाने भाग घेतला. (बेल्जियम रासायनिक उद्योजक अर्नेस्ट सॉल्हवे यांच्या उदार दातृत्वामुळे प्रथितयश भौतिकतज्ज्ञांची परिषद दरवर्षी सॉल्हवे येथे भरत असे) पदार्थातील प्रोटॉन (धानक), इलेक्ट्रॉन (वीजक) याबरोबर नव्याने सिद्ध झालेले न्यूट्रॉन्स (वस्तुक), पॉझिट्रॉन्स (धनवीजक) यामुळे तज्ज्ञांमध्ये एक चैतन्याची लाट पसरली होती.

या मूलकणांची गती वाढली की त्यांच्यामधील ऊर्जा वाढते. पण मूलकणांची गती वाढविण्यासाठी त्यांचे त्वरण करणे आवश्यक असते. अशा प्रकारचे पहिले त्वरणयंत्र **वॉल्टन** आणि **कॉकरॅफट** या दोन ब्रिटिश शास्त्रज्ञांनी तयार केले. त्याला लिनिअर ॲक्सीलरेटर म्हणतात. १९३० साली **अर्नेस्ट लॉरेन्स** या कॅलिफोर्नियातील भौतिकज्ञाने सायक्लोट्रॉन नावाचे त्वरणयंत्र विकसित केले. या यंत्रामध्ये इलेक्ट्रॉनचा (वीजकाचा) वेग प्रकाशाच्या जवळपास पोचेल इतका वाढवतात. अशा सामर्थ्यशाली इलेक्ट्रॉनच्या (वीजकाच्या) सहाय्याने अणुकेंद्र दुभंगता येते. १९५० नंतरच्या दशकात अनेक प्रभावी त्वरणयंत्रे तयार होऊ लागली. त्यामुळे मूलकणांची ऊर्जा अफाट प्रमाणात वाढवण्यात शास्त्रज्ञांना सहज शक्य होऊ लागले.

पॉझिट्रॉन, ॲंटिमॅटर, पुंजयामिकी या डिरॅक यांनी लावलेल्या मूलभूत शोधांवर आधारित असलेले नवनवीन तंत्रज्ञान निर्माण केले. १९५५ साली **म्यूलर** यांनी फील्ड एमिशन मायक्रोस्कोप तयार केला. त्यासाठी १९३६ सालापासून १९ वर्षे त्यांचे अथक प्रयत्न चालू होते. इलेक्ट्रॉन मायस्क्रोस्कोपमुळे (वीजक सुक्ष्मदर्शकामुळे) विषाणुंसारखे (व्हायरस) सूक्ष्मजंतू न्याहाळता आले तरी अणुचे अंतरंग न्याहाळता येत नाही. पण **म्युलर** यांच्या नवीन सूक्ष्म दर्शकाच्या (मायक्रोस्कोपच्या) सहाय्याने धातूमधील अणुच्या पातळीवरील दोष सहज शोधता येतो.

पुंजयामिकीमुळे वीजक (इलेक्ट्रॉन), धानक प्रोटॉन, वस्तुक (न्यूट्रॉन), घनवीजक (पॉझिट्रॉन) यांसारख्या अतिसूक्ष्म डोळ्यांना न दिसणाऱ्या अद्‌भुत दुनियेचे ज्ञान शास्त्रज्ञांना झाले आणि त्याचा उपयोग करून नवनवीन तंत्रज्ञान विकसित केले. ट्रान्झिस्टर, सिलिकॉन चिप्स, अणुऊर्जा ॲटमबॉंब, लेझर बीम्य यासारख्या शेकडो उपकरणांमुळे निसर्गाबद्दलची शास्त्रज्ञांची जाण अधिकाधिक वृद्धिंगत झाली.

**पॉल डिरॅक** यांच्या पॉझिट्रॉन (धनवीजक) कणांचा उपयोग 'पॉझिट्रॉन एमिशन टोपोग्राफी' PET स्कॅनरमध्ये करतात. कार्बन (११), नायट्रोजन (१३), ऑक्सिजन (१५), फ्लोरीन (१८) यांसारख्या मूलकणांमधून पॉझिट्रॉन्स (धनवीजक) बाहेर टाकले जातात आणि या मूलकणांचा मानवी देहात स्वीकार होतो. हे कण मानवी देहात मागोवा-दर्शक (ट्रेसर) म्हणून काम करतात. माणसाच्या एखाद्या अवयवात दोष निर्माण झाल्यास तो या मागोवा-दर्शकामुळे (ट्रेसर्समुळे) शोधता येतो. तसेच शरीरात घडून येणाऱ्या जैवरासायनिक



अनुक्रमणिका

बदलांचाही अभ्यास या मागोवा-दर्शकांच्या सहाय्याने करता येतो. कोणत्याही रोगामध्ये शरीरातील अवयवांच्या रचनेत बदल घडून येतात, पण ते बऱ्याच उशीरा ! अवयवातील रचनेच्या बदलाच्या आधी जैवरासायनिक स्तरावर या रोगाचा प्रारंभ होत असतो. **पॉल डिरॅक** यांनी शोधलेल्या घनवीजक (पॉझिट्रॉन) या मूलकणांचा उपयोग करून काढलेल्या PET स्कॅनरच्या सहाय्याने आता हे जैवरासायनिक बदल प्रत्यक्ष घडत असताना तपासता येतात. म्हणजेच अवयवांच्या रचनेत बदल घडायच्या आधीच आपल्याला त्यांच्या कार्यातील बदल प्रतिमातंत्राच्या सहाय्याने शोधता येतात व रोग प्राथमिक अवस्थेत असतानाच रोगाचे निदान करण्यास मदत होते. कॅन्सर, चेतासंस्था व हृदयाशी संबंधित रोग, यासारख्या अनेक रोगांचे निदान रोग प्राथमिक अवस्थेत असताना करता येते. सर्व जगात असे एकूण १४० PET स्कॅनर्स अस्तित्वात आहेत आणि प्रतिवर्षी २० PET स्कॅनर्सची भर पडत आहे.

१९२८ साली **पॉल डिरॅक** यांनी इलेक्ट्रॉनच्या प्रतिप्रतिमेची संभाव्यता वर्तवल्यावर १९२९ पासून गणित आणि भौतिकशास्त्र या दोन्ही विषयातील अत्युच्च पद **पॉल डिरॅक** यांना देण्यात आले. १९३० साली रॉयल सोसायटीचे 'सन्मान्य सभासद' म्हणून **पॉल डिरॅक** यांची नेमणूक झाली. **पॉल डिरॅक** विद्यादानाचे पवित्र कार्य केंब्रिजमध्ये करीत होते. पुंजयामिकीसारखा दुर्बोध विषय सुबोध करून विद्यार्थ्यांना सांगत होते. पुंजयामिकी हा विषय जणु त्यांचा श्वास बनला होता. अध्ययन, अध्यापन, चिंतन या त्रिसूत्रीच्या सहाय्याने **पॉल डिरॅक** यांनी जवळजवळ दोनशे शोधनिबंध प्रकाशित केले. तसेच पुंजयामिकी या विषयावरील **पॉल डिरॅक** यांचे पुस्तकही १९३० साली प्रकाशित झाले. पुंजयामिकीवरील नितांतसुंदर पुस्तक म्हणून आजही शास्त्रीय जगतात ते नावाजले जाते. गेल्या शतकातील महत्त्वाच्या पुस्तकात **पॉल डिरॅक** यांच्या या पुस्तकाची गणना होते.

केंब्रिजमध्ये या सर्व जबाबदाऱ्या **पॉल डिरॅक** पार पाडत होते. परंतु या लोकांतानंतर त्यांना एकांत हवाहवासा वाटे. स्वभावत:च **पॉल** एकांतप्रिय असल्यामुळे आपल्या जीवनात एकांत आणि लोकांत यांचे सुरेख संतुलन त्यांनी साधले होते. संशोधन मार्गावरील एकांडे शिलेदार म्हणून ते प्रसिद्ध होते. "निर्मनुष्य बेटावरही आपले संशोधन आनंदाने करत राहतील असे फारच थोडे शास्त्रज्ञ आहेत. **पॉल डिरॅक** यांची गणना अशा शास्त्रज्ञांमध्ये करावी लागेल." असे गौरवोद्गार त्यांच्याविषयी इतर शास्त्रज्ञ काढत असत. त्यांनी आपल्या विचारांचा 'पंथ' तयार केला नाही.

**पॉल डिरॅक** जेव्हा एखादे भाषण देत असत किंवा एखादा लेख लिहित असत तेव्हा ते शब्दांची निवड चोखंदळपणे करीत. एखाद्या विषयाचे दरवाजे जर लेखकासाठी किंवा वक्त्यासाठी उघडलेले नसतील तर तो लेखक किंवा वक्ता वाचकांपर्यंत अथवा श्रोत्यांपर्यंत तो विषयी नीट पोचवू शकत नाही. अर्थात **डिरॅक** यांच्या बाबतीत तशी सुतराम् शक्यता नव्हती. निवडलेला विषय आणि त्या विषयाचा आशय याबद्दल **डिरॅक** यांच्या मनात कसलाही संदेह नसे. विचारांची मांडणी ते सुस्पष्टपणे करीत असत. श्रोत्यांपैकी कोणी एखादा



अनुक्रमणिका

मुद्दा समजला नसल्याचे सांगितले तर त्या मुद्याचे स्पष्टीकरण अत्यंत शांतपणे ते पुन्हा एकवार देत असत. त्यांच्या भाषणाची पद्धत उल्लेखनीय होती. **डिरॅक** यांची अभ्यासपूर्ण व्याख्याने ऐकण्याची संधी लाभलेले कितीतरी भाग्यवान आज जगभर कार्यरत आहेत. त्यांचे श्रोते त्यांच्या व्याख्यानाची तारीफ करताना म्हणतात, "**डिरॅक** यांच्या व्याख्यानाची तुलना जे. एस. बाख या संगीतज्ज्ञाशी करणे उचित होईल. संगीताच्या मैफलीत बाकने एखाद्या 'रागा'ची सुरुवात करावी, त्याच्या शिष्यगणांनी त्यांचा विस्तार करावा आणि सुरेल नादमधुर संगीताची मेजवानी श्रोत्यांना द्यावी तसे **डिरॅकचे** व्याख्यान असे. **डिरॅक** अत्यंत सुस्पष्ट शब्दात एखादा महत्त्वाचा सिद्धान्त सांगत असत आणि मग मोठ्या धीरोदात्तपणे आपल्या पुढील बोलण्यातून सहजी त्याची उकल करीत असत."

**डिरॅक** यांच्या एका विद्यार्थ्याने **डिरॅक** यांच्या व्याख्यानाच्या संदर्भात एक आठवण लिहून ठेवली आहे. तो विद्यार्थी म्हणतो, "**डिरॅक** यांची व्याख्याने ऐकण्यासाठी तत्त्वज्ञान, गणित, जीव, रसायन इत्यादि ज्ञानशाखांचे विद्यार्थी येत असत. त्यांची व्याख्याने विद्वत्ताप्रचुर असत आणि वेळोवेळी ते अनेक समीकरणे फळ्यावर लिहित असत. म्हणून मी एका विद्यार्थ्याला विचारले, "**डिरॅक** यांच्या बोलण्याचे आकलन तुम्हाला होते का?" त्यांनी नकारार्थी उत्तर दिल्यावर मी पुन्हा प्रश्न केला, "मग तुम्ही इतक्या नियमितपणे **डिरॅकच्या** व्याख्यानांना का हजेरी लावता?" त्यावर तो विद्यार्थी उत्तरला, "**डिरॅक** यांची पुंजयामिकीवरील व्याख्याने मी स्वत: ऐकली आहेत असे भविष्यात मोठ्या अभिमानाने आणि गर्वाने मला सांगता येईल म्हणून केवळ मी या व्याख्यानांना हजर राहतो." बहुतांश व्यक्तींना सुप्रसिद्ध व्यक्तिंशी आपले नाव संलग्न करून मोठेपणा मिरवायची हौस असते. त्याच प्रकारचे हे उत्तर होते.

एकदा **डिरॅक** यांच्या व्याख्यानानंतर श्रोत्यांमधील एकजण उठला आणि सर्व जाणकार श्रोर्तृवृंदासमोर दीर्घकाळ शेरेबाजी करू लागला. पण त्याला काय सांगायचे होते हे कोणालाच कळेना. इतक्या उत्तम व्याख्यानानंतर अशी असंबद्ध बडबड ऐकणे ही श्रोत्यांना एक शिक्षाच होती. लोक चिडले. पण **डिरॅकनी** शांतपणे त्याचे बोलणे ऐकून घेतले आणि शेवटी फक्त विचारले, "तो प्रश्न होता की टीका?" श्रोत्यांमध्ये हास्याची खसखस पिकली आणि तो माणूस खजिल झाला.

केंब्रिजमध्ये **डिरॅक** ज्ञानवंत, आदरणीय व्यक्तिरेखा म्हणून प्रसिद्ध होते. सैद्धान्तिक भौतिकशास्त्रातील चर्चासत्रे **डिरॅक** यांच्या ऑफिसच्या शेजारच्याच खोलीत होत असत. अशा चर्चासत्रांना **डिरॅक** आवर्जून उपस्थित राहात असत. असे म्हणतात की चर्चा संपेपर्यंत **डिरॅक** चक्क झोपत असत. पण चर्चा संपल्यावर चर्चासत्राच्या विषयाच्या संदर्भात **डिरॅक** अगदी 'टोकदार' प्रश्न विचारीत असत. हे प्रश्न इतके महत्त्वाचे असत की त्यांच्या उत्तरातून बहुतेक वेळा शोधनिबंध लिहिले जात. त्यावरून **डिरॅक** यांच्यावरील हा आक्षेप साधार वाटत नाही. उलट डोळे मिटून चाललेली चर्चा **डिरॅक** अतिलक्षपूर्वक ऐकत असावेत.



अनुक्रमणिका

अन्यथा इतके नेमके व परिणामकारक प्रश्न त्यांना विचारता आले नसते. पुंजयामिकींचे इतके सखोल ज्ञान **डिरॅक** यांना होते की नुसत्या चर्चेच्या विषयावरून ते नेमके आणि परिणामकारक प्रश्न विचारत असावेत असेही या घटनेचे स्पष्टीकरण संभवते.

इ. स. १९२९ साली **पॉल डिरॅक** आणि **वेर्नेर हाइझेनबर्ग** हे दोघे मिळून प्रथमच अमेरिकेला गेले. **डिरॅक** यांनी विस्कॉन्सिनच्या तर **हाइझेनबर्गने** शिकॅगोच्या विश्वविद्यालयात व्याख्याने दिली. त्याकाळी बहुतेक सर्व प्रवास बोटीने करीत असत. सॅन फ्रान्सिस्कोहून निघालेल्या 'शिन्यो मारु' जहाजातून हे भौतिकज्ञ प्रथम हवाई बेटावर व नंतर जपानला गेले. टोकिओ आणि कयोटो येथे दोघांनीही व्याख्याने दिली. दोघेजण त्यानिमित्ताने बरेच दिवस एकत्र राहिले. तेव्हा साहजिकच नुकत्याच शोधलेल्या डिरॅक समीकरणाबद्दल त्यांनी भरपूर चर्चा केली असेल असे इतरांना वाटले. परंतु **डिरॅक** म्हणाले, "इ. स. १९२९ साली मी आणि हाइझेनबर्ग जपानमध्ये आलो. पण आमच्यात या विषयावर काहीच संवाद झाला नाही. आम्हाला दोघांनाही विश्रांतीची गरज होती आणि 'भौतिकशास्त्र' या विषयापासून आम्हाला काही काळ दूर रहायचे होते. व्याख्याने सोडली तर भौतिकशास्त्राविषयी आम्ही कोणत्याही तऱ्हेची चर्चा केली नाही. फक्त आम्ही एकमेकांच्या व्याख्यानांना हजेरी लावत होतो."

**हाइझेनबर्ग** यांनी याच सफरीमधील **डिरॅक** यांचा लाजाळूपणा दाखविणारी एक आठवण नमूद केली आहे. **हाइझेनबर्ग** म्हणतात, "अमेरिकेहून जपानला जाताना आम्ही मोठ्या बोटीत एकत्र होतो. बोटीवरील समाजजीवनात सहभागी व्हायची मला हौस होती. उदा. संध्याकाळच्या नृत्यसमारंभात मी भाग घेत असे. **पॉलला** मात्र नृत्याची अजिबात आवड नव्हती. तो नुसता एका खुर्चीवर बसून राही. एकदा नृत्य झाल्यावर मी त्याच्या शेजारच्या खुर्चीवर जाऊन बसलो. त्याने मला विचारले, "हाइझेनबर्ग, तू नृत्य का करतोस?" मी म्हटले, "चांगल्या मुलींबरोबर नृत्य करण्यात एक वेगळाच आनंद मिळतो." हे ऐकून **पॉल** विचारात पडला. पाच मिनिटांनी त्यांनी विचारले, "**हाइझेनबर्ग,** त्या मुली चांगल्या आहेत हे तुला आधीच कसं कळतं?"

**पॉल डिरॅक** यांना गणिताची विलक्षण आवड होती. त्या विषयात त्यांना उत्तम गती होती. भौतिकशास्त्राचे नियम गणिती समीकरणांनी सिद्ध केले पाहिजेत असा त्यांचा आग्रह असे. गणित विजयाचा सखोल अभ्यास **पॉल डिरॅक** यांनी शिष्यवृत्ती मिळवून केला होता. या तपश्चर्येचे फळ त्यांना मिळाले. ३० सप्टेंबर १९३२ साली **पॉल डिरॅक** यांची 'ल्युकेशियन चेअर ऑफ मॅथमॅटिकस' या गणित विषयाच्या सन्माननीय व अत्युच्च पदी नियुक्ती झाली. एकेकाळी **आयझॅक न्यूटन** यांनी हे पद भूषविले होते. **पॉल डिरॅक** यांच्या गणिती योगदानाची ती पोचपावती होती. इ. स. १९६९ सालापर्यंत सतत ३७ वर्षे त्यांनी हे पद भूषविले. एखादी उत्तम कलाकृती पाहून कलावंताला जसा आनंद होतो तसाच आनंद उत्तम समीकरण पाहून **डिरॅक** यांना होत असे. १९५५ साली मॉस्को विश्वविद्यालयात व्याख्यान देत असताना **पॉल डिरॅक** यांनी फळ्यावर एक सुविचार लिहिला. तो असा -



अनुक्रमणिका

"भौतिक नियमांना गणिती सौंदर्य असले पाहिजे." **डिरॅक** यांचा हा संदेश विश्वविद्यालयात ठळक अक्षरात लिहिला आहे. या संदेशाचा अर्थ गणिताचे विद्यार्थी सार्थ करीत आहेत.

'पुंजक्षेप्रसिद्धान्त आणि त्याचे उपयोजन' याबद्दल **पॉल डिरॅक** आणि **श्रॉडिंजर** या उभयतांना १९३३ साली विज्ञानातील सर्वोच्च **नोबेल** पुरस्कार मिळाला. प्रसिद्धी पराङ्मुखतेमुळे **पॉल डिरॅक** यांनी हा पुरस्कार नाकारण्याचे ठरविले. परंतु "हा पुरस्कार नाकारलास तर तुला अधिक प्रसिद्धी मिळेल" असे **रुदरफोर्ड** यांनी सांगितल्यामुळे हा पुरस्कार घेण्याचे त्यांनी मान्य केले. १९३३ सालापर्यंत पॉलचे त्याच्या वडिलांशी काहीही संबंध नव्हते. म्हणून प्रत्यक्ष पारितोषिक घ्यायला स्टॉकहोमला जाताना **डिरॅक** फक्त आपल्या आईला घेऊन गेले. पारितोषिक वितरण समारंभात त्यांनी भाषण केले. या जगन्मान्य पारितोषिकामुळे **डिरॅक** चांगलेच प्रकाशझोतात आले. "हरणासारखे लाजाळू आणि व्हिक्टोरियन मेडप्रमाणे विनयशील' असे त्यांचे वर्णन् पत्रकारांनी केले. "समस्त स्त्रीवर्गाची भीती बाळगणारा प्रतिभावंत" या शब्दात **डिरॅक** यांचा गौरव केला.

इ. स. १९३४-३५ साली **डिरॅक** अमेरिकेतील प्रिन्स्टन विश्वविद्यालयात होते. त्याच विश्वविद्यालयात नोबेल पारितोषिक विजेते **युजीन विग्नर (१९०२-९५)** हे प्राध्यापक म्हणून काम करीत होते. तेव्हा त्यांची बहिण **मार्जिट विग्नर बालाझ** ही त्यांच्याकडे रहायला आली होती. ती बुडापेस्ट येथे रहात असे. ती घटस्फोटिता होती. पहिल्या विवाहापासून तिला गॅब्रिएल हा मुलगा आणि 'ज्युडीथ' ही मुलगी होती. सर्व नातेवाईक आणि मित्रमंडळीत मार्जिट 'मान्सी" या नावाने प्रसिद्ध होती. मान्सी आणि **पॉल डिरॅक** येथेच प्रथम एकमेकांना भेटले. परस्परांना खऱ्या अर्थाने समजून घेतले. आपापल्या पूर्वायुष्यातील पूर्वस्मृतींना उजाळा दिला. दोघांचेही पूर्वायुष्य मानसिक ताणतणावपूर्ण होते. आता पुढील जीवनात एकमेकांना साथ देऊन खऱ्या अर्थाने आपल्याला सुखी होता येईल अशी खात्री वाटल्यावरच ती उभयता १९३७ साली विवाहबद्ध झाली. केंब्रिज ही **पॉलची** कर्मभूमी होती. म्हणून ती दोघे केंब्रिजला आली. त्यांनी केंब्रिजमध्ये खूप मोठे घर घेतले. घरासभोवती बगीचा होता. पत्नी म्हणून मान्सीने **पॉलना** उत्तम साथ दिली. **पॉलला** तिने खऱ्या अर्थाने समजून घेतले. कधी कधी एकलकोंडा, अबोल, चिंतनात सदैव निमग्न असणारा **पॉल** इतरांशी संबंध ठेवण्याच्या दृष्टीने विचित्र वागत असे. तरीही मान्सी त्यांना सांभाळून घेत असे. कधी कधी मान्सी सौम्य शब्दात त्यांच्या चुका त्यांना दाखवून देत असे.

**ईस्थर** आणि तिचे पती मायर लंडनमध्ये राहात तर **पॉल** आणि मान्सी केंब्रिजमध्ये ! दोघेही एकमेकांच्या घरी अनेकदा रहायला जात. तेव्हा सुरुवातीच्या काळातली **मान्सीने ईस्थरला** सांगितलेली एक आठवण पॉलच्या चिंतशीलतेवर प्रकाश टाकणारी आहे. एकदा एक डॉक्टर आणि त्यांची पत्नी यांनी **डिरॅक** पति-पत्नीना चहापानाचे आमंत्रण दिले. दोघांनीही त्याला मान्यता दिली. नियोजित दिवशी **मान्सी** तयार होऊन पॉलला घेण्यासाठी केंब्रिजमध्ये गेली. पॉल संशोधनात व्यस्त होते. हा व्यत्यय त्यांना नको होता, "माझे चिंतन

अजून पूर्ण झालेले नाही.'' असे सांगून त्यांनी फ्रेंच दांपत्याकडे चहाला जाण्यास नकार दिला. मान्सी एकटीच तिथे गेली. **पॉलच्या** न येण्याबद्दल काहीतरी सबब सांगून तिने वेळ मारुन नेली. चहाची जय्यत तयारी होती. अनेक पाहुणे मंडळी जमली होती. **पॉलने** मान्सीला चांगलेच अडचणीत टाकले होते.

**मान्सीच्या** पहिल्या विवाहापासून झालेल्या दोन्ही मुलांनी **'डिरॅक'** हेच नाव घेतले. ती दोघेही उत्तम गणितज्ज्ञ झाली. मान्सी आणि डिरॅक यांनाही दोन मुली झाल्या- मोनिका (१९४०) आणि फ्लॉरेन्स (१९४२). **पॉलचे** वडील १९३६ सालीच निवर्तले. पॉलचे वडिलांशी फारसे पटत नव्हतेच. त्यामुळे वडिलांच्या मृत्यूनंतर 'मला आता फार मोकळं वाटतंय' असं **पॉल डिरॅक** म्हणत असत. पतिनिधनानंतर पॉलची आई कॅव्हेंडिशमधील त्याच्या घरी वरचेवर येऊ लागली. त्याच घरी १९४१ साली तिने या जगाचा निरोप घेतला. आपल्या मुलाचा बौद्धिक विकास, संशोधनातील अपूर्व कामगिरी, पुंजयामिकीला दिलेले योगदान, अत्युच्च सन्मान हे सर्व त्या मातेने डोळे भरून पाहिले. तिचे जीवन कृतार्थ झाले!

१९३३ साली **डिरॅक** यांनी त्यांचे मित्र **प्योट्र कपिट्झा** (१८९४ ते १९४४) यांच्याबरोबर प्रकाशाच्या स्थिरलहरींमुळे इलेक्ट्रॉन्स (वीजक) कसे परावर्तित केले जातात याबद्दलचे सैद्धान्तिक संशोधन केले. हा सिद्धान्त **'कपिट्झा-डिरॅक** परिणाम' म्हणून ओळखला जाऊ लागला. प्रत्यक्ष प्रयोगाने हा परिणाम सिद्ध व्हायला अर्धशतकाहून अधिक काळ जावा लागला. १९६८ साली शास्त्रज्ञांनी प्रयोग करून डिरॅक कपिट्झा परिणामाची सत्यता पडताळली. कपिट्झा आणि डिरॅक यांच्यात घरगुती मैत्रीचे संबंध होते. **डिरॅक** यांच्या विषयीच्या **कपिट्झाने** नोंदविलेल्या आठवणींना उजळा देणे उचित ठरेल.

**कपिट्झा** हे रशियन भौतिकतज्ज्ञ. विलक्षण बुद्धीमान. कमी तापमानावरील **कपिट्झा** यांचे संशोधन उल्लेखनीय आहे. एकदा **डिरॅक** आणि **कपिट्झा** गप्पा मारत बसले होते. गप्पांचा विषय होता. साहित्य. दोस्तोएव्हस्कीच्या 'क्राइम ॲंड पनिशमेंट' या जगप्रसिद्ध कादंबरीबद्दल ते बोलत होते. 'ही कादंबरी तुला कशी काय वाटली?' असा प्रश्न कपिट्झानी विचारला. डिरॅक उत्तरले, ''ती कादंबरी खूप छान आहे. पण एका प्रकरणात लेखकाने एक चूक केली आहे. लेखकाने त्या कादंबरीत एकाच दिवशी दोनदा सूर्योदय झाल्याचे दाखविले आहे.'' एका विचक्षण बुद्धीच्या भौतिकज्ञाने असामान्य बुद्धीच्या कादंबरीकाराची अनवधानाने झालेली चूक नजरेस आणून दिली.

**डिरॅक** एकदा **कपिट्झा** यांच्या घरी गेले होते. **डिरॅक** आणि **कपिट्झा** भौतिकशास्त्रावरील सिद्धान्तावर चर्चा करीत होते आणि सौभाग्यवती कपिट्झा स्वेटर विणत बसल्या होत्या. अचानक डिरॅक त्यांना म्हणाले, ''आन्या, तुझी स्वेटर विणण्याची पद्धत मी बघत होतो. तेव्हा मला टोपॉलॉजीची आठवण झाली. ही स्वेटरची वीण आणखी एका पद्धतीने घालता येईल. हा स्वेटर विणण्याच्या एकंदरीत फक्त दोनच पद्धती पाहिजेत. त्यातल्या एका पद्धतीने तर तू आता विणते आहेस आणि दुसरी ......... '' ही दुसरी



अनुक्रमणिका

पद्धत डिरॅक यांनी आन्याला समजावून सांगितली. सौ. **कपिट्झा** अवाक् होऊन **डिरॅक** यांच्याकडे पहातच राहिल्या. "बहुतेक बायका तू सांगितलेल्या दुसऱ्या पद्धतीने स्वेटर विणतात. त्या पद्धतीला पर्लींग असे म्हणतात." त्या उत्तरल्या पुंजसिद्धांत, किचकट समीकरणे यासारख्या अतिगहन विषयावर सतत चिंतन करणारे **डिरॅक** एका विशिष्ट बौद्धिक पातळीवरून सर्व जग न्याहाळत असावेत. म्हणूनच विणकामासारख्या साध्या बायकी विषयाचा विचार त्यांनी टोपॉलॉजीच्या दृष्टीने केला.

[ विसाव्या शतकात लिऑनहार्ड ऑयलर या गणितज्ज्ञाने 'टोपॉलॉजी' ही गणिती शाखा निर्माण केली. ज्या भूमितीय आकृत्यांचे गुणधर्म सातत्याने रूपांतर करूनही बदलत नाहीत अशा वस्तूंचा अभ्यास म्हणजे टोपॉलॉजी. हा विषय अत्यंत क्लिष्ट असल्यामुळे **डिरॅकसारख्या** गणितात अनन्यसाधारण गती असणाऱ्या व्यक्तीनाच त्याचा अभ्यास करता येतो. ]

**पॉल डिरॅक** यांना ऐन तारुण्यात अवघ्या एकतिसाव्या वर्षी विज्ञानाचा अत्युच्च पुरस्कार मिळाली. यानंतरही त्यांचे संशोधनकार्य सतत चालू राहिले. परंतु या कामाकडे शास्त्रीय जगताचे काहीसे दुर्लक्ष झाले. १९२५ ते १९३३ या काळात त्यांनी पुंजयामिकीला जे अनन्यसाधारण योगदान दिले ते आपण अभ्यासले. कदाचित या दैदिप्यमान संशोधनामुळेच त्यांचे पुढील आयुष्यात केलेले कार्य काहीसे झाकोळले गेले असावे. अर्थात त्यामुळे त्या कार्याचे महत्त्व तीळभरही कमी होत नाही. उलट जसजसा काळ पुढे पुढे जातो तसतसे त्यांच्या कार्याचे महत्त्व शास्त्रज्ञांना अधिकाधिक पटू लागते.

१९३३ सालानंतर **डिरॅक** यांनी एका वेगळ्याच विषयात लक्षत घातले. पदार्थांच्या समधानक (आयसोटोप्स) वायुरूप मिश्रणामधून सगळे समधानक (आयसोटोप्स) कसे वेगवेगळे करायचे ते शास्त्रज्ञांना उलगडले नव्हते. **डिरॅक** यांनी त्याकरिता अपकेंद्री पद्धत शोधली. हे सर्व प्रयोग **डिरॅक** यांनी स्वत:च करून पहावेत असा **कपिट्झा** यांचा आग्रह होता. मित्राच्या विनंतीला मान देऊन **डिरॅक** यांनी स्वत: काही प्रयोग केले. इ. स. १९४० साली ॲटमबॉंब तयार करण्यात शास्त्रज्ञ गुंतले होते. अर्थात या कामगिरीसाठीसुद्धा **पॉल डिरॅक** हे अनौपचारिक सल्लागार बनले. दुसऱ्या महायुद्धात त्यांनी अगदी वेगळ्या पद्धतीनी आपले योगदान दिले. केंब्रिजमधील सेंट जॉन कॉलेजची स्वत:ची एक अग्निशामक (फायर फाइटर) समिती होती. **डिरॅक** या समितीचे कार्यकारी सभासद होते. या दोन्ही कामगिऱ्या म्हणजे **डिरॅक** यांच्या दृष्टीने एक प्रकारचे विषयांतर होते. पण हाती घेतलेल्या या जबाबदाऱ्या **डिरॅक** यांनी पार पाडल्या. पुढीला आयुष्यात मात्र **डिरॅक** यांनी आपल्या आवडत्या गणित या विषयातच लक्ष घातले. भौतिकशास्त्राला पूरक अशी नवनवीन गणिती समीकरणे शोधली.

**पॉल डिरॅक** यांचा गणित हा सर्वात आवडता विषय होता. एखादा कलावंत देहभान विसरून तासन्तास कलाकृती निर्माण करण्यात घालवतो. त्याप्रमाणे **डिरॅक** यांना गणितीय

समीकरणांशी खेळण्यास आवडत असे. गणितासारख्या सुंदर विषयाचा आस्वाद लुटण्यासाठी गणिती साम्राज्यात यथेच्छ क्रीडा करावी आणि मग त्यातून भौतिकशास्त्राचे काही नवीन नियम सांगता येतात का ते पहावे असे त्यांना वाटत असे. वयाच्या छत्तिसाव्या वर्षी **डिरॅक** यांनी प्रतिपादन केले, ''एखाद्या गणितज्ज्ञाला जे नियम कुतूहलजनक वाटतात तेच नियम निसर्गातही आढळतात, असे अनेक वर्षांच्या अनुभवावरून माझ्या लक्षात आले आहे.'' वाढत्या वयाबरोबर ज्ञान आणि अनुभवाची भरभक्कम ठेव **डिरॅक** यांच्याजवळ जमा झाली होती. साठाव्या वर्षी गणिताबद्दलचे आपले प्रेम व्यक्त करताना **डिरॅक** म्हणतात, ''मला समीकरणांशी चाळा करण्याची विलक्षण आवड आहे. गणितीयदृष्ट्या एकमेकांशी संबंधित असलेली समीकरणे शोधण्याचा मला नाद आहे. त्या समीकरणांना भौतिक अर्थ नसला तरी मला त्या समीकरणातील सौंदर्याची भुरळ पडते. मला वाटतं इतर भौतिकज्ञांना तशी आवड नसावी. 'समीकरणांशी खेळ' हे माझे वैशिष्ट्य आहे.'' अठ्ठ्याहत्तराव्या वर्षी गणिताबद्दलचे आपले परिपक्व आणि गोळीबंद विचार व्यक्त करताना **डिरॅक** म्हणतात, ''खरं पाहिलं असता एखादी विशिष्ट समस्या सोडविण्याच्या उद्देशाने मी भौतिकशास्त्रांतील संशोधन केले नाही. भौतिकतज्ज्ञांना ज्या प्रकारच्या गणितीय राशी वरचेवर वापराव्या लागतात अशा राशींचा मी अभ्यास केला, अशा अनेक राशींची आगळ्यावेगळ्या पद्धतीनी जोडणी केली. त्यांचा एकमेकांशी असलेला अनोखा संबंध शोधला आणि प्रस्थापित केला. या गणितीय राशींची प्रयोज्यता (application) आहे की नाही याला मी महत्त्व दिले नाही. कालांतराने एखाद्या राशीची प्रयोज्यता आहे असे लक्षात येत असे पण त्याला सुयोग म्हणावे लागेल.'' **डिरॅक** यांच्या गणिती कार्यप्रणालीचा परिपाक म्हणजे **डिरॅक** समीकरण, क्षेत्रसिद्धान्त, मोनोपोल्स आणि शेवटी शोधलेले **डिरॅक** समीकरण ! गणित हा इतरांना अवघड वाटणारा विषय सौंदर्यपूर्ण केव्हा होतो हे सांगताना **डिरॅक** म्हणतात, ''निसर्गातील मुलभूत नियम गणिती सूत्रात व्यक्त करण्याचा प्रयत्न संशोधक करत असतो तेव्हा त्याने गणिती सौंदर्य मिळवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सौंदर्याला प्राधान्य देऊन साधेपणाला गौणत्त्व दिले पाहिजे. बहुतेक वेळा सरलता आणि सौंदर्य या दोन्ही गोष्टी साधण्याकरता लागणाऱ्या गोष्टी समान असतात. पण या दोनपैकी फक्त एका गोष्टीची निवड करण्याची वेळ आली तर संशोधकाने सौंदर्यालाच प्राधान्य दिले पाहिजे.''

भौतिकशास्त्रात प्रगती करायची असेल तर गणिताची कास धरली पाहिजे. भौतिकशास्त्रातील अलिबाबाची गुहा उघडण्याचा 'गणित' हा परवलीचा शब्द आहे याची त्यांना खात्री होती. आयुष्याच्या अखेरीस भौतिकतज्ज्ञांना **डिरॅक** यांनी दिलेला संदेश विज्ञानदिंडीच्या वारकऱ्यांसाठी मोलाचा आहे. ''गणितशास्त्र वाट दाखवील त्या दिशेने तुम्ही गेले पाहिजे. गणितीय संकल्पनांचा मागोवा घेत त्याचे परिणाम काय होतात याचा शोध घेताना कदाचित तुम्ही विज्ञानाच्या एखाद्या अनोळखी दालनात प्रवेश कराल. फक्त भौतिकी कल्पनांचा विकास केला तर आपण कधीच जाणार नाही अशा दिशेने आपल्याला नेण्याची



अनुक्रमणिका

क्षमता फक्त गणितातच असते.''

१९७७ साली नोबेल पारितोषिकाबद्दल बोलताना डिरॅक म्हणाले, ''गणितीय सौंदर्याचे मला आणि **श्रॉडिंजर** यांना आकलन होते, गणितीय सौंदर्याचे रसग्रहण आणि गौरव करण्याची आम्हा दोघांना ओढ होती याचा प्रभाव आमच्या कामावर सतत पडत असे. 'निसर्गातील मुलभूत नियम स्पष्ट करणाऱ्या कोणत्याही समीकरणात आगळेवेगळे सौंदर्य असते.' असा आम्हा दोघांनाही विश्वास वाटत असे. हा जणु काही आमचा 'धर्म' झाला होता. अर्थात हा धर्म आम्हाला फलदायक झाला. पुढील आयुष्यात आम्ही संपादन केलेल्या यशाचे हेच गमक होते.

**पॉल डिरॅक** हे मितभाषी होते. पत्रकार मुलाखत घेण्यासाठी त्यांच्यामागे तगादा लावीत. एकदा त्यांनी मुलाखत देण्याचे नाइलाजाने कबूल केले. पण मुलाखतकारांनी एक मोठी प्रश्नावलीच त्यांच्या पुढ्यात टाकली. ती पाहून आपण फारच मोठ्या अडचणीत सापडलो आहोत असे त्यांच्या लक्षात आले. ते म्हणाले, ''तुम्ही हे प्रश्न माझ्या संशोधनातील सहकाऱ्यांना का नाही विचारीत?'' पत्रकारांना ते मान्य होईना. शेवटी त्यांनी अवघ्या २५ शब्दात ती मुलाखत संपवली. ''मला विज्ञानाच्या तत्त्वज्ञानाबद्दल काहीही माहिती नाही.'' हे सहा शब्द त्यापैकीच होते. मुलाखतकार नाराज झाला परंतु इतर सहकाऱ्यांनी त्याची समजूत घातली. **पॉल डिरॅक** हे सर्वसाधारणपणे फक्त तीनच शब्द उच्चारतात, ''होय, नाही, आणि मला माहीत नाही'' या स्पष्टीकरणामुळे मुलाखतकाराचा गैरसमज दूर झाला.

**पॉल डिरॅक** यांचा आणखी एक गुणविशेष विलक्षण होता. त्यांच्या प्रत्येक वागण्यात बोलण्यात पारदर्शी प्रामाणिकपणाचे दर्शन होई. आपल्या चुकांवर पांघरूण घालण्याचा प्रयत्न त्यांनी कधीही केला नाही. उलट सर्व उपस्थितांसमोर ते आपल्या चुकांची कबुली देत किंवा आपल्या लेखनातही मोकळेपणाने त्या चुकांचा स्पष्ट उल्लेख करीत. सर्वसामान्य माणसांतही अभावाने आढळणारा हा गुणविशेष **पॉल डिरॅक** यांच्यासारख्या असामान्य शास्त्रज्ञात ओतप्रत भरून राहिला होता.

**ईस्थरने** प्रकाशित केलेल्या **डिरॅक** यांच्याबद्दलच्या काही स्मृती याआधी दिल्याच आहेत. **ईस्थरचे** पती **मायर** हे ख्यातनाम डॉक्टर होते. **पॉल** आणि **मान्सी** ही उभयता अनेकदा **ईस्थर-मायर** यांच्या घरी मुक्कामाला येत असत. **मायर** आणि **पॉल** फिरायला बाहेर पडत. त्या आठवणींना उजाळा देताना **मायर** म्हणतात, ''मूकपणाने चालण्यास जर आपली हरकत नसेल तर **पॉल**बरोबर खुश्शाल फिरावे. आमच्या दोघांच्या प्रकृति मिळत्याजुळत्या असल्यामुळे आमच्यात मतभेद होत नसत.''

**पॉल डिरॅक** यांनी **ईस्थर-मायर** दांपत्याला त्यांच्या घरच्या आदरातिथ्याबद्दल आणि वास्तव्याबद्दल आभार मानणारी अनेक पत्रे लिहिली आहेत. एका पत्रात पॉल म्हणतात, ''तुझ्याबरोवर झालेली भौतिकशास्त्रावरील चर्चा आनंददायी होती. नेचर, अेंडेव्हर यासारख्या नियतकालिकामधील मुलभूत जीवशास्त्रावरील लेख मी आवर्जून वाचतो. त्याविषयी माझ्या



अनुक्रमणिका

मनात अनेक शंका निर्माण होतात, पण त्या शंकांचे निरसन करणारे कोणी मला भेटत नव्हते. **डॉ. मायर** यांनी मात्र माझ्या सर्व प्रश्नांची उत्तरे दिली. त्यामुळे त्या विषयाची माझी जाण चांगलीच वाढली. अशा प्रकारच्या अनेक भेटीगाठी यापुढेही होत राहतील याची मला खात्री वाटते.'' खऱ्या प्रतिभावंताला कोणताही विषयाचे वावडे नसते हेच खरे !

इ. स. १९७२ साली इटलीमधील ट्रिस्टे येथे **पॉल डिरॅक** यांच्या सन्मानार्थ भोजनसमारंभ आयोजित केला होता. त्या प्रसंगी त्यांचे मित्र व सहकारी **जगदीश मेहरा** यांनी त्यांच्याविषयीची एक मजेदार आठवण सांगितली. ती त्यांच्याच शब्दात देत आहे. ''१९५५ साली केंब्रिजमध्ये माझी आणि **पॉल डिरॅक** यांची प्रथमच भेट झाली. मी गॉटिंजेनमध्ये **हाइझेनबर्ग** यांच्याबरोबर काम करून नुकताच इंग्लंडला परतलो होतो. माझ्या एका मित्राने माझी **डिरॅक** यांच्याशी भेट घडवून आणण्याचे कबूल केले. आम्ही दोघेजण सेंट जॉन कॉलेजमध्ये गेलो. प्रोफेसर **डिरॅक** तेथे बसले होते. इंग्लंडमध्ये हवापाण्याच्या गप्पांनी संभाषण सुरू करण्याचा प्रघात आहे. तेथे तो शिष्टाचार समजला जातो. म्हणून मी डिरॅक यांना म्हटले, ''सर, आज खूप वारा सुटला आहे.'' पण ते काहीच बोलले नाहीत. क्षणभराने ते उठले आणि तेथून निघून गेले. मला वाटलं माझं काहीतरी चुकलं असावं. पण डिरॅक दरवाजाजवळ गेले. दरवाजा उघडून बाहेर नजर टाकली. आणि पुन्हा दरवाजा बंद करून शांतपणे आपल्या जागेवर बसले आणि म्हणाले, ''होय.''

**पॉल डिरॅक** यांचे जीवन विज्ञानमय होते आणि हे विज्ञान म्हणजे ''भौतिकशास्त्र'' होते ! त्यांची जीवनशैली एखाद्या तपस्व्यासारखी होती. धूम्रपानापासून ते चार हात दूर असत. दारुच्या थेंबालाही ते स्पर्श करीत नसत. ''प्रसिद्धीपराङ्मुखता' हा त्यांचा सहजस्वभाव होता. त्यांची मते निरीश्वरवादाकडे झुकणारी असली तरी ते अधूनमधून चर्चमध्ये प्रार्थनेसाठी जात असत.

इ. स. १९५० च्या सुमारास **पॉल डिरॅक** भारतात आले होते. टाटा इन्स्टीट्यूट ऑफ फंडामेंटल रिसर्च या मुंबईतील संस्थेमध्ये 'पुंजयामिकी' या आपल्या आवडत्या विषयावर त्यांनी व्याख्याने दिली होती. ही व्याख्याने ऐकण्याची संधी मिळालेले काही भाग्यवान भारतीय भौतिकतज्ज्ञ अजूनही हयात आहेत. त्यावेळची एक आठवण येथे नमूद करण्यासारखी आहे. त्यावेळी **डिरॅक** यांचा मुक्काम हॉटेलमध्ये होता. त्यांची वैयक्तिक भेट घेण्यासाठी एक गृहस्थ हॉटेलवर गेलो व आपली इच्छा त्यांच्या पत्नीजवळ व्यक्त केली. ''**पॉल** व्याख्यानाची तयारी करीत असल्यामुळे कृपा करून त्यांच्या कामात व्यत्यय आणू नका.'' असे त्यांच्या पत्नी **मान्सी** यांनी सांगितले. वास्तविक त्यांचा 'श्वास' बनलेल्या या विषयावर **डिरॅक** यांनी अनेक व्याख्याने दिली होती. तरीसुद्धा भारतीय भौतिकज्ञांसमोर हा विषय कसा मांडावा याचे चिंतन ते करीत होते. हे वाचून रविंद्रनाथ टागोरांची आठवण होते. गीतांजली सारखे अजरामर काव्य लिहिणारे नोबेल पारितोषिकाचे मानकरी - पण लहान मुलांच्या वर्गावर शिकवायला जातानासुद्धा आपला पाठ तयार करीत !

याच मुक्कामात **पॉल डिरॅक** कलकत्त्याला गेले. १९२४ साली **सत्येंद्रनाथ बोस** (१८९४-१९७४) यांनी इलेक्ट्रॉन (वीजक), फोटॉन यासारख्या मूलकणांच्या समूहाचे संख्याशास्त्रीय नियम शोधले. या संख्याशास्त्राला **बोस आइन्स्टाइन 'स्टॅटिस्टिक्स'** असे

म्हणतात. हे नियम पाळणाऱ्या इलेक्ट्रॉन्स (वीजक), फोटॉन्स सारख्या मूलकणांना 'बोसॉन्स' या नावाने ओळखतात. **डिरॅक** यांनी **सत्येंद्रनाथ बोस** यांची प्रत्यक्ष भेट घेतली. गप्पांच्या ओघात 'रॉयल सोसायटीने **बोस** यांना अजूनही सन्माननीय सभासद ही पदवी दिली नाही' हे **पॉल डिरॅक** यांना समजले. त्यांना फार आश्चर्य वाटले. पण नुसते आश्चर्य व्यक्त करून **डिरॅक** थांबले नाहीत. इंग्लंडमध्ये परतल्यावर त्यांनी **एस. एन. बोस** यांच्या नावाची शिफारस रॉयल सोसायटीकडे केली. लवकरच **बोस** यांना 'सन्मान्य सभासदाचा' बहुमान देण्यात आला. (डॉ. जयंत नारळीकर यांनाही हा बहुमान देण्यात आला आहे)

कलकत्त्यानंतर **पॉल डिरॅक** दिल्लीला आले. तेव्हाचे पंतप्रधान जवाहरलाल नेहरू यांनी त्यांची भेट घेतली. नेहरूंनी त्यांना विचारले, "स्वतंत्र भारताचा सर्वांगीण विकास घडवून आणण्यासाठी आम्ही काय केले पाहिजे?" त्यावर **डिरॅक** उत्तरले, "एक सामाईक भाषा-ती शक्यतो इंग्लिश असावी; पाकिस्तानशी सलोख्याचे शांतिपूर्ण संबंध आणि **मेट्रिक सिस्टीम."** **पॉल डिरॅक** यांच्या या उत्तरात त्यांचे द्रष्टेपण प्रतीत होते. त्यांच्या तीन सूचनांपैकी **मेट्रिक पद्धती** (दशमान पद्धती) ताबडतोब अमलात आणली गेली. इंच, फूट या परिमाणांना सुट्टी मिळाली. सैद्धान्तिक आणि व्यावहारिक पातळीवर मि. मी, सें. मी, किलोग्रॅम इ. परिमाणे वापरात आली. इंग्लिश ही ज्ञानभाषा झाल्यामुळे आपण कळतनकळत राष्ट्रीय स्तरावर तिचा स्वीकार केलाच आहे. सध्याची राजकीय परिस्थिती, काश्मिर प्रश्न, दहशतवाद पाहता त्यांची तिसरी सूचना किती योग्य होती याचा प्रत्यय आपल्याला आजही येत आहे.

इ. स. १९६९ साली **डिरॅक** निवृत्त झाले. आयुष्यभर केंब्रिजमध्ये ज्ञानोपासना केल्यावर निवृत्तीनंतर इंग्लंडमध्येच आपल्याला काही सन्मान्य पदावर नेमणूक मिळावी अशी **पॉल डिरॅक** यांची इच्छा होती. परंतु तसे घडले नाही. म्हणून ते अमेरिकेला गेले. प्रिन्स्टन व इतर विश्वविद्यालयात काही वर्षे काम केल्यानंतर **तालाहासी** येथे प्राध्यापक म्हणून काम करण्यास त्यांनी सुरुवात केली. **डिरॅक** तेथेच स्थायिक झाले आणि अखेरपर्यंत तेथेच राहिले. १९७३ साली इंग्लंडच्या राणीने त्यांचा सन्मान केला. या पारितोषिकाचा स्वीकार करण्यासाठी ते बकिंगहॅम राजवाड्यात गेले. **पॉल डिरॅक** यांना असे अगणित मानसन्मान लाभले. कित्येक विश्वविद्यालयांनी त्यांना डॉक्टरेट देऊ केली पण त्यांनी नम्रमणे त्यास नकास दिला. एक संपूर्ण तप त्यांनी फ्लॉरिडामध्ये प्राध्यापक म्हणून काम केले. या कालखंडात **पॉल डिरॅक** यांनी एकूण 'साठ' शोधनिबंध प्रकाशित केले.

फ्लॉरिडामधील **पॉल डिरॅक** यांच्या सहकाऱ्यांनी. सांगितलेल्या आठवणी त्यांच्या निगर्वी वृत्तीची आणि साधेपणाची साक्ष देतात. त्यांचे सहकारी म्हणजात, "**पॉल डिरॅक** यांना न्यूयॉर्क, मियामी इत्यादि विश्वविद्यालयातून बोलावणी आली होती. परंतु तिथे चालायला जायची सोय नाही म्हणून त्यांनी ती नाकारली. फ्लॉरिडामध्ये ते रोज कॉलेजमध्ये चालत जात. हे अंतर एक किलोमीटरहून अधिक होते. त्यांना पोहण्याची खूपच आवड होती. तालाहासी विश्वविद्यालयात काम करणे त्यांना मनापासून आवडत असे. केंब्रिजमध्ये असेपर्यंत ते शिकवण्यापुरते कॉलेजमध्ये जात व बाकी सर्व संशोधन घरी करीत. परंतु तालाहासीमध्ये त्यांचा दिनक्रम वेगळा असे. येथे दिवसभर ते कॉलेजच्या परिसरात असत. इतर

विद्यार्थ्यांबरोबर चर्चा करीत. त्यांच्याबरोबर सहभोजनाचा आनंद लुटत. तेथेच दुपारची वामकुक्षी घेत. संध्याकाळी 'मान्सी' त्यांना आणायला येत असत. प्राध्यापक म्हणून काही विशेष वागणूक मिळावी अशी त्यांची मुळीच अपेक्षा नसे. सर्व विद्यार्थ्यांमध्ये मिळून मिसळून राहणे त्यांना मनापासून आवडत असे.

इ. स. १९८४ साली **पॉल डिरॅक** यांनी आपला अखेरचा शोधनिबंध प्रकाशित केला. त्याचे शीर्षक होते, 'पुंजक्षेत्र सिद्धांतातील त्रुटी'' यात त्यांनी क्वांटम इलेक्ट्रोडायनॅमिक्स-पुंज विद्युतगतीशास्त्राविषयीचे आपले मत व्यक्त केले होते. ''मला शक्य होईल तोपर्यंत मी शोध चालू ठेवीन. इतरही शास्त्रज्ञ याच दिशेने प्रयत्न करतील असा मला विश्वास वाटतो.'' या शब्दात वयाच्या ब्याऐंशीव्या वर्षी त्यांनी आपला आशावादी दृष्टीकोन प्रकट केला होता.

२० ऑक्टोबर १९८४ रोजी वयाच्या ब्याऐंशीव्या वर्षी पॉल डिरॅक यांनी या जगाचा निरोप घेतला. त्यांच्या कुटुंबियांच्या इच्छेनुसार तालाहासीमधील रोझलॉन सिमेट्रीत त्यांनी अखेरचा विसावा घेतला.

इंग्लंड ही **पॉल डिरॅक** यांची कर्मभूमी. जागतिक कीर्तीच्या या शास्त्रज्ञाचा उचित सन्मान करण्याच्या दृष्टीने ब्रिटिश सरकारने वेस्टमिनिस्टर आबे येथे त्यांचे स्मृतिचिन्ह उभारायचे ठरविले. ते स्मृतिचिन्ह चौरसाकृती असून त्यावर **डिरॅक** यांचे **पी. ए. एम. डिरॅक** असे नांव (कारण ते प्रत्येक ठिकाणी अशी सही करीत असत) त्यांचे जन्म व मृत्यूवर्ष आणि त्यांनी शोधलेले समीकरण लिहिलेले आहे. १३ नोव्हेंबर १९९५ साली हे स्मृतिचिन्ह वेस्टमिनिस्टर आबे येथे बसविण्यात आले. **स्टीफन हॉकिंग** हे त्याप्रसंगी प्रमुख पाहुणे म्हणून हजर होते. त्याप्रसंगी **स्टीफन हॉकिंग** यांनी **पॉल डिरॅक** यांच्या कार्याचा संक्षिप्त आढावा घेऊन त्यांच्याबद्दल गौरवोद्गार काढले.

''पुंजयामिकीचे सर्वसाधारण नियम आणि समीकरण सूत्ररूपात **डिरॅक** यांनी मांडले होते. **हाइझेनबर्ग** यांचे अनिश्चिततेचे तत्त्व आणि **श्रॉडिंजर** यांचा तरंगसिद्धांत या दोन्हीचा समावेश **पॉल डिरॅक** यांच्या प्रबंधात होता. या दोन्हीचा मिलाफ घडवून आणणारा ट्रान्सफर्मेशन सिद्धान्त त्यांनी मांडला होता. इतकेच नव्हे तर हे दोन्ही सिद्धांत सममूल्यांकित आहेत हे सुद्धा **पॉल डिरॅक** यांनी दाखवून दिले. पुंजयामिकीची सुरुवात **हाइझेनबर्ग** आणि **श्रॉडिंजर** यांनी केली असली तरी त्या दोन्ही सिद्धांताना एकत्रित करून त्याला पूर्णरूप देण्याचे महत्त्वाचे काम **पॉल डिरॅक** यांनी केले. **हाइझेनबर्ग, श्रॉडिंजर** आणि **पॉल डिरॅक** या तिघांनी पुंजयामिकीचा पाया घातला. **पॉल डिरॅक** यांनी उभ्या आयुष्यात एवढी एकमेव कामगिरी केली असली तरी ते वेस्टमिनिस्टर आबेमधील या गौरवास पात्र ठरले असते. **डिरॅक** यांनी स्वत:च म्हटल्याप्रमाणे हे समीकरण खरोखरच संपूर्ण भौतिक आणि रसायनशास्त्रावर अधिराज्य गाजवते. **डिरॅक** यांनी आपल्या समीकरणाचे पेटंट घेतले असते तर आज ते जगातील सर्वात श्रीमंत गृहस्थ झाले असते. प्रत्येक दूरदर्शन आणि संगणक सेटसाठी त्यांना रॉयल्टी द्यावी लागली असती.''

इ. स. २००२ हे **पॉल डिरॅक** यांचे जन्मशताब्दी वर्ष. त्याच वर्षी त्यांच्या जीवनकार्याची ओळख करून देणारा लेख लिहिण्याचा योग आला हे माझे महदभाग्य !

---



अनुक्रमणिका




पॉल डिरॅक यांचे वेस्टमिनिस्टर आबे येथिल स्मृतीचिन्ह

---

अनुक्रमणिका

# इतिहासातील घटना आणि त्यामागचे सूत्रं

## हिंदु देवालयांची विटंबना करणे, ती जमिनदोस्त करणे आणि ब्रिटीश राजवटीच्या अगोदरची हिंदुस्थानातल मुसलमानची राज्ये.

– विठ्ठल गोठणकर

**एक**

**प्रस्ताव**

इ. स. १९९२ साली बाबरी मशीद जमिनदोस्त करण्यात आली. विशेषत: या घटनेनंतर दक्षिण आशियातील देवळे, आणि मशिदी यांचे राजकीय स्थान काय या संबंधात खास करून भारतात फार जोराच्या चर्चेला सुरुवात झाली आहे. या चर्चेत ब्रिटिश राजवटीच्या अगोदरच्या काळात ज्या हिंदु देवालयांची विटंबना करण्यात आली अथवा ज्यांचे रूपांतर मशिदीत करण्यात आले त्या घटनांवर खास करून भर देण्यात येतो.

**सिताराम गोएल** – यांच्या सारख्या राष्ट्रवाद्यांनी या संबंधात एक आकृतीबंध वा सूत्र मांडून त्या बाबत रग्गड पुरावा सादर केलेला आहे. त्यांनी मांडलेल्या सूत्रानुसार ब्रिटिश राजवटीपूर्वीच्या काळातील मुसलमान राज्यकर्त्यांना हुकूमतीखाली असलेल्या प्रदेशात हिंदुची देवळे प्रचंड प्रमाणात मुसलमानानी जमीनदोस्त केली. या बाबतचा दस्तऐवजी पुरावा १). Hindu Temples what happend to them Vol I a preliminary Survey (हिंदू देवालये, त्यांचे काय झाले एक प्राथमिक तपासणी खंड पाहिला. २) Islamic evidence (मुसलमानानी सादर केलेला पुरावा) या दोन ग्रंथात त्यांनी विस्तारपूर्वक वाचकाला पेश केला आहे. Voice of India (भारताचा आवाज) या प्रकाशन संस्थेने हे दोन्ही ग्रंथ इ. स. १९९१ साली प्रकाशित केले आहेत. खेदाची गोष्ट अशी आहे की व्यावसायिक इतिहासकारानी (professional Historians ) **उदा. रोमिला थापर, श्री. सिताराम गोएल यांनी मांडलेले सूत्र हे इतिहासाशी संबंधीत आहे तरी त्याची दखल त्यांनी घेतलेली नाही?** खरे म्हणजे त्यांनी ती घ्यावयास हवी होती पण तसे घडले नाही ही वस्तुस्थिती आहे. या प्रबंधाचे उद्दिष्ट एकच आहे. ते म्हणजे ब्रिटिश राजवटीच्या पूर्वीच्या काळात कोणत्या देवळांची विटंबना करण्यात आली वा ती जमिनदोस्त करण्यात आली आणि कोणत्या देवळांचे मशिदीत रूपांतर करण्यात आले याबद्दल जो उपलब्ध पुरावा सादर करण्यात आला आहे; त्याची तपासणी करणे, एवढे मर्यादीत उद्दिष्ट या प्रबंधाचे आहे. ही तपासणी करताना साहजिकपणे पुढील प्रश्न उपस्थित होताना १) या कालखंडात नेमक्या कोठच्या देवालयांची विटंवना करण्यात आली वा ती जमिनदोस्त करण्यात आली, अथवा त्यांचे रूपांतर मशिदीत का करण्यात आले. २) कोणत्या मुसलमान राजवटीने हे कृत्य केले



अनुक्रमणिका

आणि केव्हा केले? ३) हे कृत्य यांनी कोणत्या मार्गाचा अवलंब करून केले आणि ते करण्यामागचे उद्दिष्ट काय होते. ४) त्या कालखंडात धर्म आणि राजकारण यांच्यातील परस्पर संबंधाबद्दल या कृत्यापासून काय बोध होतो? विद्यमान काळी हा ऐरणीवर असलेला प्रश्न आहे. त्याचे कारण धार्मिक स्वरूपाची स्मारके (उदा. दर्गे, अफजलखानाची कबर) या बाबींचे जे धोरण आहे त्याचा निषेध करण्याकरिता वा त्याचे समर्थन करण्याकरिता भारतातील अनेक लोक इतिहासाची साक्ष काढतात.

देवालयांची विटंबना करणे वा ती जमिनदोस्त करणे, अथवा त्यांचे रूपांतर मशिदीत करणे या विषयीचा जो पुरावा हिंदु राष्ट्रवादी विद्यमान काळी सादर करतात त्यातील बहुतेक पुरावा History of India as told by its own historian (हिंदुस्थानी इतिहासकारानीच कथन केलेला हिंदुस्थानचा इतिहास) या आठखंडातील ग्रंथातून घेतलेला आहे. हा पुरावा विशेष करून प्रस्तुत विषयाबद्दल फारच प्रभावी ठरलेला आहे. या ग्रंथातील मजकूर मूळ पर्शियन भाषेतील दस्तऐवजावरून भाषांतर करून घेण्यात आलेला आहे. भारतात ब्रिटिश सत्तेचा उदय झाल्यानंतर पहिल्या काही दशकात हे भाषांतर सिद्ध होऊन ते ग्रंथ रूपाने प्रसिद्ध करण्यात आले होते. हा ग्रंथ इ. स. १८४९ साली प्रकाशित झाला व त्याचे संपादक होते, सर हेलरी एल्लीअट (Elliot ) या संपादकानी जॉन डॉऊसन (John Dowson) यांच्या मदतीने या भाषांतराच्या कामावर देखरेख केली होती. झालेल्या भाषांतराची ते वेळो-वेळी तपासणी करीत. परंतु हे सारे प्रचंड काम सिद्धीस नेताना (एल्लीअट) यांच्या नजरे-समोर उन्मेखून एकच उद्दिष्ट होते. ब्रिटिशांची राजवट भारतात सिद्ध होण्या अगोदर हिंदुस्थानात असलेली जी मुसलमानी राजवट होती ती क्रौर्य, सुलतानशाही, हुकुमशाही या सर्व दुर्गुणांनी आकंठ भरलेली होती. या राजवटीशी तुलना केली असता, न्याय आणि कार्य-क्षमता या बाबत एल्लीअट यांनी ब्रिटिश राजवट ही श्रेष्ठ दर्जाची होती हे दाखवून द्यावयाचे होते. हा मुद्दा क्षणभर बाजूस ठेऊया, मुद्दा एकच सर एल्लीअट यांनी त्याच्या सांगण्याप्रमाणे तत्त्कालीन प्रचलीत ब्रिटिश राजवट ही त्या राजवटी अगोदर येऊन गेलेल्या मुसलमानी रियासतीपेक्षा अधिक मानवता प्रेमी आहे असे सिद्ध करावयाचे होते. महत्वाचा मुद्दा म्हणजे सर हेल्री. एम. एल्लीअट हे आपल्या उद्दिष्टांबाबत अजिबात छपवाछपवी करीत नाहीत का? त्यांनी आपल्या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत खालील निवेदन सादर केले आहे.

*"विपन्नावस्था आणि आगतिकता या दोन्ही बाबतीत सर्व सामान्य (हिंदु) माणसाने पार तळात जाऊन पोचण्यासाठी त्यांना बुडविण्यात आले असले पाहिजे. या एका खंडात फारच त्रोटक असे उतारे देण्यात आले आहेत. त्यावरून आपणास काही गोष्टीची झलक पहावयास मिळते. उदा. मुसलमानाशी प्रतिवाद केल्यावरून हिंदुना यमसदनास पाठविण्यात येत असे. मालमत्ता बाळगणे, पूजा, उपासना वा इतर धार्मिक (समजली) जाणारी कामे करण्यास (हिंदु वर) सर्वसामान्य स्वरूपाची बंदी होती. देव-देवतांच्या मूर्तींना छिन्नविछिन्न करणे, देवालये जमिनदोस्त करणे, सक्तीने मुसलमान धर्मात धर्मांतर करावयास आणि (मुसलमानाशी)*



अनुक्रमणिका

*विवाह करण्यास जबरदस्ती करणे, इत्यादी अनेक असहिष्णुतादर्शक जुलमी कायदे करण्यात आले होते. या असहिष्णू कायद्यात कायद्याची मंजूरी नसलेली एखादी गोष्ट उदा. मालमत्तेची जप्ती तसेच मुलसमानी उच्च पदस्थाने केलेले खून आणि कत्तली यांचा आणि लैंगिक स्वरूपाचा उपभोग, मनसोक्त मद्यमानात मशगूल असणारे सुलतान– यांना त्यांच्या गुन्हाबद्दल माफी देणारे कायदे हे सारे आपणास असे दाखवून देतात की, या प्रस्तावनेत केलेले जे विवेचन आहे ते केवळ मुसलमान विरोधी भावनेने पुरेपूर आकंठ भरलेल्या दृष्टिकोनातून केलेले नाही.''*

या उलट ब्रिटिश सत्तेचा उदय व प्रसार झाल्यानंतर भारतीय इतिहासातील एका अधिक खळबळजनक आणि घटनायुक्त अशा युगाला सुरुवात झाली. तोवर जो भूतकाळ अस्पष्ट व गडद होता त्यावर युरोपीय (संस्कृतीत अनुस्यूत) असलेल्या सत्य कथन आणि पारदर्शक स्पष्टतेने आपला परिपूर्ण असा प्रकाश झोत टाकण्यास सुरुवात केली होती. हे सांगितल्यानंतर एल्लीअट यांनी पुढे जाऊन असेही नमूद केले होते की ब्रिटिशानी अर्ध्या शतकाच्या अल्पकाळात मुसलमानी राजवटीपेक्षा कितीतरी अधिक प्रमाणात हिंदुस्थानातील रहिवाशासाठी कल्याणकारी व उपयुक्त असे अनेक सामाजिक कायदे व सामाजिक असे दैनंदिन व्यवहार यांची प्राप्ती करून दिली होती. पाच शतके राज्य करूनही मुसलमान राजवटीना यातले काहीही जमले नव्हते. एल्लीअट यांनी अशी आशा व्यक्त केली होती की त्यांनी जे भाषांतरीत साहित्य प्रकाशित केले आहे. त्याच्या वाचनाने बिटिश राजवटीची सौम्यता व सामाजिक समानतेचा प्रसार करण्यासाठी या राजवटीने किती प्रचंड सुविधा व फायदे प्राप्त करून दिले याचा अनुभव हिंदुना येईल. तो झाल्याकारणाने नेटीव्ह (स्वदेशी) प्रजानन अधिक ज्ञानी होतील.

एवंच ब्रिटिश राजवटीच्या अगोदरच्या कालखंडातील हिंदुस्थानात वास्तव्य करून असणाऱ्या मुसलमानांची राजवट ही अवैध (delegitimizing) होती हे सिद्ध करण्याचे एल्लीअट यांचे उद्दिष्ट या अगोदरच्या छेदकातील उताऱ्यावरून स्पष्ट होते. आधुनिक भारताच्या इतिहासाअगोदरच्या कालखंडाबद्दलची तोवर जी समजूत व ज्ञान होते. यावर एल्लीअट यांच्या लिखाणाने, नंतरच्या पिढ्यावर किती विघातक परिणाम केले हे एक मान्यवर (मार्क्सवादी) इतिहासकार **मद्दमद हबीब** यांनी नमूद केले आहे. ते म्हणतात, ''भारतात राहणारा शांतताप्रिय मुसलमान हा आपल्या हिंदु पूर्वजातूनच आलेला आहे याबद्दल अजिबात शंका नाही. परंतु त्याला एखाद्या परदेशी रानटी व जुलमी माणसाचा पोषाख चढविण्यात आला आहे. हिंदु देवालयांची मोडतोड करणारा, गोमांस भक्षण करणारा तो आहे. या शिवाय तीस ते चाळीस दशके, तो ज्या देशांचा रहिवाशी होता. तेथे तो एक सैनिकी व वसाहतदार म्हणूनच आहे. असे जाहीर करण्यात आले.... याचा परिणाम आजच्या भारतात जे जातीय द्वेषाचे वातावरण आहे त्यात दिसून येतो.'' हा मजकूर अनेक वर्षापूर्वी लिहिण्यात आला होता. परंतु हिंदुस्थानातील हिंदु देवालयांची मोडतोड व त्यांची विटंबना



अनुक्रमणिका

करण्यासाठी होणाऱ्या कृती या संदर्भात ते लिखाण प्रस्तूत आहे. आधुनिक भारताच्या पूर्वीच्या कालखंडातील मुसलमानी राजवटीबद्दल पर्शियन भाषेतील तवारीखातून वेचक वेचे निवडून त्याचे भाषांतर करून, ते विद्यमानाकाळीही पेश करण्यात आले. त्या पार्शियन दस्तऐवजातील वेचक भाग उदधृत करण्यात येतो. या मार्गाचा अवलंब करून ज्या पुराव्याला (मुसलमान वा तथाकथित सेक्यूलर लोकाकडून) आव्हान देणेच शक्य होणार नाही, अशा पुराव्याचा शोध हिंदु राष्ट्रवादी घेत असतात. उदा. **श्री. गोएल** यांच्या ग्रंथातील एका प्रकरणाचे शिर्षक आहे. 'FROM THE HORSES MOUTH' (प्रत्यक्ष कृती ज्यांनी केली होती त्यांच्या शब्दात) या प्रकरणात पार्शियन तवारिखातून उपलब्ध असलेल्या आधुनिक भारताच्या पूर्व इतिहासात होऊन गेलेले, या भूमीतील काही प्रदेश पादाक्रांत करणारे आणि त्यावर राज्य करणारे मुसलमान राज्यकर्ते हे धर्मांधता आणि अतीव दुष्टावा अशा वागणूकीचे आकृतिबंध सातत्याने प्रदर्शित करीत होते.

वस्तुस्थिती अशी आहे की या प्रकरणी जो काही पुरावा सादर केला जातो त्यातील दस्तऐवजातील प्रत्येक कागदाची अगदी सुक्ष्मात जाऊन तपासणी करणे जरूरी आहे. उदा. इ. स. १४५५ सालातील एका शिलालेख विचारात घेऊ या. **धार** या शहरात असलेल्या एका कबरस्तानात असलेल्या दर्ग्याच्या (Shrine) दरवाजावर तो खोदलेला आहे. विद्यमान काळी मध्यप्रदेशात असलेले **धार** हे शहर इतिहासात कधीतरी माळव्याची राजधानी होती. या शिलालेखात पर्शियन भाषेतील गझल खोदलेली आहे. हिंदुचे एक देवालय जमिनदोस्त करण्याचा उल्लेख त्या शिलालेखात करण्यात आला असून ते कृत्य कोणी अबदूल शहा चांगल यांने केल्याचे त्यात नमूद केलेले आहे. हे कृत्य भोज राज्याच्या कारकिर्दीत झाल्याचेही त्यात सांगितलेले आहे. राजा भोज हे महाविख्यात परमार घराण्यातील एक राजे. त्यांची कारकिर्दत सिताराम गोएल यांनी आपल्या Hindu Temples what happened to them हिंदु देवालये– त्यांचे काय झाले) या ग्रंथात या शिलालेखातील हिंदुचे देवालय जमिनदोस्त करण्यात आले, हा मजकूर जसा च्या तसा तश्या मान्य करून तो स्विकारला आहे. त्या मजकूरातील गर्भित अर्थाकडे लक्ष न देता ते त्याचा शब्दश: अर्थ घेतात. जणू काही समकालीन वृत्तपत्रात आलेला जो वस्तुनिष्ठ दृष्टांत आहे या स्वरूपातच. तथापि एका बारीकश्या बाबतीत त्यांनी आपल्या मतभेद नोंदविला आहे. त्यांच्या मते ही घटना **राजा भोज दुसरा** याच्या कारकिर्दीत म्हणजे (ती राजा-भोज पहिला याच्या राजवटीच्या अकराव्या शतकात न घडता) ती तेराव्या शतकाच्या अखेरच्या काळात घडली असावी. परंतु श्रा गोएल सांगतात तशी वस्तुस्थिती नाही आहे. या शिलालेखाला, हिंदु देवालय जमिनदोस्त केले गेले ही घटना केवळ नमूद करण्याबाबत फारसे कर्तव्य नाही. परंतु अबदुल शहा चांगल या महान संत पुरुषाचा अत्यंत आश्चर्यकारक असा जीवनपट उलगडून दाखविणे, त्याचा वृत्तांत सादर करणे, आणि त्या संताबद्दल धन्योग्दार नोंदविणे, या गोष्टीशी अधिक करून

कर्तव्य आहे. ही कबर ज्या ठिकाणी आहे. त्याच ठिकाणी या संत-महात्म्यांचे दफन करण्यात आले होते. हा सारा शिलालेख तपशीलात जाऊन वाचल्यानंतर त्यातून वस्तुत: वेगळ्याच अगदी गुंतागुंतपूर्ण ऐतिहासिक प्रक्रिया या ठिकाणी घडत असल्याचे या तपशीलाकरवी उलगडले जाते.

"या ठिकाणाने प्रथम 'अबदुल्ला शहा चांगल' यांच्यामुळे इस्लामची दीक्षा घेतली. (आणि या) धर्माच्या सर्व पताका दूरवर नेण्यात आल्या. (मी असे ऐकले आहे की) या पडझड झालेल्या आणि विपन्नावस्थेत असलेल्या जागी काही लोक अगोदरच येऊन पोचले हो्ते. पहाटे उठल्याबरोबर मुआझिनाने बांग दिली. बेहोष **सुफींच्या** करता ते तुतारीवजा बोलावणे होते. धर्मलंड (infidels) लोकांनी प्रत्येक भिंतीवरून (Walls?) (याच्यावर हल्ला केला) आणि त्यातील प्रत्येकजण तलवारी आणि सुरे घेऊन त्या सुफींच्या रोखाने धावत गेला. सरतेशेवटी या धर्मलंड लोकाना, तेथे जमलेल्या धार्मिक प्रवृत्तीच्या सर्व लोकांना जबर जखमी केले, आणि ठार मारले. हे कृष्णकृत्य केल्यानंतर त्या धार्मिक प्रवृत्तींच्या लोकांच्या सर्व मृतदेहास त्या धर्मलंड लोकानी एका विहिरीत नेऊन हाकले व त्यांनी दृष्टी आड केले. मग हे कबरस्थान आणि हुतात्मांची भूमी ठरलेले ठिकाण हे त्या सदवर्तनी (Pious) आणि धर्मानुसार आचरण करणाऱ्या (holy) हुताम्यांची पुसट आठवून देणारे ठिकाण म्हणूनच राहिले.

वेळ आला तेव्हा वास्तवतेच्या (reality) सूर्याने या काळच्या आणि नैराश्यजनक रात्रीवर प्रकाश टाकला हा पुरुष सिंह (अबदुल्ला शहा चांगल) हा (इस्लाम) धर्माच्या केंद्रस्थानातून मोठी फौज घेऊन या जुन्या देवालयाशी आला. खोट्या देवतांच्या मूर्तींची त्यांनी मोडतोड केली आणि मूर्ती पूजा करणाऱ्या या देवालयांचे रूपांतर त्याने मशिदीत केले. राजा भोजाने हे सारे जेव्हा पाहिले तेव्हा आपले कुटुंबिय आणि सर्व शूर योध्दयांसकट (त्याला शहाणपणा सुचून) त्याने इस्लाम या धर्माच्या स्विकार केला. इस्लामी कायद्यांच्या प्रकाशात हा प्रदेश उजळून निघाला. आणि धर्मलंड लोकांचे रिंतीरिवाज हे इतिहासजमा झाले आणि रद्दबातलही ठरविण्यात आले.

त्या पुरातन काळापासून ही कबर जगातील फारच प्रख्यात तीर्थस्थान बनले आहे. कबरी जुन्या झाल्याकारणाने त्या भुईसपाट झाल्या आणि त्या ठिकाणी कबर या विशिष्ट जागी राहिली नाही आहे, असा एकही उंचवटा शिल्लक, शोक मग्न, दु:खी, आणि थकलेल्या दरविशांना (DARVISH) विश्रांती घेण्याकरीता जागाही नव्हती. हे पाहिल्यानंतर या पृथ्वीच्या राजाने असा हुकूम दिला की या (माऊंट सिनाई) डोंगराचे शिखर नव्याने बांधून काढा या क्षितिजांचा (म्हणजेच जगाचा) सुलतान प्रसन्न चेहऱ्याचा बादशहा याच्या दरबारात KHAQUAN (तुर्कीस्थानचा बादशहा आणि FAGHFUR (चीनचा बादशहा) यांच्या सारखे मातब्बर लोक आपली हजेरी या ठिकाणी लावीत असत. अल्लाच्या कृपेमुळे 'अलाऊन-द-दिन वाद-दुनिया अबुल मुझफ्फर' हा आपल्या शत्रूंवर विजय प्राप्त करता झाला. खिलजी

घराण्यातील सुलतान मंहमद शहा हा असा राजा होता की त्याच्या न्याय वागणुकीमुळे हे जग नंदवनासारखे सुशोभित झालेले आहे. या सुलतानाने हा जुना इमला पुन्हा एकदा नव्याने बांधून काढला आणि ही वास्तु आणि तीच्या सिमेत बंदिस्त झालेला परिसर पुन्हा एकदा नवा झाला.''

हा शिलालेख खोदण्याचा ज्यांनी हुकूम दिला त्याला ज्या भूतकालाचे स्मरण होते. त्याचे विभाजन त्याने तीन स्पष्ट कालखंडात केलेले आहे. पहिला कालखंड 'अबदुल्ला शहा चांगल' या संत महात्मा हिरोचे आगमन. या वेळी माळव्यातील मुसलमानांचा एका छोट्या समूहाची या विभागावर अधिसत्ता होती; पण ती तशी तकलादूच होती. स्थानिय बिगर मुसलमानानी त्यांना हुतात्मे बनविले, आणि त्या इस्लामधर्मियांची प्रेते एका विहिरीत फेकून दिली. या कथा-कथनातील दुसरा टप्पा हा त्या हिरोचा कालखंड आहे. हा हिरो 'इस्लाम धर्माच्या केंद्रातून' (मक्का) येतो. तो देवळातील मूर्तीची मोडतोड करतो, आणि त्या देवळाचे रूपांतर एका मशिदीत करतो. शिवाय परमार घराण्याच्या अत्यंत प्रसिद्ध राजाला, तो इस्लाम धर्माची दीक्षा देतो. इस्लामधर्मातील जे कोणी सुफी पंथीय हुतात्मे झाले होते, त्यांच्या बलिदानाचा या हिरोच्या कृतीने सामुदायिकपणे सूड उगवलेला असतो वा बदला घेतलेला असतो. सर्वात महत्वाचा मुद्दा म्हणजे या घटनानी त्या विभागात इस्लामची पुर्नस्थापना होण्यास मदत झाली होती. या कथा कथनातील तिसरा कालखंड. सध्या हिरोचे आयुष्य संपल्यानंतर, त्याचे कबरस्थान हे फारच प्रख्यात तीर्थ स्थान असले तरी त्याची निगा घेतली जात नव्हती, नव्हे त्याच्याकडे दुर्लक्ष होत होते. कथा कथनातील या स्थळी, दुसरा हिरो प्रकट होतो. 'या जगाचा' आणि प्रसन्न चेहऱ्याचा राजा सुलतान महमूद खिलजी. याच्या दरबारात चीन आणि मध्य आशियातील बादशहा या खिलजीना कुर्निसात करण्यास येतात. या अशा सुलतानाने आपल्या न्यायदायाने हे जग नंदवनासारखे सुशोभित केले होते. या सुलतानाने केलेल्या अनेक कृत्यापैकी महान कृत्य कोणते असेल, तर ते शहा अबदुल्ला शहा चांगल यांच्या दर्ग्याची (Shrine) पुर्नबांधणी करून, त्या संत-महात्माचे नाव घेतलेल्या, इस्लाम धर्मिय पंथाचे, आपण पुरस्कर्ते व आश्रयदाते आहोत असे जाहीर करणे या शिलालेखाच्या अखेरीला आपणास असे सांगण्यात आलेले आहे. या पुर्नबांधणीत, तळघर, मशिद आणि धर्मदाय-पाणपोई (Caravan Sarai) स्वरूपाचे फिरत्या वाटसरूंचे तसेच व्यापारी काफिल्यांचे विश्रांती स्थान यांचा अंर्तभाव आहे. या शिलालेखाच्या अगदी सरतेशेवटी, अल्लाच्या चरणी केलेली प्रार्थना नमूद केलेली आहे. या प्रार्थनेनुसार या दयावंत, न्यायप्रिय व प्रजेचे कल्याण चिंतणाऱ्या सुलतानाच्या मृत्यूनंतर होणाऱ्या न्याय-निवाड्याच्या शेवटच्या दिवसापर्यंत त्यांचा आत्मा तग धरून राहो आणि कल्पांतापर्यंत त्यांचे साम्राज्य सातत्याने टिकून राहो.

हिंदुस्थानातील मुसलमानी राजवटीच्या काळातील शिलालेख हे सर्व सामान्यपणे आणि अगदी नमुनेदारपणे (Typically) हे त्या शिलालेखात ज्या घटनेचे वर्णन करण्यात आलेले

असते. त्या घटनेच्या अगदी नजिकच्या काळात ते खोदलेले वा कोरलेले असतात. परंतु विचाराधीन असलेला लेख हा त्यात नमूद केलेल्या घटनेला समकालीन नाही आहे. याचे कारण ती शिलालेख ज्या घटनेचे संदर्भ देतो ती घडून गेल्यानंतर चारशेवर्षानंतर रचलेला आहे. म्हणजे ती घटना होत असताना जे काही घडले त्याचा वस्तुनिष्ठ असा समकालीन अहवाल असण्यापासून फारच दूर आहे. त्याचे असे आहे. विद्यमान काळी आपणासमोर जो वृतांत आहे तो वृत्तांत अनेक संक्रमणातून गेलेला आहे. आपणास उपलब्ध असलेला शिला-लेखीय वृतांत हा अत्यंत संपन्नपणे घट्ट विणीचा आहे. तो जो गोष्ट अनेक पिढ्यानी केलेल्या मौखिक आदान-प्रदानातून जी स्पष्टपणे घट्ट विणीची झालेली होती त्याचे ते सादरीकरण आहे. हे मौखिक आदान-प्रदान इ. स. १४५५ पर्यंत चालू होते. याच काळी अबदुल्ला शहा चांगल यांनी माळव्यात केलेली सत्कृत्ये त्या लिखित शब्दात गोठविली गेली होती. हे गोठविलेले शब्द आपणासमोर आहेत. एका विशिष्ट ठिकाणी पंधराव्या शतकाच्या मध्यावरती माळव्यातील मुसलमान एका विशिष्ट काळी, एक विशिष्ट समूह आपण कोण आहोत, आपण या ठिकाणी कसे आलो, आपले संघटन व रचना कशी होत गेली, या सर्वांची प्रक्रिया या सर्व वृतांतातून इस्लामी मुसलमानानी उघडपणे नमूद केल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. धर्मांतर, पूर्नस्थापना आणि हौतात्म्य पवित्र स्थळांना हिंदुस्थानात मुसलमानी राजवटीनी दिलेला राजाश्रय या संबंधीची संविधाने या वृतांतात मध्यवर्ती आहेत. अर्थातच या सर्वांबरोबर देवालय जमिनदोस्त करण्यात आले हा भागही आहेच. हे लिखाण शिलालेखात लिपिबद्ध होण्याअगोदर चारशे वर्षांपुर्वी देवालय नक्की जमिनदोस्त करण्यात आले होते की नाही याबद्दल आपणास निश्चितपणे काहीही सांगता येत नाही. देवालय जमिनदोस्त करण्यात आले आणि महाविख्यात राजाभोज याने इस्लाम धर्माचा स्विकार केला असा दावा हा वृत्तांत करतो. परंतु या दोन्हीही घटना सारख्याच प्रमाणात अविश्वनीय असण्याची शक्यता अधिक आहे.

ते काहीही असो. देवालय जमिनदोस्त करण्यात आले होते या घटनेचे स्मरण चारशे वर्षे मागे नेऊन त्या कबरीवर प्रक्षेपित करणे, त्यांचे स्मरण करणे, हा घटक माळव्यातील मुसलमानांना आपल्या समूहाचा उदय, त्याची जडण-घडण कशी झाली हे जाणून घेण्याचा बाबतीत प्रमुख घटक बनला होता. दुसरेही अनेक घटक अर्थातच होते. पण शिलालेखातील ही गझल रचण्यासाठी मदत करण्यास जे आश्रयदाते पुढे आले होते, त्यांच्या मानसात तरी या घटकाला प्रमुख व महत्वाचे स्थान होते. एवंच्या उदाहरणावरून असे सूचित होते की देवालये जमिनदोस्त करण्याबाबत हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्त्यांनी मागे ठेवलेला जो दस्तऐवजी पुरावा वा लिखाण आहे, त्यात जे दावे केलेले आहेत त्यांचा अन्वयार्थ लावताना आणि त्यावर भाष्य करताना काळजी घेणे आवश्यक आहे. परंतु त्याच बरोबर हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्ते अथवा त्या धार्मिक समूहांच्या भूतकाळात देवालयांची जमिनदोस्त करणे, त्यांची विटंबना करणे, या कृतीना किती मध्यवर्ती स्थान होते याचा हा वृत्तांत व

त्यात नमूद केलेल्या घटना हे एक उदाहरण आहे. देवालयांची विटंबना ती जमिनदोस्त करणे या इस्लामच्या हिंदुस्थानात आगमनानंतरच आरंभीच्या काळातील घटना.

हे सर्वश्रुतच आहे की इ. स. ११९२ च्या अगोदरची दोन शतके, पर्शियन संस्कृती ज्यांनी आपलीशी केली होती असे तुर्क हे पद्धतशीरपणे, दक्षिण आशियातील प्रमुख शहरे व विभाग यांच्यावर धाडी टाकीत, त्यांची लुटमार करीत विषेशत: हिंदु देवालयांची लूट करीत. अशा प्रकारे जी मालमत्ता सहजपणे घेऊन जाता येते ती मालमत्ता पूर्व अफ-गणिस्तानातील सत्ता केंद्राकडे ते घेऊन जात इ. स. ११९२ साली हिंदुस्थानात जन्म घेतलेले आणि येथेच लहानाचे मोठे झालेले मुसलमान राज्यकर्ते प्रथमच राज्यावर आले. पर्शियन संस्कृती धारक तुर्की-मुसलमानांचा संपन्न प्रदेशावर धाडी टाकणे, आणि मालमत्तेची लूटमार करून नेण्यासारखी जी संपत्ती असेल ती घेऊन जाणे हा जो आकृतिबंध आहे त्याला इ. स. ९८६ साली सुरुवात झाली होती. गझनवीचा सुलतान सबुकतगिन याने (इ. स. ९७७ ते ९९७) या काळात हिंदुशाही राजवटीवर सातत्याने हल्ला केला होता, या राजवटीच्या नियंत्रणाखाली काबूल आणि वायव्य पंजाब या दरम्यानचा प्रदेश होता. इ. स. ९९७ साली या राजवटीचा पराभव झाला. सुलतानांचे चिरंजीव यांचे खाजगी चिटणीस आबुनस्र उतबी (Abunasrutbi) यांनी या घटनांचे टिपण खालील शब्दात केलेले आहे.

सुबकगतिने याने लाम्हान– Lamhan (काबूलच्या पूर्वेकडे अगदी लगत असलेले शहर) हे त्यात असलेली अमाप संपत्ती आणि प्रचंड ताकद याकरिता महशूर होते ते त्याने पादाक्रांत केले आणि धर्मलंड वस्ती असलेल्या जागाना आगी लावल्या. देवालयातील मूर्तींची मोडतोड केली. देवालये जमिनदोस्त केली आणि त्या ठिकाणी इस्लामची स्थापना केली. या कालखंडातील राजकीय इतिहासाचा सारांश आँद्रे लिन्फ यांच्या AL- HIND -The making of Indo-Islam world Vol -२ (अल-हिंद हिंदुस्थानी खंड २ हिंदुस्थानी मुसलमानांची जडण-घडण) The slave kings and the Islamic Conquest 11th - 13th centuries (गुलाम़ राज्यकर्ते आणि अकरावे ते तेरावे शतकात या दरम्यान इस्लामने पादाक्रांत केलेला प्रदेश) (ग्रंथाचे प्रकाशक Leiden Brile इ. स. १९९७) या ग्रंथात आहे प्रदेश पादाक्रांत करून त्या ठिकाणच्या रहिवाश्यांना इस्लामची दिक्षा देऊन त्यांचे धर्मांतर घडवून आणणे– हे उद्दिष्ट साध्य करण्याच्या कामी तो प्रदेश आपल्या हुकुमतीखाली आणलेल्या लोकांस पत्करावयास लावून, या विजेत्यांनी हा प्रदेश पादाक्रांत केला ही कृती एक प्रकारे वैधानिक ठरत होती आणि तिला समर्थनही प्राप्त होत होते. **उतबी** यांच्या टिपणाने असे दाखवून दिले आहे की, या विज़ेत्यानी आपल्या धर्मविचाराशी सहमत नसलेल्या लोकांचे मन आपल्या विचाराकडे वळविण्यासंबंधी एक ढाँचा प्रस्थापित केला होता. त्याचे अनुकरण हिंदुस्थानातील मुसलमान तवारिखकारानी अगदी तंतोतंत केलेले आहे. आपण ज्याची चर्चा केली तो धार या मध्यप्रदेशातील शिलालेख (इ. स. १४५५) हे त्याचे एक उदाहरण आहे.



अनुक्रमणिका

**उतबी** यांचे इस्लाम धर्माची भलावण करणारे 'जनता-संपर्की' थाटाचे लिखाण संदर्भा-साठी आहेच. यानंतर **सबूकतगिन** आणि त्यांच्याही पेक्षा कितीतरी अधिक प्रसिद्ध असलेला त्यांचा पुत्र **गझनीचा मंहमद** (इ. स. ९९८ ते ११३०) याने आपल्या राजवटीच्या काळात ज्या मोहिमा केल्या त्या धर्मांतर करण्यासाठी नसून, अफगाणिस्तानात केवळ हिंदुस्थानातील संपत्ती लटून नेण्यासाठी केलेल्या होत्या. गझनीचे मूळ स्थान अफगणिस्तानात होते. तेथून स्थलांतर करण्याची त्याला अजिबात इच्छा नव्हती. म्हणूनच त्याने हिंदुस्थानात कायमचे स्थलांतर करून तेथेच स्थाईक व्हावे यासाठी कधीही प्रयत्न केला नाही. गझनवीद राजवटीच्या आरंभीच्या काळातील सुलतानानी हिंदुस्थानातील शहरावर धाडी टाकल्या, लुटमार केली– यात फारच श्रीमंत देवालयाचा अर्थातच समावेश होता. हे सर्व करण्यामागे, गझनीच्या पश्चिमेकडे असलेल्या Khurasan खुरासान या विभागाबाबत त्या राजघराण्याची जी व्यापक अशी राजकीय उद्दिष्टे, ती साध्य करण्यासाठी बळ प्राप्त व्हावे, हा हिंदुस्थानावर त्यांनी ज्या स्वाऱ्या केल्या त्या मागचा हेतू होता. या संदर्भात प्रख्यात इतिहासकार C.E. Bosworth (सी. ई. बॉसवर्थ) यांचे The Later Ghazhavids, splendor and Decay-The Dynasty in Afaganistan मंहमदा नंतरचे गझनविद : वैभव, विपन्नावस्था व विलगीकरण : अफगाणिस्तान आणि उत्तर हिंदुस्थानातील या घराण्याची राजवट) (हा ग्रंथ नव्या दिल्लीतील प्रकाशक मुनशिराम मनोहरलाल यांनी इ. स .१९९२ साली पुर्नमुद्रित केला आहे) संपत्तीची लुट करण्याकरिता घातलेल्या धाडी, गझनविद राजघराण्याचे जे अर्थशास्त्र होते. त्याच्या त्या अविभाग्य भाग होता. त्या अर्थशास्त्राची जी रचना होती ती एरवी कोलमडून पडली असती. या घराण्याने आपल्या पदरी कायम स्वरूपाचे असे खडे सैन्य नेहमीच बाळगले होते. युद्धशास्त्राच्या क्षेत्रात त्याकाळी जे अभिजन समजले जातील अशा घोड्यावरती आरूढ झालेले धुनुर्धर सैनिक केंद्रस्थानी आहेत असे मानून या सैन्याची उभारणी करण्यात आलेली होती. या साऱ्या अभिजनांची प्रथम गुलाम म्हणून खरेदी झालेली होती. कालांतराने ते अभिजन धनुर्धारी झाले. या गुलामांची खरेदी करण्यासाठी जे द्रव्य आवश्यक होते. ते इराण आणि हिंदुस्थान या दोन्ही देशातील शहरावर लूट करण्याच्या उद्देशाने नियमितपणे घातलेल्या धाडी करवी प्राप्त झाले होते. या ठिकाणी आणखी एक मुद्दा आवर्जून नमूद केला पाहिजे. गझनीचा मंहमद हे आवश्यक द्रव्य प्राप्त करून घेण्यासाठी केवळ परधर्मियाच्या (हिंदुच्या) शहरावर लूटमार करण्यासाठी धाड टाकीत नव्हता. अनेक इस्लामी शहरावर धाडी टाकून त्यांचीही लूट करण्याबाबत त्याच्या मनात कसलाही संदेह नव्हता. उदा. त्याने इ. स. १०२९ साली इस्लामी इराण मधील Ray रे हे शहर लुटले. या लुटीतून त्याला पाच लक्ष दिनार किंमतीचे जवाहीर प्राप्त झाले, दोन लक्ष साठ हजार या रकमेची रोकड प्राप्त झाली. याशिवाय ज्यांची किंमत किमान तीस हजार दिनार झाली असती एवढ्या किंमतीची सोन्याचांदीची मांडीही त्याने त्या इस्लामी शहराच्या लुटीन मिळविली होती. परंतु हिंदुस्थानाशी तुलना करता, इस्लाम इराण शहरात गझनीच्या मंहमदाला प्राप्त



अनुक्रमणिका

झालेली लूट ही तशी नगण्यच होती. याचे कारण इराणच्या पठारावर फारशी वस्ती नव्हती. या उलट हिंदुस्थानातील शहरात प्रचंड प्रमाणात संपत्ती होती. उदा. सोमनाथ या प्रख्यात मंदिराची लुट केल्यानंतर दोन कोटी दिनारांची गझनीच्या मंहमदाला प्राप्ती झाली. सि. ई. बॉसवर्थ यांनी आपल्या The Ghaznavids Their empire in Afganisthan and Eastern Iran ९९६- १०४० (गझनविदस, यांचे इ. स. ९९४-१०४० च्या दरम्यानचे अफगणिस्तान आणि पूर्व इराण या प्रदेशावरील साम्राज्य) या ग्रंथात या लुटीचे अगदी तपशीलात जाऊन उद्‌बोधक वर्णन केले आहे. तथापि इ. स. १०५० सालानंतर गझनीच्या मंहमदाचे जे वारस होते त्यांना आपल्या राजवटीला जे अत्यावश्यक आहेत अशा गुलामांचा पुरवठा करणारे जे मध्य आशियामधील प्रदेश होते, तेथून तो पुरवठा होण्याचे थांबले. एक प्रकारे हे धर्मसंकटच होते हा पुरवठा थांबला याचे कारण Seljugi सेलजुग आणि त्यानंतर Ghurids घुरीदस या जमातीच्या राज्यकर्त्यांनी या सैनिकांचा हा पुरवठा करण्यास प्रतिबंध केला. याचा परिणाम म्हणून गझनवी राज्यकर्त्यांनी आपल्या मुळातल्या राहत्या प्रदेशावर लक्ष केंद्रित करण्यास सुरुवात केली होती. बाहेरची मुलखगिरी त्यानी सर्वसाधारणपणे थांबविली. पूर्व अफगणिस्तान मधील आपली राजधानी गझनी आणि आपल्या राज्याचा सलग्न असलेला शासनातील हिंदुस्थानातील पंजाब या प्रांताचा काही भाग यावर आपले लक्ष दिवसेदिवस अधिक प्रमाणात केंद्रित केले होते. तसे होते तरी गझनविदस राजघराण्यातील मंहमदाच्या शासनातील राज्यकर्त्यांनी हिंदुस्थानातील आतील भागावर धाडी घालण्याचे धोरण चालूच ठेवले. परंतु या धाडी पूर्वीच्या इतक्या विनाशक नव्हत्या. शिवाय सबुकतगिन आणि मंहमद यांच्या लूट करण्याकरता हिंदुस्थानवर टाकण्यात येणाऱ्या धाडी तशा चांगल्याच नियमित असत, तशा या नव्हत्या. गझनविद राज्यकर्त्यांना पैशाची अगदी निकडच असली, शिवाय फुरसत असली तर मग लूट करण्यासाठी टाकण्यातं येणाऱ्या धाडी, अधून मधून हिंदुस्थानच्या नशिबी येत असत.

BAIHAQEI बेईहक्की हे एक तत्कालिन इतिहासकार. बनारस या हिंदूना पवित्र असलेल्या शहराच्या इतिहासात त्या शहरावर पहिली धाड तुर्की सैन्याने टाकली होती. या सैन्याचे नेतृत्व गझनवीद राज्याचे लाहोर येथील सुभेदाराने केले होते. लूट व संपत्ती प्राप्त करून घेण्यासाठी ही धाड इ. स. १०३३ साली टाकण्यात आल्याचे हा इतिहासकार नमूद करतो. हा सुभेदार आपले योद्धे व सैन्य घेऊन लाहोर येथून निघाला आणि त्याने बनारस मधील ठाकूराकडून जबरदस्त खंडणी त्याने वसूल केली. गंगा नदी त्याने ओलांडली आणि डाव्या किनाऱ्यावर मुक्काम करून, तेथून आगेकूच केले व बनारस या शहरात तो अवचितपणे दाखल झाला. या शहरावर **गंग** (Gang) नावांच्या माणसाचे राज्य होते. पूर्वी या ठिकाणी कोणताही मुसलमान पोचला नव्हता.... शहर सुगंधी व्यापारी, जवाहीरे आणि कापड विक्रेते यांची बाजारपेठ होती. शहरात लुटालूट करण्यात आली. यापेक्षा अधिक काही करणे शक्य नव्हते. सैन्यातील सैनिक चांगलेच गबर झाले. सोने, चांदी, अत्तरे आणि जड-

जवाहीर यांची शक्य होती तेवढी लुट केली आणि मग ते सुरक्षित स्थळी परतले. अशा शब्दात या धाडीचे वर्णन या इतिहासकाराने केलेले आहे.

उत्तर हिंदुस्थानातील राजकारणात अत्यंत नाट्यपूर्णपणे बदल घडून येत होता. परंतु हे होत असताना पूर्व इराण हे ज्यांचे मूळस्थान होते त्या ठिकाणच्या ताजिक (TAJIK) राजघराण्यातील घुरीद (GHURID) हे बाराव्या शतकाच्या अखेरीस, मध्य अफगणिस्तान-मध्ये येऊन दाखले झाले. गझनवीद राज्यकर्त्यांचा त्यांनी एका झटक्यात पराभव करून त्यांना हाकलून दिले. घुरीद राज्यकर्त्यांनी आणि त्यांच्या तुर्की गुलाम सेनापतीने हिंदुस्थानात एका नव्या पद्धतीच्या राज्याची उभारणी केली. हिंदुस्थानाच्या दृष्टीने परदेशस्थ गझनवीद यांच्या हुकुमतीशी या संकल्पित 'राजवटीचे' अजिबात साम्य नव्हते. घुरीदांची महत्त्वाकांक्षा अखिल उत्तर हिंदुस्थानात आपले साम्राज्य स्थापन करण्याची होती. या उद्दिष्टपूर्तीसाठी हिंदुस्थानातील गंगेचे खोरे व त्याच्या भोवतालच्या परिसराच्या मध्यभागी आपल्या संकल्पित उद्दिष्टासाठी पायाभूत ठरेल असे केंद्र प्रस्थापित करण्याच्या मागे ते लागले. पहिल्या दिल्ली–सलतनतीची स्थापना (इ. स. १२०६ ते १५२६) झाली. उत्तर हिंदुस्थानात. त्या ठिकाणच्याच मुसलमानांकडून, इस्लामी राज्याची आणि त्यांचा परिणाम म्हणून इस्लामी समाजाची उत्तर हिंदुस्थानात उभारणी करण्याचा, तो पहिला प्रयत्न आहे, याचा तो इषारा होता. हा संकल्पित प्रकल्प वा त्यात अनस्यूत असलेले उद्दिष्ट साध्य करण्यासाठी हिंदुस्थानात जे धर्मविषयक धोरण या सलतनतीने नक्की केले होते. त्याचे त्यांनी दोन भाग केले होते.

हिंदुस्थानात उगम आहे अशा इस्लाम मधील सुफी पंथियाना अभिप्रेत असलेल्या धार्मिक व्यवस्थेला राज्याने म्हणजेच राज्यकर्त्यांनी आश्रय द्यायचा, २. काही देवालये निवडून त्यांची विटंबना करायची अथवा ती जमिनदोस्त करायची. या सुलतानपूर्वी येऊन गेलेले मुसलमान लुटारू देवालये एका प्रमुख कारणासाठी जमिनदोस्त करीत किंवा त्यांची विटंबना करीत. इराणच्या पठारावरील दूरवर असलेल्या ठिकाणी कारवाई करण्यासाठी सैनिकांना आर्थिक रसद पुरवणे हाच त्या लुटालुटीचे आणि त्याच्या अनुषंगाने केली जाणारी कृत्ये हे त्या मागचे उद्दिष्ट होते. घुरीद राज्यकर्त्यांचे धोरण वेगळे होते. एकतर त्यांनी पराभूत केलेले हिंदू राज्यकर्ते हे इत:पर अवैध (Delegitimates) ठरले आहेत, त्यांनी राज्य करण्याचा अधिकार गमाविलेला आहे हे सिद्ध झाले आहे असे सांगून देवालये जमिनदोस्त करून त्यांच्या विटंबना करून, त्याना समूळ उखडून टाकणे हाच त्या घुरीद सुलतांनाच्या धोरणामागे विचार होता. आपण १) आणि २) हे अनुक्रमे विचारात घेऊया.

### १) सुफी पंथ आणि राज्याची उभारणी

"श्रद्धावानाबरोबर जग फारच घनिष्टपणे जुडलेले आहे." असे इ. स. १३५० साली बाहामनी राज्याच्या दरबारातील कवी "अब्द-अल्-मलीक इस्लामी" यांनी लिहिले होते. त्यांनी आणखी असेही म्हटले आहे की,

"प्रत्येक देशात एक असा धार्मिक-श्रद्धावान संत पुरुष असतो की त्याच्यामुळे त्या

देशाचे चलन-वलन तेही चांगल्या प्रकारे चालू राहते. प्रत्येक देशात राजा असेलही पण तो देश वस्तुतः फकीराच्या (सुफी शेखाच्या) संरक्षणाखाली असतो. राजकारण आणि धर्म यांचे परस्पर संबंध कसे आहेत या विषयी प्रमुख अशी जी मध्ययुगीन पर्शियन इस्लामी संकल्पना आहे त्याचे नीटस व आटोपशीर असे हे निवदेन आहे. दिल्लीतील सलतनत मोंगलाकडून पराभूत झाली नाही. हे कशातून घडले. या सलतनतीला कोणी वाचविले. या बाबत **इस्लामी** यांचा दृष्टिकोन व मत असे होते की सुलतान-मंहमद बिन तघलक (इ. स. १३२५-५०) यांनी सुफी पंथातील 'चिस्ती' या नांवाने प्रख्यात असलेली जी शाखा आहे तिच्या संस्था-पकाच्या स्मरणाविषयी दाखविलेल्या आदरामुळे, त्या सुलतानाचे मोंगलापासून संरक्षण झाले. शेख मुईन अल दिन चिस्ती मृत्यू इ. स. १२३६) याची कबर अजमेर या ठिकाणी आहे. मोगल सैन्याशी लढाई केल्यानंतर थोड्याचं दिवसानी सुलतानाने त्या कबरीस भेट दिली. दिल्लीतील राज्यकर्त्यांच्या सत्तेचा आणि हुकुमतीचा ऱ्हास होणे. आणि सर्वसामान्यपणे तघलक साम्राज्य अस्तंगत होण्याच्या मार्गास लागणे याचे कारण बहुतांशाने दिल्लीतील महशूर **सुफी शेख-निझाम अल-दिन औलिया** याचा इ. स. १३२५ साली झालेला मृत्यू. फकीराचे संरक्षण नाहीसे झाल्याकारणाने तघलक साम्राज्य अस्तंगत होण्याच्या मार्गास लागले. पण त्याबरोबर व्यत्यासपणे (Conversly) इस्लामीना असे वाटत होते की दख्खन-मध्ये दुसऱ्या एका सुफी शेखचे आगमन झाल्याकारणाने इ. स. १३५० च्या सुमारास या प्रदेशातील इस्लामी राज्याची भरभराट झाली. या शेखचे नाव होते. **बुऱ्हान अल-दिन-धरीण** (मृत्यू इ. स. १३३७) सुफी **शेख-निझाम-अद-दिन-औलिया** यांचा हा प्रमुख वारसदार होता.

दक्षिण आशियात सुफी पंथाच्या ज्या शाखा आहेत त्यात चिस्ती ही शाखा हिंदुस्थाना-तील मुसलमानी राज्यांच्या राजकीय नशिबाशी आणि वाटचालीशी घनिष्टपणे जुडलेली होती. विशेष करून दक्षिण आशियात जे प्रदेश होते जे इस्लामच्या हुकुमतीखाली तोवर कधीही आले नव्हते त्या विभागात इस्लामी राजवटीचे रोपण करण्याचा कामात चिस्ती शाखेचा वाटा प्रचंड आहे. चौदाव्या शतकातील पहिल्या अनेक दशकात पुढे वर्णन केलेल्या आकृतिबंधास सुरुवात झाली होती. याच सुमारास तघलक सुलतानांचे साम्राज्य आणि दिल्लीतील शहरी भाग, यात चिस्ती शाखेला दिवसेदिवस अधिक अधिक महत्व मिळू लागले होते. तत्कालीन हिंदुस्थानातील दोन प्रमुख व महत्वाचे पर्शियन भाषिक कवी **अमिर हसन** आणि **अमिर खुसरो** तसेच प्रमुख इतिहासकार **झिआ अल दिन बरानी** हे सारे त्यावेळचे दिल्लीतील प्रमुख चिस्ती **शेख निझाम अल दिन औलिया** यांचे अनुयायी होते. इस्लामी समाजातील अभिजनात या चिस्तींच्या सर्व रचनांचे सातत्याने श्रवण होत असे आणि सुफी पंथातील त्यांची शाखा यांचे ते अभिजन वस्तुतः प्रसिद्धी प्रमुख होते. याचा परिणाम असा झाला की सुफी पंथातील चिस्ती शाखेशी **तघलक घराण्याच्या** भवितव्याचा संबंध आहे. हा विचार राज्यकर्त्या अभिजन वर्गात आणि सामान्य जनतेतही हळूहळू

प्रस्थापित होऊ लागला. इतकेच नव्हे, तर करिष्मा असलेल्या शेख चिस्तींचा जो अधात्मिक प्रभाव व सत्ता होती ती त्यांच्या मृत्यूनंतरही पूर्वी होती तशीच राहते अशी श्रद्धा होती. म्हणूनच त्यांच्या कबरी, त्या स्थानांच्या ठिकाणी निर्माण झालेले दर्गे, तीर्थस्थाने यांचे हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्ते आश्रयदाते होते. श्रद्धावान मुसलमान धार्मिक मुसलमान या धर्मिक स्थानाना वारंवार भेट देत. चिस्ती शाखेतील सर्वात महान शेखाची कबर, त्याच्या आसमंतातील दर्गे, तीर्थस्थाने ही सारी दक्षिण आशियात होती. इतर इस्लामी पंथाच्या पवित्र स्थानाप्रमाणे दूरवरच्या मध्य अगर पश्चिम आशियात नव्हती. याचा परिणाम सुफी पंथातील चिस्ती शाखेच्या कबरी, दर्गे, तीर्थस्थाने, या सर्वांना राज्यकर्त्या मुसलमान राजवटीचा आश्रय मिळण्यात झाला. या आश्रयामुळे आपण वैधपणे इस्लामी आहोतच पण हिंदुस्थानी आहोत असा जो त्या शाखेचा दावा होता त्याला चांगलाच उठाव प्राप्त झाला.

एवंच चिस्ती शेख हे भारतातील मुसलमानांच्या नव्या राज्यांच्या उभारणीत अगदी वैधपणे वारंवार सामील होत. बहामनी राजवटीने इ. स. १३४७ साली तघलक साम्राज्याची हुकुमत झुगारून, दख्खनमध्ये स्वतंत्र अशा हिंदुस्थानातील मुसलमानांच्या हुकुमतीखाली असलेल्या नव्या राज्याची उभारणी केली होती. 'इस्लामी'नी बहामनी क्रांतीचा इतिहास कथन केला आहे. या वृतांतात प्रेषित मंहमद पैगंबराकडून आपल्याकडे सुपूर्द करण्यात आलेली धार्मिक व राजकीय झूल (KHIRGA) कशी पोचली हे सांगितले आहे. **अबुबक्र** या पहिल्या खलिफापासून ती थेट **झिआन अल-दिन शिराझी** (मृत्यू इ. स. १३६९) यांच्यापर्यंत व त्यानंतर **बुऱ्हान अल-दिन घरीब** प्रमुख अनुयायांकडे येऊन कशी पोचली याचे विवरण हा त्या साऱ्या वृतांताचा गाभा आहे. 'धर्मिक अधिकाराची झुल' जवळ असली की त्याच्या सुगंधाने राजकीय आणि धार्मिक या दोन्ही जगतावर प्रमुख मिळविता येते. बहामनी सलतनतच्या संस्थापकाचे नाव होते **सुलतान हसन बाहमन शहा** (इ. स. १३४७ ते १३५८) या सुलतानाला आपली सत्ता वा स्फूर्ती यांची त्या सुगंधी झुली पासून प्राप्त झाली होती असे सांगण्यात येत होते. हाच आकृतिबंध आपणास बंगालमध्येही आढळून येतो. बंगाल हा तघलक साम्राजातील एक प्रांत इ. स. १३५० च्या सुमारास दिल्लीचे अधिपत्य झुगारून तो प्रांत स्वतंत्र झाला. बंगालमध्ये **इलायास शाहीची** (इ. स. १३४२ ते १४८६) स्थापना करण्यात आली होती. या संस्थापकाने त्यांच्या कारकिर्दीत ज्ञात असलेल्या स्मारका-पैकी पहिले स्मारक मशीद मार्शल इ. स. १३४२ साली बांधले. ही मशीद सुफी शेख **आला अल हक** (मृत्यू इ. स. १३९८) यांना अर्पण करण्यात आली होती. हे सुफी **झिआँ-अद-दिन** या दख्खनी सुफी शेख प्रमाणेच हिंदुस्थानातील, मुसलमानी साम्राज्याच्या राजधानीतील महान **शेख निझान-अद-दिन औलिया** (मृत्यू इ. स. १३२५) यांचे अनुयायी होते. या महान शेखाना ते आपला आधात्मिक गुरू मानीत. या ठिकाणी आणखीही एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. **इलायास शाही** राजवटीचे दिवसेदिवस वाढत जाणारे वर्चस्व आणि

**शेख आला-अल हक,** त्यांचे कुटुंबिय यांचा आध्यात्मिक उत्कर्ष या दोन्ही घटना अगदी तंतोतंतपणे एकाच कालखंडात घडलेल्या आहेत. इ. स. १५३२ सालपर्यंत होऊन गेलेल्या एका पाठोपाठ येणाऱ्या चौदा सुलतानानी आपण याच सुफी शेखांचे आणि त्यांच्या वारसांचे अनुयायी आहोत असे सांगितले होते. **आल - अल - हक** यांचे चिरंजीव आणि त्यांचा आध्यात्मिक वारस नूर-कुतुब-टु-आलम या दोघांच्याही कबरी वस्तुतः सलतनतने मान्य केलेली तीर्थस्थाने-दर्गे (Shrine) होती. या सुफी शेखच्या मृत्यूनंतर झालेले सर्व सुलतान या तीर्थस्थानिय दर्ग्याला वर्षातून किमान एकदा तरी भेट देत असत.

थोडक्यात सांगावयाचे झाल्यास इ. स. १३४२ ते १३४७ या पाच वर्षाच्या कालखंडात बंगाल व दख्खन जे या ठिकाणांच्या हिंदुस्थानातील मुसलमानांच्या दोन्हीही राजवटीनी स्थानिक सुफी शेखना राजाश्रय दिला होता. या सुफी शेखांचे जे आध्यात्मिक गुरू होते त्यांनी दिल्लीतून स्थलांतर करून ते या दोन्ही ठिकाणी येऊन स्थाईक झाले होते. अर्थात या सर्व स्थानिक सुफी शेखानी, हिंदुस्थानातील मुसलमानी साम्राज्याची राजधानी दिल्ली येथील महाविख्यात व प्रमुख सुफी-शेख **निझाम अल-दिन औलिया** यांच्या पायाशी बसून आध्यात्मिक धडे घेतले होते. तघलक साम्राज्य या कालखंडानंतर कोसळतच गेले होते. याच कारणामुळे हिंदुस्थानातील मुसलमानांची वेगवेगळी राज्ये निर्माण झाली होती. या सर्वच ठिकाणी या अगोदर उल्लेखिलेल्या आकृतिबंधाचे आर्वतन झालेले दिसून येते. इ. स. १३९६ साली गुजराथ प्रांताचा तघलक राजवटीचा सुभेदार मुझफ्फरखान याने आपण दिल्लीचे अधिपत्य मानीत नसून आपण स्वतंत्र झाल्याचे जाहीर केले. यानंतर मुझफ्फर यांनी लगेच अजमेर येथील प्रख्यात 'दर्ग्याला' भेट दिली. **मुईन अल दिन** चिस्ती यांच्या कबरस्तानाला भेट देऊन, त्यांच्याबद्दल वाटत असलेला आदर, त्यांच्या स्मृतीवर असलेली आपली भक्ती जाहीरपणे प्रकट केली होती. हा दर्गा हिंदुस्थानातील चिस्ती पंथियांचा सर्वात महत्वाचा दर्गा (Mother shrine) मानला जातो. माळवा प्रांतातील तघलक सुभेदार **दिलदरखान** यांनी इ. स. १४०४ मध्ये दिल्लीपासून आपण स्वतंत्र झाल्याचे जाहीर केले. या स्वातंत्र्याचा पुकार केल्यानंतर त्यांनी असे उघडपणे सांगितले की **शेख नासिर दिन मंहमद** (मृत्यू १३५६) यांच्या सुफी पंथाचे जे प्रमुख होते त्यांचे आपण अनुयायी आहोत, हे शेख देखिल **निझाम अल दिन ओलिया** यांचे एक अत्यंत नामवंत असे शिष्य व अनुयायी होते पण या शिष्याने दिल्ली कधीच सोडली नव्हती. या शेखांच्या कबरीवर सुलतान फिरूझ शहा तघलक (इ. स. १३५१ ते १३८८) यांनी काही दशका अगोदर एक देखणी वास्तू उभारली होती.

तघलक घराण्याच्या मागून दिल्ली तक्त्यावर मोगल राजवट आली. राजवट बदलली तरी या राज्यकर्ते-चिस्ती संबंधाच्या आकृतीबंधात काहीही फरक झाला नाही. इ. स. १५२६ साली **बाबराने** दिल्लीत प्रवेश केला. हा विजय प्राप्त झाल्याबरोबर ताबडतोब चिस्ती पंथियांच्या दृष्टीने दुसऱ्या क्रमांकाच्या ठिकाणी असलेल्या महान शेख बकतियार काझी (मृत्यू



अनुक्रमणिका

इ. स. १२३५) यांच्या स्मरणार्थ जो दर्गा आला होता त्या ठिकाणी जाऊन प्रार्थना केली. या दिल्लीच्या नव्या सुलतानाच्या मेव्हण्याने चिस्ती **निझाम-अल-दिन औलिया** यांची कबर पुन्हा एकदा नव्याने बांधून काढली. इ. स. १५७१ मध्ये बादशहा अकबराने आपले पिताजी हुमायून याची कबर चिस्ती **निझाम-अल-दिन औलिया** यांच्या स्मरणार्थ जो दर्गा बांधला गेला होता त्या स्थानावजळ बांधली. त्याच वर्षी त्याने **फत्तेपूर सिक्री** या नव्या राजधानीच्या उभारणीस सुरुवात केली. **सलिम चिस्ती** यांनी चालविलेले एक रूग्णालय, तीर्थयात्रा करणारासाठी धर्मशाळा, इत्यादी कामासाठी बांधलेली जी इमारत होती तिच्या जवळच या नव्या राजधानीच्या उभारणीस आरंभ करण्यात आला होता. **बादशहा अकबर** यांना लवकरच पुत्ररत्नाची प्राप्ती असे भाकीत ज्यांनी वर्तविले होते त्या **सलिम चिस्ती** यांच्या कार्यक्षेत्राजवळ ही नवी राजधानी उभारण्याचा निर्णय घेण्यात आला होता. **सलिम चिस्ती** यांनी आपल्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसात राजपुत्र-भविष्य काळातील बादशहा. जहांगीर यांना फेटा बांधला आणि शिवाय तो आपल्या आध्यात्मिक वारस आहे असे जाहीर केले होते. जहागिर बादशहा या पदावर स्थानापन्न झाल्यानंतर इतर सर्व दर्ग्यांनी ज्याचे अनुकरण केले होते त्या अजमेर येथील दर्ग्याजवळ अनेक कायम स्वरूपाच्या कमानी उभारल्या आणि इतरही अनेक इमारती बांधल्या. शहाजहान बादशहाने मेवाडच्या राजाच्या पराभव केल्यानंतर विजयोत्सव साजरा करण्यासाठी त्याने जहांगिराचे अनुकरण केले होते. **शहाजहान** बादशहाची कन्या **जहाँआरा** हीने **मुईन अल-दिन** चिस्ती यांचे चरित्र लिहिले. शहाजहान बादशहानंतर त्यांचे चिरंजीव औरंगजेब हे मोगल सम्राट झाले. त्याने तघलक राजवटीचे अनुकरण करून, आपल्या साम्राज्याचा विस्तार अखिल हिंदुस्थानात करण्याच्या कामाला सुरुवात केली. उदा. दखखन भागातील गुलबर्गा आणि खुलदाबाद या ठिकाणी असलेल्या कबरस्थानाना भेट दिली आणि तेथील दर्ग्यांना भरपूर अर्थ सहाय्यही केले. अजमेर आणि दिल्ली या ठिकाणच्या चिस्ती दर्ग्यांचा त्याना अर्थातच विसर पडला नव्हता. त्या ठिकाणी देखिल ते भेट देत व भरपूर अर्थ सहाय्य करीत. औरंगजेबानंतर मोगल साम्राज्याला उतरती कळा आली. पण या परिस्थितीतही हे अखेरच्या काळातील मोगल सम्राट ज्या कोठच्या चिस्ती दर्ग्यांना त्यांना भेट देणे शक्य होते त्या दर्ग्यांना ते भेट व आश्रय देतच होते. उदा. **दुसऱ्या आलमगिराने** निझाम अल दिन औलिया यांची कबर दुरूस्त केली आणि तेथे आणखी काही इमारती बांधल्या हे चिस्ती पंथाबद्दल त्यांना असलेल्या भक्तीचे प्रदर्शन (शेवटचा मोगल बादशहा **दुसरा बहादूरशहा** (याला इ. स. १८५८ साली पदच्युत्त करण्यात आले त्यांनी चिस्ती **शेख बखतीयार काझी** यांच्या दर्ग्याजवळ आपला वाडा बांधून घेतला त्याच स्थानावर जाऊन पहिला मोगल बादशहा बाबर याने तीन शतकापूर्वी प्रार्थना केली होती) तो पर्यंत चालूच होते.

एवंच मोगल घराण्यातील सर्व बादशहांची अशी श्रद्धा होती की या चिस्ती शेखांच आर्शीवाद हेच या जगातील आपल्या यशाचा मुलाधार आहे. अकबर बादशहाने **मुईन अल**

**दिन** चिस्ती यांच्या अजमेर येथील दर्ग्याला भेट देण्यासाठी चौदा दर्गा यात्रा केल्या होत्या. त्यापैकी एक इ. स. १५२६ साली चितोड घेतल्यानंतर, दुसरी इस़. १५७४ साली बंगालवर सत्ता प्रस्थापित केल्यानंतर. या दोन्ही घटनानंतर लगेचच या दर्गा यात्रा करण्यात आल्या होत्या. मोगल इतिहासकार अब्द अल क्यादीर (Qadir) यांच्याजवळ या सैनिकी विजयाची चर्चा करताना त्यांनी असे सांगितले की हे सर्व विजय पिराच्या (मुईन अल दिन यांच्या) कृपेमुळे प्राप्त झाले आहेत. या चौदा दर्गा यात्रांपैकी बहुतेक यात्रा पायी प्रवास करून करण्यात आल्या असल्याकारणाने अजमेर दर्ग्याचे महत्व हे अत्यंत नाट्यपूर्णपणे व वेधकपणे अधोरेखित होते म्हणून मोगल साम्राज्य विलयास गेल्यानंतरही मोगल चिस्ती सहकार्य तितक्याच जोरकसपणे अस्तित्वात अजूनही टिकून आहे. सर्वसामान्यपणे चिस्ती दर्ग्यात नमाज पढण्यापूर्वी व त्यानंतर जे सोहाळे होतात, त्यात ज्या प्रकारची दरबारी भाषा वापरली जाते, जे रितारिवाज व परंपरा यांचा अवलंब केला जातो विषेश करून अजमेर दर्ग्यात या सर्वातून या चिस्ती पंथियाच्या धार्मिक व्यवस्थेत मोगल दरबारी संस्कृतीने किती विलक्षण प्रमाणात हस्तक्षेप व प्रवेश केला आहे हे प्रतिबिंबीत होते.

### देवालयांची विटंबना ती जमिनदोस्त करणे व इस्लामी राज्यांची उभारणी

येथवरच्या विवेचनातून मध्ययुगीन हिंदुस्थानातील प्रत्येक मुसलमानी राजवट आपल्या स्थापनेपासून आपल्या सामाजिक राजकारणात आपल्या राजवटीला जेणेकरून वैधत्व प्राप्त होईल असा एक घटक आणून सोडीत (Inject) असे. हा घटक कोणता? चिस्ती शेखाना राजकीय आश्रय देऊन, भारतात इस्लामी राज्यांची उभारणी करण्याची जी प्रक्रिया होती त्याला सक्रिय व सकरणात्मक असे योगदान, चिस्ती शेखाना देण्यात येणारा राजकीय आश्रय. या धोरणामुळे हिंदुस्थानात इस्लामी राज्याची उभारणी करण्याची जी प्रक्रिया होती त्याला सक्रिय व सकरणात्मक असे योगदान प्राप्त होत होते. या प्रक्रियेला तितकीच एक नकारात्मक बाजूही आहे. नव्याने पादाक्रांत केलेल्या आणि आपल्या साम्राज्याला जोडून घेतलेल्या प्रदेशात तोवर जे कोणी राजकीय अधिकार गाजवित होते अथवा ज्यांच्याकडे हा अधिकार होता ते एका झटक्यात बाजूला सारण्यात येत असत. त्या प्रदेशाच्या राजाकडे हे जे अधिकार असत, तसेच त्याचा राज्य करण्याचा अधिकार आणि त्या राजवटीचे वैधत्व हे त्या राजाचा ज्या देवालयावर वरदहस्त होता त्यांच्याशी संबंधित असत. या देवालयाचे सर्वसामान्यपणे रास्त ठरेल असे वर्णन पुढील शब्दात करता येईल. या सत्ताधारी राजवटीचे जे राज्य दैवत होते (सामान्यपणे विष्णु अगर शिव) त्याची ज्या देवालयात स्थापन झालेली असे. अशा देवालयांची सर्व साधारणपणे विटंबाना केली जाई व लूट करण्यात येत होती. वेळप्रसंगी त्याना जमिनदोस्त करण्यात येत असे अगर त्याचे रूपांतर मशिदीत करण्यात येत असे. असे केल्याने, ज्या राजाच्या व राजघराण्याचा पराभव झालेला होता त्याचे वैधत्व

हिरावून घेण्यात येत असे. त्याचे असे आहे या राज्य-दैवताच्या कृपेमुळे राजघराण्याला जे अधिकार प्राप्त झालेले होते; त्या दैवतांचीच विटंबना झाल्याकारणाने, राजा या राज्य-दैवताचे संरक्षण करण्यास असमर्थ ठरल्याकारणाने, त्याने राज्य करण्याचा अधिकार गमावलेला होता, अगर वेगळ्या दृष्टीने विचार करता, या देवतेची राजावर अवकृपा झाली होती म्हणून तो त्या देवालयाचे रक्षण त्याला करता आले नाही. याच अर्थानी या राजाला राज्य करण्याचा अधिकार इत:पर नव्हता. हे त्या देवालयाची विटंबना, लूट, ते जमिनदोस्त करणे, त्याचे रूपांतर मशिदीत करणे या कृत्याकरवी राज्य करण्याचा अधिकार राजाने गमाविलेला आहे हे स्पष्ट करण्यात येत होते. परंतु ज्या देवालयाना अशा प्रकारचे महत्वाचे स्थान नव्हते यदाकदाचित इतिहासात केव्हा तरी मान असला तरी तत्कालिन प्रचलित राजवटीत ज्या देवालयाला तो मान नव्हता अशा देवालयाना हात लावण्यात येत नव्हता उदा. या संबंधात काही महत्वाच्या देवालयांचा निर्देष करता येईल. एकच उदाहरण घेऊया. गंगेच्या खोऱ्याच्या मध्यभागाच्या दक्षिणेला असलेली, विद्यमान काळी जगतविख्यात ठरलेली **खाजूराहो** देवालये. या देवालयांचे एकेकाळी **चंदेला** राजघराणे हे आश्रय दाते होते. परंतु अकराव्या शतकाच्या सुरुवातीला यांचा राजाश्रय काढून घेण्यात आला होता. तुर्की सैन्य त्या ठिकाणी पोचले असताना सुद्धा, त्यांनी या देवालयांना हात लावला नाही तो त्याच कारणामुळे.

विवेचनाच्या या स्थळी एका मुद्याबद्दल थोडेसे विस्ताराला लिहाले लागेल. इस्लाम धर्माचे व्यवच्छेदक लक्षण मूर्तीभंजनाचे धर्मशास्त्र (Theology of iconoclasm) हे आहे असे सांगण्यात येते. एक मुद्दा स्पष्ट आहे की, तत्कालीन पर्शियन भाषेतील दस्तऐवजातून 'मूर्ती-पूजेचा' निषेध ही इस्लामची आज्ञा आहे म्हणून निषेध करण्यात आलेला आहे. आपण जेथे स्वारी करून गेलो आहोत तेथल्या राजाने, ज्या मूर्तीना व ज्या देवालयाना राजाश्रय दिला होता; त्यांच्यावर इ. स. सहाव्या शतकापासून इस्लाम धर्मीय आक्रमक हल्ले करीत होते हेही सत्य आहे. राजा आणि त्याची राज्य देवता, हे परस्परावर किती अवलंबून आहेत हे तपशीलात जाऊन प्रदर्शित करणारी शिल्पे. कामुकतेचे दर्शन करणारी शिल्पे, तसेच परस्पराशी समरसता प्रदर्शित करणारा ईश्वरी आणि मानवी समाजावरचा राजाधिकार, इत्यादी गोष्टी देवालयाच्या शिल्पातून प्रकट होत होत्या. एवंच मध्ययुगीन हिंदुस्थानाच्या अगदी आरंभीच्या कालखंडात राजाश्रय असलेली देवालये आणि त्यांची संकुले या सर्वस्वी, तत्कालिन समाजात प्रभावी आणि दिमाखाने मिरविणाऱ्या राजकीय संस्था होत्या. नेमक्या याच ठिकाणी सहाव्या शतकानंतर मानवी राजाधिकारशाही (KINGSHIP) ही प्रस्थापित झाली होती. तिला आव्हान देण्यात येत होते. राजाश्रय असलेल्या देवालयाच्या आतल्या गाभाऱ्यात ज्या मध्यवर्ती देवतेची मूर्ती ठेवण्यात आलेली असे आणि त्याच ठिकाणी राजाश्रय देणाऱ्या राज्यघराण्याच्या राज्य देवतेची प्रतिष्ठापना केलेली आहे. या दोन देवतांच्या एकाच ठिकाणच्या प्रस्थापनेतून राजा, त्या देवता आणि त्या राजघराण्याचा अमंल ज्या

प्रदेशावर असे त्यात त्या देवता सहभागी आहेत हे आविष्कृत होत असे. **या संदर्भात इतिहासकार बी. डी. चटोपाध्याय यांनी विवरण करताना असे सांगितले आहे की** इ. स. ७०० ते १२०० च्या दरम्यान हिंदुस्थान मोठ्या प्रमाणात देवालयाची बांधणी झाली. या देवालयातले म्हणजे ज्या ठिकाणी राज्यदेवताची प्रतिष्ठापना करण्यात आलेली होती तेथील पुजारी या देवताना सर्व मानवी शक्तीपलिकडे जाणारी आणि विश्वात्मक अशी शक्ती बहाल करीत असत. परंतु हीच देवता ते देवालय आणि त्याचे संकुल ज्या भौगोलिक विभागात होते तेथे ही देवता व विभाग यांच्याशी त्या देवतेचे खरोखरीच खास संबंध आहेत व ते सार्वभौम आहेत असे समजले जाई. **मायकेल विल्लीस** यांनी असे सुचविले आहे की **प्रतिहार** या राजघराण्यातील सम्राटानी जी देवालये व त्याची संकुले आपल्या राजघराण्याची स्मारके ठरतील अशी प्रचंड देवालये व त्यांची संकुले यांची उभारणी केली नाही. ही वस्तुस्थिती आहे. ''परंतु त्यांनी ते केले नाही याचे कारणही वर उल्लेखलिल्या विचारात अनस्यूत आहे.'' असे एखादे आपल्या राजाश्रय असलेले महादेवालय व त्यांचे संकुल यांचे संकल्प-चित्र तयार करणे आणि त्यानुसार ते बांधून घेणे याचा अर्थ आपली सत्ता त्या देवालयाच्या परिसरापुरतीच मर्यादीत आहे, असा त्याचा अर्थ आहे हाच मुद्दा त्या महादेवालयाने आवश्यकपणे प्रक्षेपित केला असता. **प्रतिहाराना** नेमके हेच नको होतो. त्यांनी महादेवालये न बांधण्याचा जो निर्णय घेतला होता. त्याला या कारणामुळे निश्चिती प्राप्त झाली होती. याच युक्तीवादाचा तर्कशुद्ध पाठपुरावा केल्यानंतर पुढील निष्कर्ष काढणे क्रमप्राप्तच ठरते. **प्रतिहाराप्रमाणे** ज्यांनी प्रचंड साम्राज्ये निर्माण करण्याची स्वप्ने पाहिली नव्हती असे छोटे राजे देवालये बांधण्याच्या कामी मोठ्या उत्साहाने या कालखंडात सहभागी होते. तत्कालीन वस्तुस्थिती तीच होती. या संदर्भात **डेव्हिड डी. शुलमन** यांनी असे विधान केले आहे की एखाद्या विशिष्ट ठिकाणी स्वाभाविकपणे एखाद्या देवतेच्या दैवी शक्तीचा अनुभव येई. म्हणूनच कोणत्याही देवालयाची उभारणी कशी व कोणी केली या संबंधीचा जो वृत्तांत आहे त्यात या दैवी शक्तीचे प्रकटन कशा प्रकारे आविष्कृत होते, आणि त्या प्रकटनांची विशिष्ट लक्षणे व गुण काय आहेत या संबंधीची व्याख्या बंदिस्त करणे या विषयीं त्या वृत्तांताला कर्तव्य असल्याचे दिसते. ''या वृत्तांतातून असा निष्कर्ष काढणे क्रमप्राप्त ठरते की या देवतेची ज्या ठिकाणी मुळात प्रतिष्ठापना झाली होती, तिला त्या मूळस्थानापासून दूर हलविले की ती देवता व ते भौगोलिक स्थान यात जो अनुबंध होता त्याची फारकत होई. एवंच एखाद्या भूभागावर राज्य करणारा राजा, या देवतेची राजाश्रय असलेल्या ज्या देवालयात प्रतिष्ठापना झालेली आहे आणि राजाच्या अंमलाखाली असलेला परिसर यांच्यात जो अनुबंध होतो तो हिंदुस्थानातील मध्ययुगात व सहाव्या शतकात सुरुवातीच्या काळातील **बृहतसंहिता** या संस्कृत ग्रंथातील एका परिच्छेदातून फारच सूचकपणे तपशीलात जाऊन चांगल्या प्रकारे आविष्कृत झालेला आहे. या परिच्छेदात असे सांगण्यात आले आहे की, जर एखादे शिवलिंग, त्याच्या प्रतिमेची ज्या देवालयात प्रतिष्ठापना झालेली आहे ते देवालय

त्यातील प्रतिमा दुंभगली, अनेक तुकडे होऊन विखुरली, ती प्रतिमा त्या ठिकाणाहून दूर गेली वा हलविली गेली ती घामाघूम झाली; अश्रू ढाळू लागली, बोलू लागली, अगर काहीही दृष्य कारण नसताना अशा स्वरूपाची वागणूक करू लागली, तर या साऱ्याचा अर्थ या देवालयाला राजाश्रय देणारा राजा, त्याच्या अमलाखाली असलेला प्रदेश हे भुईसपाट होणार आहेत याबद्दल तो इषारा आहे.' थोडक्यात इ. स. सहाव्या शतकानंतर राजघराण्याच्या राजकीय अधिकाराशी संबंधीत असलेल्या दैवताच्या प्रतिमा आणि त्यांची ज्या ठिकाणी प्रतिष्ठापना झाली आहे व ज्याना राजाश्रय आहे अशी देवालये, ती सारी केवळ राजकीय दृष्टीकोनातून विचार करीता या जमिनदोस्त करण्याजोग्या वास्तू वा शिल्पे आहेत असे समजले जात होते.

देवालये, त्यातील मूर्ती आणि त्यांना असलेला राजाश्रय हे लक्षात घेतले, म्हणजे मग हिंदुस्थानात मध्ययुगाच्या सुरुवातीच्या काळातील हिंदुस्थानाच्या इतिहासात राजघराण्यांचे जे संघर्ष झाले, त्यात देवालयांची विटंबना करण्याच्या प्रसंगांची रेलचेल का आहे याबद्दल आश्चर्य वाटण्यासारखे काहीही नाही. उदा. इ. स. ६४२ मध्ये स्थानिक परंपरागत ज्ञानानुसार (याला लेखी पुरावा अर्थातच उपलब्ध नाही) **पल्लव** राजघराण्याचा राजा **पहिला नरसिंहवर्मन** याने **चालुक्य** राजघराण्याची राजधानी वातापी येथील गणेश मूर्ती असलेल्या देवालयाची लूट केली. या घटनेनंतर याच **चालुक्या** राजाच्या सैन्याने उत्तर भारतावर स्वारी केली आणि काही मूर्ती लुटून दक्षिण हिंदुस्थानात आणल्या होत्या. या मूर्ती **गंगा** आणि **यमुना** या देवतांच्या होत्या. उत्तर भारतातील त्या प्रदेशातील जे राज्यकर्ते होते त्यांचा या देवतांच्या प्रतिमांची ज्या देवालयात प्रतिष्ठापना करण्यात आली होती त्या देवालयाना राजाश्रय होता. या कारणास्तव या देवालयाची लूट करून या मूर्ती चालुक्यांचे सैन्य. आपल्याबरोबर घेऊन गेले होते. आठव्या शतकात ललितादित्य या राजावर सूड उगविण्याकरिता बंगाली सैन्याने त्या राजावर चाल करून काश्मिर या भागात गेले ललितादित्यांची राज्य-देवता विष्णू होती. या विष्णू वैकुंठाच्या देवतांच्या प्रतिमांची ज्या देवालयात प्रतिष्ठापना करण्यात आली होती ते देवालय लूटून आपल्या मनातील सूड भावनेची परिपूर्ती करण्यासाठी या देवालयातील मूर्ती विष्णू वैकुंठाच्या आहेत असे समजून त्या नष्ट केल्या होत्या. नवव्या शतकात **राष्ट्रकूट** घराण्याचा राजा **तिसरा गोविंदा** यांने **कांचिपूरमवर** हल्ला करून त्याचा ताबा घेतला. या राजाच्या कृतीने प्रोत्साहित होऊन, श्रीलंकेच्या राजाने आपल्या सिंहली राज्याचे प्रतिनिधित्व करणाऱ्या अनेक मूर्ती राष्ट्रकूटाकडे पाठविल्या. या मूर्ती बुद्धाच्या वा बुद्धधर्माशी संबंधित असाव्यात. या मूर्ती आल्यानंतर त्यांची शिव-देवालयात स्थापना करण्यात आली होती. याच सुमारास **पांड्यन (Pandyan)** राजघराण्यातील राजा **श्रीमारा श्रीवल्लभा** यांने लंकेवर स्वारी केली आणि त्या प्रदेशातून बुद्धाची सुवर्ण मूर्ती तेथे केलेल्या लुटीत हस्तागत करून, तो आपल्या राजधानीत परत आला. ही मूर्ती सिंहली राजवट व त्या समाजाचे प्रतिक होती. ही मूर्ती राजधानीत आणल्या-

नंतर तिची स्थापना राज्यातील रत्न राजवाड्यात (Jewel Palace) ठेवण्यात आली होती. दहाव्या शतकाच्या आरंभीच्या काळात, **प्रतिहार** राजवटीतील **हेरबंचाल** या राजाने ध्रांगा येथील **साही** राजाची, विष्णु-वैकुंठ या देवतेची भरभक्कम अशी सोन्याची मूर्ती लूट करून आणली. दहाव्या शतकाच्या मध्याच्या आसपास हीच सोन्याची मूर्ती **चंदेला** राजघराण्यातील राजा **यशोवर्मन** यांनी लुटून नेली आणि तिची स्थापना खाजुराहो येथील लक्ष्मण देवालयात केली होती. अकराव्या शतकाच्या सुरुवातीला **चोल** घराण्यातील राजा पहिला **राजेंद्र** याने आपल्या स्वामित्वाखाली अनेक तत्कालिन महत्वाच्या राज्यातील देवालयांची लूट करून अनेक मूर्ती आणल्या आणि आपल्या राजधानीतील देवालये, त्या मूर्तींनी सुशोभित केली. उदा. **चालुक्यांच्या** अमलाखालील प्रदेशातील दुर्गा आणि गणेश यांच्या मूर्ती ओरिसातील कलांग प्रदेशातील भैरव, भैरवी आणि काली यांच्या मूर्ती, पूर्वेकडील **चालुक्यांच्या** प्रदेशातून नदीच्या मूर्ती, आणि बंगाल मधील **पालासांच्या** राजवटीतून आणलेली ब्रांझ धातूची 'शिव' मूर्ती इत्यादी मूर्तींचा त्यात समावेश आहे. अकराव्या शतकातील मध्यवर्ती **चोला** राजघराण्यातील राजा राजाधिराज याने **चालुक्यांचा** पराभव केला. कल्याणी नगरी लुटली. आणि या लुटीचा भाग द्वारपालाची दगडी मूर्ती होती. आपण युद्दात जो विजय मिळविला, त्या युध्दाचे उत्तम पारितोषिक या स्वरूपात आपल्या अमलाखालील प्रदेशात या मुर्तीचे प्रदर्शन करण्यात आले होते.

यावर अशी कोणी समजूत करून घेईल की तुर्कांचे हिंदुस्थानवरील आक्रमण यशस्वी झाल्यानंतर हा 'आकृतिबंध' कार्यवाहीतच नव्हता. पण तसे काही घडले नाही, तो पूर्वी प्रमाणेच उपयोगात येत होता. उदा. ओरिसातील **सूर्यवंशी** गजपती राजवटीचे संस्थापक **कपिलेंद्र** यांनी तामिळनाडूवर इ. स. १४६० साली, तो प्रदेश पादाक्रांत करण्यासाठी अनेक स्वाऱ्या केल्या. या युद्धाच्या धामधुमीत त्यांनी कावेरी नदीच्या परिसरात येणाऱ्या भागातील शिव आणि विष्णू यांनी देवालये लुटली होती. त्यानंतर काही वर्षांनी इ. स. १५१४ मध्ये उदयगिरी येथील देवालय लुटून त्यात असलेली बाळकृष्णाची मूर्ती कृष्णदेवरायाने उचलून नेली होती. उदयगिरीचा अर्थातच कृष्णदेवरायाने पराभव केला होता हे ओघानेच आले. त्यांनी हा प्रदेश विस्तारीत होत असलेल्या आपल्या साम्राज्यात सामिल करून घेतला. यानंतर सहा वर्षांनी (इ. स. १५२०) त्यांनी महाराष्ट्रातील महाविख्यात तीर्थस्थान पंढरपूरचा कब्जा घेतला. वरवर पहाता असे दिसते की त्या ठिकाणीच्या विठ्ठल मंदिराची लूट करून, तेथील विठ्ठलाची मूर्ती विजयनगरला नेली होती. या भागातील धार्मिक भावनेचा वापर करून हा प्रदेश आपल्या राज्यात सामिल करून घेणे हे त्याचे उद्दिष्ट असावे. एकीकडे मुसलमान तुर्की सुलतान बाराव्या शतकाच्या अखेरीला आणि तेराव्या शतकाच्या सुरवातीला उत्तर हिंदुस्थानात, आपल्या सलतनीतला भक्कम पाया कशा प्रकारे प्राप्त करून देता येईल या उद्योगात ते गुंतले होते. हे होते होते त्या अगोदरच्या शतकात काश्मिरचा **राजा हर्ष** याने देवालयांची लूट करणे या कृतीला संस्थात्मक स्वरूप प्राप्त करून दिले होते. त्याच सुमारास



अनुक्रमणिका

गुजराथमधील **परमार** घराण्यातील राजांनी गुजराथ मधील जैन मंदिरांची लूट केली होती.

राजाश्रय असलेल्या वा राजाच्या देवालयांची लूट करणे आणि त्यात राज्य देवतेची प्रतिष्ठापना झालेली असेल तर त्याच्या मूर्ती पळवून नेणे हा आकृतीबंध हा हिंदु राजांच्या बाबतीत प्रभावी होताच. परंतु आपल्या राजकीय विरोधकांचा राजाश्रय असलेली देवालये जमिनदोस्त करण्यात काही हिंदु राजे सहभागी असल्याचीही उदाहरणे आहेत. उदा. दहाव्या शतकाच्या सुरुवातीला राष्ट्रकूट घराण्यातील **इंद्र** तिसरा या राजाने यमुना नदीच्या काठी **कल्पा** या ठिकाणी असलेले **कलाप्रिया** देवतेचे देवालय त्याने जमिनदोस्त केले होते. या देवालयाला राष्ट्रकूटांचे राजवटीचे कट्टर शत्रू **प्रतिहार** राजघराण्याचा आश्रय होता. राष्ट्रकूटानी हे देवालय जमिनदोस्त केलेच, पण त्याच बरोबर आपले हे शौर्य इतिहासात नोंदविले जाईल हे काम विषेश आनंदाने व उत्साहाने केले होते.

एवंच मुसलमान तुर्क हिंदुस्थानात येण्यापूर्वी कितीतरी वर्षे अगोदर एखाद्या राजवटीला दुसऱ्या एखाद्या राजवटीपेक्षा आपली सत्ता व अधिकार मोठा आहे हे सिद्ध करावयाचे असेल तर त्यासाठी दुसऱ्या राजाचा वा राजवटीचा आश्रय असलेली देवालये लुटणे आणि तेथील मूर्ती पळविणे हा आकृतिबंध मान्य झालेला होता. असे लुटलेले देवालय हे स्पर्धेत आपण विजयी झाली आहोत हे सिद्ध करण्याचे स्वाभाविक ठिकाण समजले जाई. म्हणूनच हिंदुस्थानावर स्वारी करून आलेल्या तुर्कांनी मध्ययुगीन हिंदुस्थानाला आपली राजवट भक्कम पायावर उभी करण्याच्या प्रयत्नात आपण येण्याअगोदर प्रस्थापित झालेल्या या आकृतिबंधाचा वापर करण्याचे ठरविले आणि हे धोरण सातत्याने चालू ठेवले होते. यात आश्चर्य करण्यासारखे काहीही नाही. उत्तर हिंदुस्थानात मुसलमान-तुर्क सत्तेची स्थापना झाल्यानंतर जी देवालये जमिनदोस्त करण्यात आली अथवा ज्यांची विटंबना करण्यात आली ते दाखविणारा नकाशे व तक्ते या लेखात देण्यात आलेले आहेत. **अर्थात ही यादी परिपूर्ण नाही आणि त्यातून या कृतींचे पूर्णतः चित्रीकरण झाले आहे असाही दावा नाही.** अर्थातच आणखी काही देवालये भ्रष्ट करण्यात आली असणार आणि त्या घटनांची नोंद इतिहासाने कधीही घेतली नाही. यदाकदाचित ती घेतली गेली असल्यास त्या सबंधातील दस्तऐवज या घटकेला तरी उपलब्ध नाहीत. या उलट (Conversly) हिंदुस्थानातील नंतरच्या मुसलमान तवारिखांनी इतिहास काळात होऊन गेलेल्या या सुरुवातीच्या काळातील मुसलमान राज्यकर्त्यांची धार्मिक श्रद्धा किती उच्च कोटीची होती याचे गुणगान करण्यासाठी या घटनांची नोंद घेण्याचा प्रयत्न त्यांनी केला होता. थोडक्यात हिंदुस्थानाच्या इतिहासाच्या वाटचालीत किती **देवालयांची विटंबना करण्यात आली वा जमिनदोस्त करण्यात आली याचा नेमका आकडा देता येणार नाही.** तत्कालिन अगर त्या काळाच्या जवळच्या परंतु इ. स. ११९२ ते १७२९ या पाचशे वर्षाहून अधिक वर्षात एकाद्या वर्षात अगर त्या वर्षाच्या जवळच्या काळातील शिलालेखात वा लिखाणात आढळणाऱ्या पुराव्यावरच अगदी कांटेकोरपणे भिस्त ठेऊन सांगावयाचे झाल्यास एक बाजवी ठरावे असे



अनुक्रमणिका

विधान करता येते. ज्या देवालयांच्या कधी काळाच्या अस्तित्वाबद्दल शंका घेता येणार नाही, अशा ऐंशी देवालयांची विटंबना घरण्यात आली होती अगर त्यातील काही जमिनदोस्तही करण्यात आली होती ! हिंदु राष्ट्रवादी साठहजार देवालयांच्या नशिबी ही आपत्ती होती असे सांगतात. त्याच्याशी तुलना करता ऐंशी हा आकडा फारच अल्प आहे हे खरे. परंतु देवालयांची विटंवना करणे अथवा ती जमिनदोस्त करणे या संबंधीचा जो पुरावा उपलब्ध आहे त्याची छाननी केली असता त्यातून काही ऐंसपैस अशा आकृतिबंधाचे सुचन होते.

**(एक)** सैनिकी अधिकारी वा राज्यकर्ते हे दोघेही ही देवालये जमिनदोस्त करण्याची कृती सामान्यपणे करीत असत. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास देवालये जमिनदोस्त करण्याच्या कृत्याबद्दल आपल्या आपल्याला आज जे ज्ञान आहे ते केवळ तत्कालीन राज्ये त्यांच्या राज्यकर्त्यांनी हाती घेतलेली कामगिरी या संबंधातच आहे. **(दोन)** ही देवालये जमिनदोस्त करण्याच्या घटना ज्या काळी घडल्या आणि ज्या भौगोलिक ठिकाणी घडल्या त्यावरून एका गोष्टीचे सूचन होते. एखाद्या राज्यकर्त्याच्या साम्राज्याचा ज्या वेळी विस्तार होता असतो, तेव्हा त्याची सीमा, दुसऱ्या एखाद्या राज्यकर्त्याच्या साम्राज्याला जाऊन भिडते. अशा प्रकारे पुढे सरकरणाऱ्या (Typically) सिमारेषांजवळ देवालये जमिनदोस्त करण्याची कृत्यें सामान्यपणे (Typically) घडलेली आहेत असे आढळू येते उदा. राजस्थानमधील अजमेर पराभूत झालेल्या कहामाना (Cahamana) या रजपूत घराण्याची राज्याची राजधानी होती. पण त्याजबरोबर उन्मेखून सांगावयाचे झाल्यास ती सुफी पंथातील चिस्ती सुफी गटाची गंगोत्री देखिल ठरेल असे ठिकाण देवालयांची विटंबना करणे वा ती जमिनदोस्त करणे हा जो आकृतिबंध आहे तो उत्तरेकडून गंगेच्या खोऱ्यापासून तो दक्षिणेकडे झपाट्यांने आगेकूच करताना आढळतो. बाराव्या शतकाच्या अखेरीला आणि तेराव्या शतकाच्या सुरुवातीला मुसलमान तुर्की सैनिकांनी दक्षिणेकडे असलेल्या हिंदू राजवटी समूळ नष्ट करण्याचा प्रयत्न केला होता. (तक्ता व नकाशा २ अ क्रमांक १ते ९) बिहारमधील **ओहांतपुरी, विक्रमशिला, आणि नालंदा** या बुद्धधर्मिय मठांना देखिल या आकृतिबंधत समाविष्ट करण्यात आले होते. सर्वसामान्य (Laity) असे बुद्ध जे होते त्यांच्या पासून हे मठ अलग होऊन ते स्वतंत्र झाले होते. याचा परिणाम असा झाला की त्यांना आपली गुजराण करण्यासाठी स्थानिक राज्यकर्त्यांनी दिलेल्या आश्रयावर अवलंबून राहणे भाग होते. यामुळे हे बौद्ध मठ हे स्थानिक राज्यकर्त्यांच्या प्रतिष्ठेची प्रतिके आहेत असे समजले जाते होते. इ. स. १२३० साली **इलतुतमिश** याने दिल्ली सलतनतीच्या सत्तेचा विस्तार करून, ती माळव्यात नेऊन पोचविली. (तक्ता नकाशा २ अ, क्रमांक १०-११) चौदाव्या शतकाच्या आरंभी **खिलजी** घराण्याच्या सुलतानानी पूर्व राजस्थानाकडून गुजराथकडे जाणारा मार्ग मोकळा करून आगेकूच केली. (क्रमांक १२ ते १४, १६,१७)

**खिलजी** घराण्यातील सुलतानानी इ. स. १२९६ मध्ये दक्षिणेकडच्या हिंदु राजाच्यावर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. या करण्यामागचा हेतू हा जिंकलेला प्रदेश आपल्या

साम्राज्यात सामील करून घेणे हा नव्हता परंतु उत्तरेकडून होणाऱ्या मुसलमान मोंगलाच्या फौजापासून आपल्या साम्राज्याचे संरक्षण करण्यासाठी त्याना द्रव्याची जी जरूरी होती, ती या दक्षिणेकडील हिंदु राज्यांची लूट करून ते मिळवणार होते. या हेतूनेच या स्वाऱ्या करण्यात आल्या होत्या. या स्वाऱ्यांचा काळ इ. स. १२९५ ते चौदाव्या शतकातील पहिली काही दशके हा आहे. पूर्वीच्या **बल्बन** या सुलतानाने सलतनतला आवश्यक असलेल्या द्रव्याची प्राप्ती करून घेण्यासाठी दक्षिण हिंदुस्थानावर स्वाऱ्या कराव्यात असे सांगितले होते. **खिलजी** स्वराज्यातील सुलतान, त्या धोरणानुसारच वागत होते. ही एक प्रकारे इतिहसाची पुनरावृत्ती होती. तीन शतकापूर्वी **महमद गझनीने,** मध्य आशियातील मुसलमानांच्या होणाऱ्या स्वाऱ्यांपासून अफगाणिस्थानचा बचाव करण्याकरिता आणि त्या स्वाऱ्या थांबविण्यासाठी त्या दिशेने आपले साम्राज्य विस्तारीत व्हावे यासाठी प्रयत्न केले होते. हे प्रयत्न यशस्वी करण्यासाठी त्याला जे द्रव्य जरूरी होते ते मिळविण्यासाठी त्याने उत्तर हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या होत्या. **खिलजी** घराणेही मुसलमान मोगलांच्या होणाऱ्या स्वाऱ्यापासून आपले संरक्षण करण्यासाठी त्याना जे द्रव्य जरूरी होते, ते मिळविण्यासाठी दक्षिण हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या होत्या. एवंच दूरवरच्या अंतरावर असलेल्या शत्रूवर आपल्या साम्राज्याचे संरक्षण करण्यासाठी करावयाच्या स्वाऱ्यासाठी जे द्रव्य आवश्यक होते. त्याचा पुरवठा ते ज्या नजिकच्या प्रदेशावर स्वारी करून त्यापासून मिळविणार होते. परंतु इ. स. १३२३ नंतर उत्तरेत एका नव्या राजघराण्याची **तघलक** यांची राजवट दिल्लीच्या तक्तावर आली. दखखनमध्ये आपले पाय घट्टपणे रोवण्याची या राजवटीची इच्छा होती व त्यासाठी ती प्रयत्नशील होती. खिलजीनंतर आलेल्या **महममद-बिन-तघलक** या सुलतानाने दक्षिणेतील पश्चिम आंध्र प्रदेशातील राजघराण्याच्या आश्रयाखाली असलेली देवालय मुळापासून उखडून टाकली. (नकाशा तक्ता २ अ. क्रमांक २०-२२)

काही काळ गेल्यानंतर सुलतान **फिरोझ तघलक** याने **ओरिसा** या प्रांतात याच कृत्याची पुनरावृत्ती केली. (तक्ता नकाशा २ अ क्रमांक २३)

चौदाव्या शतकाच्या अखेरीला **तघलकांच्या** साम्राज्याला आहोटी लागली. गुजराथ आणि दखखन या दोन्ही सुभ्यातून त्या राजवटीने माघार घेतली होती. गुजराथच्या सुभेदाराने, हा सुभा स्वातंत्र्य झाला आहे असे जाहीर करून, आपल्या हुकूमतीच्या सीमा विस्तारीत करण्यास सुरुवात केली होती, याचे प्रतिबिंबदेखील देवालयांची विटंबना करणे वा ती जमिनदोस्त करणे या त्या हुकूमतीने केलेल्या कृत्यातून स्पष्ट होते. गुजराथमधील सुभेदार आणि त्याचे वारस यानी त्या भागातील आपल्या हुकूमतीला स्थैर्य देताना ही कृत्ये केलेली आहेत. (तक्ता क्रमांक २ब क्रमांक २५-२६, ३१-३२, ३४-३५, ३८-३९, ४२) हिंदुस्थानात जन्मलेल्या दक्षिण विभागातील मुसमानांनीही दिल्लीची सलतनची सत्ता झुगारून आपली स्वतंत्र्य राज्य स्थापण्याची मनिषा बाळगली होती. त्यापैकी एक **'बहामनी'**

सलतनत. विजयनगर साम्राज्याने त्यावेळी रायचूर, दुआबा आणि तामिळनाडचा किनारा या ठिकाणी आपली सत्ता आहे असा दावा केला होता. त्याला **बहामनी** सलतनतेने त्या ठिकाणच्या देवालयांची विटंबना करून कर्नाटकातील रायचूर जिल्हयातील **मानवी** या गावातील देवालय इ. स. १४०६ साली आणि तामिळनाड राज्यातील (विद्यमान काळाच्या) चिंगलपेटकांची या ठिकाणचे देवालय इ. स. १४७८ साली बहामनी राज्याचा सुलतान दुसरा **महंमद** याने विजयनगरच्या साम्राज्याला आव्हान दिले होते. (नकाशा २ ब तक्ता २ क्रमांक ३३, ४१) इ. स. १४०० मध्ये काश्मिरमधील **सनिग** जिल्ह्यातील **पारसपूर, बिजबहेरा, त्रिपुरेश्वर** या देवालयांच्या बाबतीत सुलतान सिकंदर याने त्याच आकृतिबंधाची पुनरावृत्ती केली होती. दिल्लीकडे मध्यवर्ती सलतनची सत्ता अस्तंगत होण्याअगोदरच माळव्यात स्थापन झालेल्या स्वतंत्र सलतनीतीने पूर्व राजस्थानमधील रजपुतांच्या ज्या सत्तेने नव्याने उभारी दाखविली होती तिला आव्हान दिले होते. या मोहीमेचा एक भाग म्हणून उदेपूर जिल्ह्यातील **कुथलमिर** या ठिकाणचे देवालय इ. स. १४४२ साली, **किलवाडा** जिल्ह्यातील **मंडलगढ** येथील देवालय इ. स. १४५७ साली, या दोन्ही देवालयांची विटंबना माळव्याचा सुलतान **महंमद खिलजी** यांने केली होती. (नकाशा २ ब क्रमांक ३६, ३७) सोळाव्या शतकाच्या पूर्वाधात दिल्लीच्या तख्तावर आलेल्या अफगाण **लोदी** राजवटीने दिल्लीतील सुलतानांची सत्ता दिल्ली नजिकच्या राजस्थानच्या भागात पुन्हा एकदा नव्याने प्रस्थापित करण्याची **मोही**म हाती घेतली. त्यावेळी पुन्हा एकदा याच आकृतिबंधाचे अनुकरण झालेले आढळते. **इ.** स. १४८९ ते १५१७ या वर्षांच्या दरम्यान **कांग्रा** जिल्ह्यातील (हा भाग विद्यमान काळी हिमाचल प्रदेश मध्ये आहे) **नागरकोट** या ठिकाणचे देवालय या सलतनतचा सुभेदार **खवास खानाने** विटंबित केले होते. **राजस्थानमधील सवाई माधवपूर** जिल्ह्यातील **उद्‌गीर** या ठिकाणचे देवालय आणि मध्यप्रदेशमधील **शिवपुरी** जिल्ह्यातील **नरवार** या ठिकाणचे देवालय सुलतान **सिकंदर लोदी** याने इ. स. १५०७ साली विटंबित केले. (नकाशा २ ब क्रमांक ४३-४५) सोळाव्या शतकाच्या अखेरीला आणि सतराव्या शतकाच्या आरंभाला **बहामनी** सलतनीतून निर्माण झालेल्या **विजापूर** आणि **गोवळकोंडा** येथील हिंदुस्थानात जन्म घेतलेल्या मुसलमानाच्या राजवटीनी याच आकृतिबंधाचे अनुकरण करण्याचे चालूच ठेवले होते. **गोवळकोंडा** सलतनतीने शेजारच्या **ओरिसा** राजवटीला आव्हान दिले होते. हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी आंध्र प्रदेशातील **विशाखापट्टम** जिल्ह्यातील **श्रीकुमारमन** या ठिकाणचे देवालय कुतुबशाही सलतनतीच्या सेनापतीने इ. स. १५९९ मध्ये विटंबित केले होते. **श्रीकाकुलम** जिल्ह्यातील त्याच नावाचे देवालय सेनापती **शेर महंमद खान** याना इ. स. १६४१ साली विटंबित केले. (तक्ता क्रमांक ५५-५९) **आंध्र** प्रदेशातील **नलकोंडा** जिल्ह्यातील **देवारकोंडा** येथील देवालय **सुलतान क्युळी कुतुबशहा** याने इ. स. १५३०-३१ च्या दरम्यान विटंबित करून विजयनगरच्या साम्राज्याला आव्हान दिले होते.



अनुक्रमणिका

विजयनगरचे साम्राज्य मुसलमानानी नष्ट केल्यानंतर जी हिंदु राज्ये विशषेत: आंध्रमधील दक्षिण भागात प्रस्थापित झाली होती त्यानाही आव्हान देण्यात आले होते. याच प्रकारे, कर्नाटकमधील **धारवाड** जिल्ह्यातील **बंकापूर** या ठिकाणचे देवालय, **सुलतान अलि आदिलशहा** याने इ. स. १५७५ ते १५७६ च्या दरम्यान विटंबित केले होते, **आंध्र प्रदेशमधील कुर्जूल** जिल्ह्यातील **अहोविलाम** या ठिकाणचे देवालय सेनापती **मुरहारीराव** याने इ. स. १५७९ साली विटंबित केले. आंध्र प्रदेशमधील कडाप्पा जिल्ह्यातील त्याच नावाचे देवालय **सेनापती मुर्तजाखान** याने इ. स. १५९३ चित्तूर जिल्ह्यातील **कलीहस्ती** या ठिकाणचे देवालय सेनापती **इतरबरखान** याने इ. स. १५९३ साली, नेल्लोर जिल्ह्यातील **उदयगिरी** येथील देवालय सेनापती **गाझी अली खान** याने १६४२ साली, **तामिळनाड-** मधील **चिंगलपुर** जिल्ह्यातील **पुनमल्ले** या ठिकाणचे देवालय **रुसाम-बिल खान** या सेनापतीने इ. स. १६५३, ही सारी देवालये विटंबित करण्यात आली होती. (नकाशा २ ब, २ क क्रमांक ५०-५१, ५३, ५४, ६०, ६१)

हिंदुस्थानात जन्मलेल्या मुसलमानानी दख्खनमध्ये विस्तार केला तो हिंदू राजांच्या हुकूमतीखाली जो प्रदेश होता त्याचा कब्जा घेऊन. उत्तर भारतात परिस्थिती अर्थातच वेगळी होती. इ. स. १५२६ ते १६०५ च्या दरम्यान मोगल बादशहानी हिंदुस्थानात उत्तरेकडे चढाई करून, तेथील प्रदेश पादाक्रांत केला होता. पण तो सारा प्रदेश मुसलमान-अफगाण राजांचा पराभव करून मिळवलेला होता. हे सर्वजण हिंदू नसल्याकारणाने विशिष्ट देवतांच्या मूर्ती असलेल्या देवालयांना राजाश्रय नव्हता. म्हणूनच कोणत्याही देवालयातील मूर्ती या त्या बादशहांच्या सार्वभौमत्वात कधीही सहभागी नव्हत्या. या कारणांमुळे मोगल बादशहानी आपली राजवट स्थिरस्थावर होत असतानाच्या काळात या प्रदेशातील देवालये जमिनदोस्त करणे. मूर्तींची विटंबना करणे त्याबद्दल ठोस पुरावा उपलब्ध का नाही याचे स्पष्टीकरण बहुधा मिळावे. परंतु पूर्वीच्या दिल्ली सलतनतीच्या हुकूमतीखाली असलेल्या प्रदेशाच्या पलीकडे जाऊन, मोगल सैन्याने आगेकूच करून हिंदू राज्यांच्या साम्राज्यात असलेले विभाग, आपल्या राज्यात सामील करून घेण्यास सुरुवात केल्यानंतर देवालये जमिनदोस्त करणे, मूर्तींची विटंबना करणे, हे प्रकार पुन्हा होऊ लागल्याचे आढळते. इ. स. १६६१ साली बंगाल सुभ्याचा मोगल राज्यपाल, **मिरजुमला** याने शेजारच्या आसाममधील **कुचबिहार** भागाच्या राज्यावर स्वारी केली आणि तेथील देवालये जमिनदोस्त केली. (नकाशा २ क क्रमांक ६४) इ. स. १६६२ साली आसाम हा विभाग मोगल साम्राज्यात सामील करून घेण्यासाठी **मिरजुमला** याने ब्रम्हपुत्रा नदीच्या खोऱ्यापर्यंत चढाई करून **आहोम** राज्याच्या आश्रयाखाली असलेली देवालये जमिनदोस्त केली होती. त्या देवालयातील प्रमुख देवालय **गऱ्हगांव** येथे होते. त्या देवालयाच्या जागी मशिद बांधण्यात आली. (नकाशा २ क क्रमांक ६५-६६)

हिंदुस्थानातील मुसलमान बादशहानी, हिंदू राजांच्या हुकुमतीखाली असलेला प्रदेश आपल्या साम्राज्यात सामील करून घेण्याच्या उद्देशाने, जे सैनिकी संघर्ष केले त्यावेळीच ही मूर्ती-देवालये यांची विटंबना करणे, जमिनदोस्त करणे. या सर्व घटना घडल्याचे आढळते. तत्कालीन तवारिखकार आणि विजेत्यानी मागे ठेवलेले शिलालेख यावरून ज्याबद्दल कोणताही संशय राहणार नाही असा एक मुद्दा सिद्ध होतो. हिंदू राजांचा आपल्या हुकुमती-खाली प्रदेशावर जो अधिकार होता, तो वैध समजला जात होता. राजाश्रय असलेल्या देवालयांची विटंबना केली वा जमिनदोस्त केली की हा अधिकार त्यांनी गमविला आहे हे सिद्ध होणार होते. हिंदुस्थानातील मुसलमान राजांचे सेनापती राज्यपाल, अगर सुलतान या सर्वांचाच हा दृष्टीकोन होता. राजाश्रय असलेल्या देवतेचे पूर्वीच्या हिंदू राजाला आणि त्याच्या राज्याला संरक्षण आहे असे समजले जात होते. विशेष करून याच देवालयांची विटंबना केली वा ते जमिनदोस्त केले की त्या राजाचा अधिकार आपोआप नष्ट होत होता. थोडक्यात हिंदू राजांच्या आश्रयाखाली असलेले प्रमुख देवालय नष्ट करणे वा त्याची विटंबना करणे हा त्या राजाचा अधिकार निकालात, काढण्याचा एक मार्ग होता. 'अधिकार निकालात काढणे' हे उद्दिष्ट एरवीही अनेक प्रकारे साध्य करून घेण्यात येत असे. राज्य करण्याचा अधिकार प्राप्त होण्यासाठी जी देवालये आवश्यक होती. नेमकी त्यांचीच विटंबना करण्यात येई वा जमिनदोस्त करण्यात येत. काही वेळा या देवालयांचे रूपांतर मशिदीत करण्यात येई, असे केल्याने पूर्वीच्या ज्या हिंदू राजाचा अधिकार नष्ट झाला आहे, त्याची जागा त्या नव्या मुसलमानी राजवटीने घेतली आहे असे जाहीर होत असे.

देवालयांची विटंबना करण्याचेही अनेक प्रकार होते. त्यापैकी तुर्कांच्या पूर्वी होऊन गेलेले जे मुसलभान बादशहा होते. त्यांनी ज्या प्रकारे देवालयांची विटंबना केली, त्याच प्रकारे त्यांच्यानंतर आलेल्या काळातले सर्व मुसलमान बादशहा, देवालयांची विटंबना करीत असत. हिंदू राजाच्या आश्रय असलेल्या देवालयातील त्या राजघराण्याच्या कुलदैवतेची मूर्ती तिच्या मुळस्थानावरून जबरदस्तीने उचलून त्या राजाबरोबर केलेल्या युद्धात विजय मिळविलेल्या असला, तर त्या विजयाचे प्रतिक म्हणून आपल्या राजधानीत पाठवून देण्यात येत असे. इ. स. १२९९ च्या फेब्रुवारी महिन्यात **उलुघखान** याने गुजराथमधील महाविख्यात सोमनाथ देवालयाला लुटले, त्या देवालयात असलेली सर्वात मोठा मूर्ती दिल्लीतील सुलतान **अला-उद्दिन-खिलजी** याजकडे पाठवून दिली. (नकाशा २ अ क्रमांक १६) इ. स. १३५१ साली सुलतान **फिरोझ तघलक** याने **ओरिसावर** स्वारी केली. तेथे गेल्यानंतर त्याला असे समजले की पुरी या ठिकाणी राजाच्या किल्ल्यातील त्या देवालयातील विभागात अत्यंत महत्त्वाचे समजले जाणारे **जगन्नाथाचे** देवालय आहे. त्याने त्यातील पाषाण-मूर्ती दिल्लीस नेली आणि तेथे अत्यंत अपमानास्पद समजले जाईल अशा ठिकाणी नेऊन ठेवली. (नकाशा २ अ, क्रमांक २३) ग्वाल्हेर मधील रजपूत मांडलिकाच्या निष्ठेविषयी इ. स.

१५१८ संशय निर्माण झाल्यानंतर सुलतान **इब्राहिम लोदी** ग्वाल्हेरच्या प्रख्यात किल्ल्यावर चाल करून गेला. तो किल्ला काबीज केल्यानंतर त्या मांडलिकाचे देवालय म्हणून समजल्या जाण्याच्या **शिवमंदिरातील पितळी-नंदी** त्याने उचलून दिल्लीस आणला, तेथे बगदाद दरवाजा या नावाने ओळखल्या जाणाऱ्या ठिकाणी त्या नंदीला ठेवण्यात आले. (नकाशा २ ब क्रमांक ४६) गोवळकोंडा येथील कुतुबशाही सैन्याचा सेनापती **मुरहरीराव** याच्या नेतृत्वाखाली कृष्णा नदीच्या दक्षिण विभागात मोहीम हाती घेतली गेली होती. या प्रदेशातील अत्यंत लोकप्रिय **अहोविलम** देवालय लुटून देवालयात असलेली माणकांनी मढवलेली मूर्ती गोवळकोंड्यास आणून त्या युद्धाच्या यशस्वी सांगतेचे प्रतिक या स्वरूपात त्या सभापतीने सुलतानास ती नजर केली. (नकाशा २ ब क्रमांक ५१) या देवालयाला स्थानिक महत्त्व होते. ते एक जागृत स्थान समजले जात होते. कुतुबशाहीच्या पूर्वीच्या ज्या हिंदू राजवटी होत्या. त्यांचे या देवालयाबरोबर घनिष्ट संबंध होते. या राजवटीना या देवतेच्या कृपेमुळे सार्वभौमत्व प्राप्त झालेले आहे अशी त्या भागात समजूत होती. विजयनगरचा अत्यंत प्रख्यात आणि प्रबळ राजा **कृष्णदेव** राजा, यानेही त्या देवालयाला भेट दिलेली होती. सेनापती **मुरहरीराव** हे स्वत: महाराष्ट्रीय ब्राम्हण होते. म्हणूनच त्यांना या देवालयाला असलेल्या राजकीय महत्त्वाची चांगलीच जाण होती. या कारणामुळे त्या देवालयाची विटंबना होणे आवश्यक आहे असे त्या ब्राम्हणाने का मानले असेल हे समजण्यासारखे आहे.

येथवरच्या उदधृत केलेल्या प्रत्येक उदाहरणावरून हे स्पष्ट होईल की राजाश्रय असलेल्या देवालयातील मूर्ती युद्धात मिळविल्याच्या विजयाचे प्रतिक म्हणून विजयी सुलतानाच्या राजधानीत नेल्यानंतर त्या मूर्तीच्या दैवी सामर्थ्यात आमूलाग्र परिवर्तन होत असे. इत:पर ती जागृत देवता नव्हती. सुलतानाच्या राजधानीत त्या मूर्तीला आणण्याअगोदर असलेल्या सामाजिक व राजकीय संदर्भात त्या देवतेला जे आध्यात्मिक व राजकीय महत्त्व होते ते सारे या प्रक्रियेत नाहीसे होऊन त्या एकेकाळच्या जागृत देवतेच परिवर्तन एका मृत प्रतिमेत होत असे. तथापि अशा प्रकारे ज्या देवालयांची लूट करून तेथील मूर्तीचे अपहरण करून त्या मूर्तीला नेहमीच विजेत्यांच्या राजधानीत नेण्यात येत नव्हते. उदा. इ. स. १५५६ साली बंगालवर **सुलेमान करानी** यांची सत्ता होती. मोगल बादशहा **अकबर** यांचे त्यामानाने दूरच्या प्रदेशात असलेल्या या सुलतानाबरोबर सख्य नव्हते; अकबराचा तो विरोधकच होता. ओरिसाच्या **गजपती** राजाने **अकबर** बादशहा बरोबर तह केला, पण त्याज बरोबर सुलतान **सुलेमान** यांचा अगदी लगतचा विरोधक **इब्राहीम सुर** यालाही आश्रय दिला. बंगाल प्रांत पादाक्रांत करण्याची व **करानी** घराण्याची राजवट निकालात काढणे जी ही **सुर** यांची महत्त्वाकांक्षा होती ती सफल होण्यासाठी सहाय्यही देऊ केले. आपल्या राजवटीच्या स्थैर्याला निर्माण झालेला हा धोका सुलतान सुलेमान हे खपवून घेणे शक्यच नव्हते. त्यांनी ओरिसावर सैन्य रवाना केले. या सैन्याने तडक **गजपती** राजवटीच्या देवालयावर धडक मारली, त्या

देवालयाची लुट करून, त्या ठिकाणच्या मूर्तीही पळविल्या. या मोहिमेचा उद्देश **ओरिस** हा भूभाग सुलतान सुलेमान यांच्या राजवटीत सामील करून घेणे हा नव्हता. **गजपतीला** शिक्षा व्हावी एवढेच मर्यादीत उद्दिष्ट होते. याच कारणामुळे गजपतींचा राजाश्रय असलेल्या देवालयातील मूर्ती विजयाचे प्रतिक म्हणून बंगालच्या राजधानीत नेण्यात आल्या नाहीत.

देवालयांची लूट करणे, त्यांची विटंबना करणे, त्यातील मूर्तीचे अपहरण करणे, या सर्व गोष्टी अनेक प्रकारे करण्यात येत असत. परंतु ही कृत्ये करीत असताना स्थानिक जनतेला त्याची तोषिश कधीही लागू नये याबाबत काळजी घेण्यात येई. हाती घेतलेली मोहीम ही जो कोणी राजा शत्रू होता त्याबरोबरच होती. या राजाला ज्या देवतेमुळे संरक्षण प्राप्त झाले होते. त्यानेच राज्य करावे यासाठी वरदान मिळाले होते आणि ज्या देवतेकरवी हे सारे आविष्कृत केले जात होते. त्या मूर्तीवरच लूट करताना रोख असे. मोगलानी इ. स. १६६१ साली **कुचबिहार** या विभागात मोहीम हाती घेतली होती. ही मोहीम यशस्वी होऊन यशस्वी होऊन तो भाग मोगल साम्राज्यात सामील करून घेण्यात आला होता. परंतु मोहिमे संबंधात जे तत्कालीन वर्णन उपलब्ध आहे. त्यावरून दोनच महत्त्वाची उद्दिष्टे साध्य करण्याशी या मोहिमेला कर्तव्य होते. **एक** पराभूत राजा **भीष्म नारायण** याच्या राजघराण्याची जी देवता होती तिच्या मूर्ती नष्ट करणे. **दोन** मोगल सैन्याला कोणत्याही प्रकारची लुटालूट करण्यापासून प्रतिबंध करणे, अगर कुचबिहारमधील लोकवस्तीला कोणत्याही प्रकारे इजा पोहोचणार नाही याची खात्री करणे. हे दुसरे उद्दिष्ट साध्य करण्या–बाबत आपणास असे सांगण्यात येत आहे की मोगलाच्या हुकुमतीखाली असलेल्या बंगाल प्रांताचे मुख्य न्यायाधीश **सैय्यद महमद सादिक** यांना असा हुकूम देण्यात आला होता की *जनतेची मालमत्ता आणि पैसा यांना कोणीही हात लावण्यास प्रतिबंध करणारा हुकूम न्यायाधिशानी जाहीर करावा, असे त्यास फर्माविण्यात आले होते. त्यांनी सर्वत्र स्वत: जाऊन सुव्यवस्था प्रस्थापित केली पाहिजे. तसेच राजे* ***भीष्म नारायण*** *यांचा खजिना जप्त करावा, देवतांच्या मूर्तीची मोडतोड करावी, आणि इस्लामचा कायदा जारी करावा, असे त्यास सांगण्यात आले होते.* ***न्यायाधीश सय्यद*** *यांना प्रतिबंध करण्याबाबत इतकी सक्त ताकीद होती की (आणि त्याची जरब इतकी होती की) त्या हुकुमाचे उल्लंघन करण्याची आणि रयतेची तसेच गोरगरीबांची मालमत्ता लुटण्याची हिंमत कोणालाही झाली नाही. या हुकूमाची अवज्ञा करून लुटालूट करणाराचे हात कान, अगर नाक कापण्याची शिक्षा आहे असे या हुकूमात सांगण्यात आले होते. गोरगरीबांची, प्रजाननांच्या मालमत्तेचे या दोन्हींना संरक्षण देण्याच्या कामात न्यायाधीश* ***सय्यद सादीक*** *स्वत: कायम व्यस्त होते.*

पूर्वी हिंदू राजांच्या अंमलाखाली असलेला प्रदेश जो नव्याने सलतनमध्ये सामील करून घेण्यात येत असे. उदा. **कुचबिहार** त्या ठिकाणच्या सर्व सामान्य जनतेचा पाठिंबा या मुसलमान राजवटीस मिळावा या उद्देशाने मोगल अधिकारी योग्य ती कारवाई करीत. कारण

सरतेशेवटी हेच प्रजाजन व जनता सर्व प्रकारची संपत्ती निर्माण करणार होती आणि साम्राज्यांचा सर्व डोलारा त्यावरच अवलंबून होता.

**देवालयांचे संरक्षण आणि त्यांचा योगक्षेम चालावा त्यांची देखभाल करण्यासाठी राज्याकडून मिळणारी मदत.**

आपल्या इस्लामी राजवटीचे जे पूर्वाश्रमीचे शत्रू होते त्यांच्याशी संलग्न असलेल्या देवालयांची मोडतोड करणे, त्यांची विटंबना करणे वा ती जमिनदोस्त करणे या कृत्यांकरवी आपला विजय आविष्कृत होतो, ही कल्पना त्या कृत्यामागे होती, परंतु पूर्वाश्रमींच्या शत्रूंचा प्रदेश आणि त्यातील जनता, हिंदुस्थानातील मुसलमानांच्या राजवटीत सामील करून घेण्यात आल्यानंतर मग काय होत होते? या मुद्याबावत उपलब्ध असलेला पुरावा स्पष्ट आहे. इस्लामी आणि हिंदू राजवटी या दोघांनीही अनेक वर्षांच्या अनुभवानंतर राज्यकरण्या–बाबतच्या धोरणांच्या काही परंपरा शास्त्रपूत केल्या होत्या. त्याला प्रत्यक्ष व्यवहाराची (Pragmatism) जोड देण्यात येत असे. या परंपरानुसार, इस्लामी राज्यात असलेल्या इतर देवालयांना हात लावण्यात येत नसे. याचा पुरावा म्हणून एक संस्कृत शिलालेख उदधृत करता येईल. हा लेख इ. स. १३२६ सालचा आहे. *दखखनचा उत्तर भाग सुलतान तघलक यांच्या साम्राज्याला जोडून घेण्यात आल्यानंतर तब्बल तेरा वर्षांनी बिदर जिल्ह्यातील कल्याणी येथील, शिवालय दुरुस्त करण्यासाठी सुलतान महमद बिन तघलक याने काही मोगल अधिकाऱ्यांची नेमणूक केली होती. हा निर्णय घेऊन व तो प्रत्यक्ष कृतीत उतरवून, तत्कालीन स्थानिक स्वरूपाचे दंगेधोपे होते, या शिवालयातील पूजा-अर्चा यांच्यात जो बिघाड झाला होता. या दोन्हीही अडचणी दूर होऊन तेथील परिस्थिती पूर्ववत झाली होती. या सुलतानाने इस्लामी कायद्याचा जो अन्वयार्थ लावला होता आणि त्यानुसार जे भाष्य केले होते, त्यातून असा निष्कर्ष निघतो की जो कोणी जिझिया कर देतो त्याला इस्लामी अंमलाखालील प्रदेशात देवळे बांधता येतील !*

या अशा प्रकारचा दृष्टीकोन ऐन भरातील इस्लामी राजवटींच्या अखेरच्या चरणापर्यंत प्रचलीत होता. उदा. **मंहमद बिन तघलक** यांच्या मृत्यूनंतर अनेक दशके लोटली. त्यानंतर हा वृत्तांत आहे. काश्मिर मध्ये सुलतान **शिआब-अलदिन** यांची राजवट होती. (इ. स. १३५५ ते १३७३) यांनी आपल्या ब्राम्हण मंत्र्याची कानउघडणी केली होती. ही कारवाई या सुलतानाने करण्याचे कारण, या सुलतानांच्या राज्यातील प्रदेशात असलेल्या हिंदू देवतांच्या आणि बौद्ध धर्मिय मूर्ती वितळवून त्यायोगे नगद रोख द्रव्य प्राप्त करून घ्यावे असे या ब्राम्हण मंत्र्याने सुचविले होते. धर्माला राजाश्रय मिळावा या विषयींच्या आपल्या कल्पनांचे विवरण करताना व स्पष्टीकरण देताना या सुलतानाने हिंदू पुराणातील अभिजात ग्रंथात नमूद केलेल्या मान्यवर व्यक्तींचा संदर्भ दिला होता. या सुलतानाने असे सांगितले की, *"काहींनी मूर्तींची प्रतिष्ठापना करून, काहीनी त्यांची पूजा-अर्चा करून, आणखी अनेकांनी त्यांची*

*देखभाल करून किर्ती प्राप्त करून घेतली. याउलट काहींनी या मूर्ती भग्न करून ती मिळवलेली आहे. समुद्र आणि नद्या यांची निर्मिती करून सागराने किर्ती मिळविली... गंगेचे या भूतलावर अवतरण करून, भगिरथाने अशीच किर्ती मिळविली. सीतेचे ज्या रावणाने अपहरण केले होते, त्याला ठार मारून प्रभु रामचंद्राने अलौकिक किर्ती मिळविली. बादशहा शहावादीना (शिआब-अल-दिन यांनी परधर्मिय देवतांच्या मूर्ती लुटल्या, ही कृती यमाइतकीच (मृत्यु) भयावह आहे. भविष्यकाळात या कृतीच्या स्मरणाने लोक भयभीत होऊन कापू लागतील.*

यानंतर सुमारे एक शतकानंतर आलेल्या **सिकंदर लोदीला** (इ. स. १४८९ ते १५१७) त्याच्या मुसलमान न्यायाधिशानी असा सल्ला दिला होता की,"मूर्ती असलेल्या प्राचीन देवालयांची नासधूस करणे, त्यांची मोडतोड करणे हे (इस्लामी) कायद्याला धरून नाही. तसेच प्राचीन काळापासून परंपरेने चालत आलेल्या 'स्नान-संध्या','पुजेच्या उपकरणाची साफसफाई' यासारख्या कृती सार्वजनिक तळ्याकाठी करण्यापासून (प्रजेला) प्रतिबंध करता कामा नये.

एखादा प्रदेश पादाक्रांत केल्यानंतरच्या काळात आपल्या अंमलाखाली देवालयांना देण्यात येणारे संरक्षण आणि वेळप्रसंगी त्याना देण्यात येणारा (इस्लामी राजवटींचा) राजाश्रय याबावतचा जो आकृतिबंध आहे, तो इस्लामी राज्यकर्त्यांच्या वागणूकीतून स्पष्ट होतो. विशेषत: मोगल बादशहांच्या काळात उदा. युद्धात कैद केलेल्या प्रजाननानी **गझनीची सुलतान मंहमद** याने जी वागणूक दिली होती, त्याबद्दल मोगल बादशहांचे जे सरकारी भाष्य आहे. त्यातील दृष्टीकोनातून ते चांगलेच स्पष्ट होते. उदा. **गझनीचा सुलतान मंहमद** ही भारतीय इतिहासात अत्यंत वादग्रस्त ठरलेली व्यक्ती आहे. हिंदुस्थानात राहणाऱ्या मुसलमानांची उत्तर हिंदुस्थानात राजवट प्रस्थापित होण्याअगोदरच्या काळात म्हणजे अकराव्या शतकाच्या आरंभाला सुलतान **मंहमद गझनाने** हिंदुस्थानवर अनेक स्वाऱ्या केल्या. या सर्व स्वाऱ्यात या प्रदेशात लुटालूट करणे, देवालयांची विटंबना करणे, ती जमिनदोस्त करणे, कारागिरांना गुलाम करून गझनीला घेऊन जाणे, या कृती करून या प्रदेशाचे त्याने अपरमित नुकसान केले होते. सुलतान **मंहमद गझनीचा** समकालीन व त्याच्या दरबारातील **कवी फिरदोसी** (मृत्यू इ. स. १०२०) याच्या लिखाणामुळे **सुलतान मंहमद गझनी** यांच्या कारकीर्द ही इतिहासातील 'पारंपारिक आख्यायिका' – (Legend) ठरली आहे. या कवीनंतर आलेल्या अनेक पिढ्यातील पर्शियन भाषिक कवीनी मंहमद हा इस्लाम धर्मिय राजांच्या अंगी जे सद्‌गुण असावयास पाहिजेत, त्याबाबतीत तो महान आदर्श होता, असे सांगून त्याची स्तुती करून, त्याचा महागौरव केला आहे. हिंदू देवालयांवर सुलतान **मंहमद गझनीने** केलेल्या कुप्रसिद्ध हल्ल्यांचा गौरव करून, त्या आदर्शानुसार सुलतान **मंहमद गझनींच्या** नंतर येणाऱ्या धार्मिक मुसलमान सुलतनतीनी त्या

आदर्शानुसार वर्तन करावे, असे आवाहनही करण्यात आलेले होते. **सुलतान मंहमद गझनीने** कोणत्याही स्वरूपाचा घरबंध न मानता उत्तर हिंदुस्थानातील हिंदू देवालयांची लूट केली असली तरी, त्या प्रदेशातील कोणत्याही एका भागावर राज्य करण्याची प्रत्यक्ष जबाबदारी स्विकारली नाही. **अबुक-फझल** हे मोगल बादशहा **अकबर** यांचे पंतप्रधान, मोगल साम्राज्याने कोणत्या तत्त्वप्रणालीनुसार राज्यकारभार करावा हे त्यानीच ठरविले. **सुलतान मंहमद गझनी** आणि **पंतप्रधान अबुल फझल** यांच्या दोघांच्या दृष्टीकोनातील फरक नेमका याच ठिकाणी अधोरेखित होतो. एका फार मोठ्या बहु-एथनिक प्रजाजनांच्या प्रदेशावर अंमल गाजविताना त्या ठिकाणी राज्यकारभार करताना काही नेमस्त (Sober) मूल्यांच्या अवलंब करून कारभार करावयाचा असतो वा करावा लागतो या विचाराचे प्रतिबिंब अबुल फझल यांच्या तत्त्वप्रणालीत पडलेले आहे. **अबुल फझल हे सुलतान मंहमद गझनीला दोषी न धरता, त्यांचे विपर्यस्त वागणे हे त्यांच्या आतंकवादी व अंधश्रद्धा बाळगणाऱ्या सल्लागारानी त्यांना दिलेल्या सल्ल्याची** ती प्रत्यक्ष कार्यवाही आहे असे ते सांगतात. या आतंकवादी आणि अंधश्रद्धा बाळगणाऱ्या सल्लागारानी सुलतान मंहमद गझनीची अशी समजूत करून दिली की इस्लाम बरोबर युद्धात असलेला 'अश्रद्धांचा प्रदेश' असा हिंदुस्थान हा देश आहे. **सुलतान मंहमद गझनी**सारख्या भोळ्या प्रकृतीच्या सुलतानाला या मार्गदर्शनामुळे प्रोत्साहन मिळाले व त्याचे पर्यवसान 'गुणीजनांची लुटालूट, रक्तपात आणि प्रतिष्ठेला सुरूंग लावणे' असल्या कृत्यात झाले होते.

**अकबर** बादशहा (इ. स. १५५६ ते १६०६) नंतर आलेल्या **मोगल** राज्यकर्त्यांनी आपल्या साम्राज्याच्या हद्दीत असलेली हिंदू देवालये ही राज्याच्या मालकीची आहेत अशाच प्रकारे त्याकडे पाहिले होते. या धोरणानुसार त्यांनी त्या देवालयांच्या इमारतींची दुरुस्ती केली आणि त्या देवालयाच्या पुजाऱ्यांना संरक्षणही दिले होते. त्याजबरोबर हिंदूच्या धार्मिक संस्था (Religious institutions) आपल्या साम्राज्याला उपयोगी ठरतील अशा प्रकारे त्यांनी त्या संस्था आपल्याशा केल्या होत्या. या सर्व प्रक्रियेत राजकीय सत्तेवाबतची राजकीय आणि धार्मिक सूत्रे (Codes) अतिशय गुंतागुंतीची सरमिसळ (Overlapp) होऊन अंर्तभूत आहेत. अशा प्रकारे भारतातील बिगर मुसलमानी धर्मात मोगल बादशहा हे अगदी सखोलपणे गुरफटले गेले होते. कालांतराने आलेल्या ब्रिटिश राज्यकर्त्यांचे धोरण व मोगल बादशहाचे धोरण, या दोन धोरणातील फरक नाट्यपूर्ण आहे. याचे कारण ब्रिटिश राज्यकर्त्यांनी भारतातील कोणत्याही धर्मात, कसल्याही प्रकारचा हस्तक्षेप करावयाचा नाही याच धोरणाचा नेहमीच पुरस्कार केला होता. एवंच मोगल सैन्यातील उच्चपदस्थ रजपूत अधिकाऱ्यांची त्यांची ज्या ठिकाणी नेमणूक करण्यात आलेली असे, त्या ठिकाणी तेथील जनतेला आपले स्मरण नेहमीच व्हावे, अशा प्रकारची आपली स्वत:ची देवालये बांधण्याची परवानगी देताना **अकबर** बादशहा आढळतो. **अकबर** बादशहाच्या लगतच्या मोगल राज्यकर्त्यांनी



अनुक्रमणिका

आणखीनच पुढचे पाऊल उचलले होते. उदा. इ. स. १५९० ते १७३५ च्या दरम्यान **ओरिसा** राज्याच्या स्थानिक हिंदू धर्मिय पंथाच्या देवालयांचे पुरी येथील **जगन्नाथाचे** देवालय त्यांचे पुर्नवसन करणे, त्या देवालयांच्या योगक्षेमावर व इतर गोष्टींवर लक्ष ठेवणे आणि वेळ प्रसंगी त्याच्या पुर्नवसनाच्या कामी पुढाकार घेणे, ही कामे तत्कालीन मोगल राज्यकर्त्यांनी केलेली आहेत. या जगन्नाथ पंथियांचा जो वार्षिक उत्सव व मेळावा होता, त्या प्रित्यर्थ निघालेल्या मिरवणूकीबरोबर, मोगल अधिकारी छत्रधारी रथात बसून जात होते. अशा प्रकारे एक धार्मिक कर्मकांड (Ritual) या स्वरूपात शहाजहान बादशहाचे अधिकारी असे प्रदर्शित करीत होते की मोगल बादशहा हा सरतेशेवटी त्या प्रजेचा स्वामी व संरक्षक होता. या मागचा कार्य कारणभाव असा आहे की शहाजहान बादशहा हा साम्राज्यातील कोणत्याही स्थानिक अधिकाऱ्याची मनसबदाराची नेमणूक करतो. त्याच्याकरवी प्रमुख देवालये – आणि अर्थातच त्यात प्रतिष्ठापना झालेल्या हिंदू देवता – यांचे आम्ही मोगल बादशहा स्वामी व संरक्षक आहोत असे प्रस्थापित करतो, एवंच धार्मिक आणि राजकीय संकटातून निर्माण झालेली सत्तेची उतरंड तत्कालीन मुसलमान सम्राटांच्या कृतीतून स्पष्ट होत होती. मोगल बादशहाची सत्ता स्थानिक प्रतिनिधी– मनसबदाराकडे जाते, आणि या मनसबदारांकडून ती जगन्नाथ या देवाकडे आणि त्याची प्रतिष्ठापना झालेल्या देवालयाकडे येते. जगन्नाथ या देवापासून, ती या देवाला राजाश्रय देणाऱ्या स्थानिक मोगल राजाकडे (मनसबदाराकडे) पोचती होते, आणि या मोगल राजाकरवी, त्याच्या स्थानिक प्रजाजनांकडे जाऊन पोहोचत असे. मोगल सम्राटांच्या एकंदर धोरणांचा विचार करता, त्यांच्या सार्वभौम साम्राज्यातील एखाद्या प्रदेशात जी काही राजवट पूर्वी प्रस्थापित झालेली होती, तिचा पूर्ण उच्छेद करणे, हे त्यांचे उद्दिष्ट कधीही नव्हते; तसा त्या उद्दिष्टांचा अर्थही नव्हता. परंतु मोगल सम्राटांच्या मयूर सिंहासनापासून तळागाळातील सामान्य माणसाकडे ही सत्ता ज्या उतरंडीकरवी वहात होती, त्या सत्तेच्या उतरंडीला आपलेसे करावे हे तत्कालीन मोगल सम्राटांचे उद्दिष्ट होते.

या अशा प्रकारच्या कल्पना व विचार मोगल बादशहा औरंगजेब (इ. स. १६५८ ते १७०७) यांच्या कारकीर्दीतही प्रचलीत होते. या बादशहाने बनारस येथील आपल्या स्थानिक अधिकाऱ्यांना इ. स. १६५९ साली जो हुकूम दिला होता. त्यावरून हे स्पष्ट होते. या हुकूमावरून असे दिसून येते की, बनारस येथील देवालये, आणि त्यांचे ब्राम्हण पुजारी हे ज्या देवालयात रोजंदारी करीत होते. त्यांना त्यांचा तो अधिकार आहे, म्हणून राज्याने त्यांना संरक्षण देणे वाजवी ठरेल असे औरंगजेबाने जाहिर केले होते. बादशहा आपल्या हुकूमात सांगत आहेत.

*"गेल्या काही दिवसात दरबाराकडे अशी माहिती येऊन पोहोचली आहे की केवळ दुष्टावा आणि द्वेष यामुळे बनारस आणि त्या शहराच्या जवळपासच्या प्रदेशातील रहिवाशांना काही लोक धाकदपटशा दाखवून सतावित आहेत. पुरातन हिंदू देवालयांची देखभाल*

*करणाऱ्या, तेथे पूजा-अर्चा करणाऱ्या, त्या देवालयांचा एकंदर कारभार चालविणाऱ्या ब्राम्हण समूहांचा, या धमक्यात अंर्तभाव आहे. या देवालयांचा कारभार पहाण्याचे काम या ब्राम्हणापासून काढून घेण्याची या लोकांची इच्छा आहे. परंतु या त्यांच्या कृतीमुळे फारच दु:ख निर्माण झाले आहे. म्हणूनच हा हुकूम हाती येता क्षणीच त्या विभागातील ब्राम्हणांना व तेथील रहिवाशांना, कायद्याला सोडून कसलेही वर्तन करून त्रास दिला जाणार नाही यासंबंधी दक्षता घेतली पाहिजे असे झाले म्हणजे ते ब्राम्हण परंपरेने त्यांच्याकडे आलेल्या स्थानावर राहतील आणि मोगल साम्राज्य अव्याहत कायम रहावे यासाठी प्रार्थना करतील."*

हा जो हुकूम जारी करण्यात आला होता. त्याचे समर्थन करताना, औरंगजेब बादशहाने असे नोंदविले होते की,"महापवित्र-शरीअत-हा कायदा आणि अत्यंत उच्च स्थानावर असलेल्या महासत्ताधारी जीवन-तत्त्वज्ञानातील तत्त्वानुसार असे प्रस्थापित करण्यात आले आहे की पुरातन (हिंदू) देवालये जमिनदोस्त करता कामा नयेत. या मुद्याबाबत हिंदूस्थानला मुसलमान राजवटीनी मंजूर केलेल्या सिद्धांताना व त्यांच्या कारवाईला बादशहा औरंगजेब यांनी सहमती दर्शविली होती. परंतु हे करीत असताना, त्यानी आणखी असेही सांगितले होते की **'नवे देवालय बांधले जाता कामा नये'.** हा जो दृष्टीकोन आहे, तो अकबर बादशहाच्या धोरणाला निर्णायकपणे विरोधी होता. **अकबराने** मोगल साम्राज्याच्या कक्षेत येणाऱ्या प्रदेशात आपल्या रजपूत सरदाराना आपली स्वत:ची अशी देवालय संकुले उभारण्याची परवानगी दिली होती. **औरंगजेब** बादशहाचा हा हुकूम बनारस आणि त्या शहाराचा परिसर यांनाच फक्त लागू असावा असे दिसते. याचे कारण औरंगजेब बादशहाच्या कारकिर्दीत हिंदुस्थानात सर्वत्रच नवी देवालये बांधण्यात येत होती, राहून राहून आश्चर्य असे वाटते की बादशहाला याबाबतीत एखाद्या भयग्रस्त भावनेने (anxiety) हा अशा प्रकारचा हुकूम काढण्यास प्रोत्साहीत केले होते का?

**देवालयांची विटंबना करणे, त्यांची मोडतोड करणे ही कृत्ये आणि (मुसलमान) राज्यांनी त्यांची करावयाची देखभाल.**

एखाद्या देवालयाला राजाश्रय देणारा हिंदू राजा आणि त्याच्या आश्रयाखाली असलेले देवालय यांच्यातील संबंध हे फारच- जागृत व भारयुक्त (Charged) असत याबद्दल हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्त्यांना चांगलीच जाण होती, असे निश्चितपणे दिसते. एकीकडे हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्त्यांच्या अभिजन वर्गात गतकाळातील हिंदू राजे अगर त्यांचे वंशच फारच तब्बेतीत सुखावलेले होते. पण असे असले तरी या अशा देवालयाशी त्या गतकाळातील हिंदू राजांच्या असलेल्या धार्मिक व राजकीय संबंधाबद्दल हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्त्यांच्या मनात संशय निर्माण होण्याची शक्यता होती. या कारणांमुळे अशा देवालयांच्यापाशी असलेल्या सुप्त धार्मिक व अनुषंगाने राजकीय महत्त्वाला, कधीतरी, कोणीतरी जागृत करील आणि अशा प्रकारे त्या आश्रयदात्याच्या



अनुक्रमणिका

राजकीय आकांक्षाना सत्ता-स्थान प्राप्त होईल या प्रकारचा संशय वेळ प्रसंगी निर्माण होत असे. हे एकदा लक्षात घेतले म्हणजे मग काही घटनांचे स्पष्टीकरण मिळण्याची शक्यता आहे. उदा. हिंदुस्थानातील मुसलमान राज्याच्या एखाद्या कनिष्ठ बिगर मुसलमान (हिंदू) अधिकाऱ्याने, आपली त्या मुसलमान राजवटीला असलेली निष्ठा विचलीत झाली आहे अशी लक्षणे प्रकट केली– आणि खास करून त्या अधिकाऱ्याने बंड पुकारले तर? या प्राप्त परिस्थितीत, ती भारतातील मुसलमानी राजवट अनेक वेळा या बंडखोर अधिकाऱ्या– बरोबर अगदी स्पष्टपणे जुडलेली जी देवालये (अगर देवालय) होती ती वारंवार विटंबित केली जात होती. सरते शेवटी या हिंदुस्थानातील मुसलमानी राजवटीच्या अंमलाखालील प्रदेशात जी हिंदू देवालये समाविष्ट होती ती त्या मुसलमानी– राज्याच्या मालकीची होती म्हणूनच एखाद्या हिंदू देवालयाचा जो हिंदू अधिकारी आश्रयदाता आहे, त्याने त्या मुसलमानी राज्याशी असलेली आपली निष्ठा विचलीत झाली आहे असे प्रदर्शित केले तर मग? अगदी काटेकोरपणे, तत्कालीन प्रचलीत कायद्याच्या दृष्टीकोनानुसार, ती देवालये ही त्या बंडखोर अधिकाऱ्याच्या अधिकाराची विस्तारीत असा भाग होता. म्हणूनच ती देवालये शिक्षेला प्राप्त आहेत असे (त्या इस्लामी विचारानुसार) ठरते.

याच प्रकारचे आणखी एक उदाहरण. आंध्र प्रदेशाच्या किनाऱ्यावर असलेल्या **बहामनी** सुलतानाच्या सैन्याने बंड केले. तेथील किल्ल्यावरच्या सुभेदाराला ठार मारून तो किल्ला बंडखोरानी **भिमराज ओरीया** या ब्राम्हणाच्या हवाली केला. त्यावेळी हा ब्राम्हण सुलतानाचा नोकर वा आश्रित होता. ही बातमी कानी आल्यानंतर सुलतानाने सैन्य घेऊन त्या किल्ल्यावर हल्ला चढविला. **सहा महिने** हे सैन्य किल्ल्याला वेढा देऊन होते. सरते– शेवटी त्यांना किल्ल्याची तटबंदी फोडून किल्ला ताब्यात घेण्यात यश आले. या किल्ल्यावर असलेले देवालय जमिनदोस्त करून, त्याच जागेवर मशिद उभारण्यात आली. (क्रमांक ४७) अशाच प्रकारचा आणखी एक प्रसंग. विजापूर येथील आदिलशाही सुलतानाचा एक नामवंत, पराक्रमी व निष्ठावान अशा महत्त्वाच्या अधिकाऱ्याच्या मुलाने, **शिवाजी** (महाराजानी) कोकणच्या किनाऱ्यावरील एका सरकारी बंदराचा ताबा घेतल्यामुळे आदिलशाहीच्या राजधानाकडे, येणारा व राजधानीतून परदेशी जाणाऱ्या मालाच्या वाहतुकीत अडथळा येऊन ती विस्कळीत झाली. **शिवाजी** (महाराजांचे) हे कृत्य विश्वासघातकी आहे असे मानून सुलतानाने एक उच्चपदस्थ सेनाधिकारी **अफझलखान** याची या मराठा बंडखोराला शिक्षा देण्यासाठी रवानगी केली. **शिवाजी** (महाराजाना) प्रत्यक्ष भिडण्या– अगोदर आपल्या सैन्यासह आगेकूच करीत असताना या सेनापतीने प्रथम आपला मोर्चा तुळजापूरकडे वळविला. या ठिकाणी भवानी मातेचे जे मंदिर होते, त्याची मोडतोड केली आणि ते विटंबित केले. त्याने हे करण्याचे कारण **शिवाजी** (महाराज) आणि त्यांचे कुटुंबिय भवानी मातेचे भक्त होते (नकाशा २ क क्रमांक ६३)



अनुक्रमणिका

मोगल साम्राज्याच्या कालखंडात हाच आकृतिबंध आढळतो. इ.स. १६१३ साली बादशहा **जहांगिर** याचा मुक्काम अजमेर नजिकच्या तीर्थस्थानी **पुष्कर** येथे होता. त्या ठिकाणी बादशहाचा कट्टर शत्रू मेवाडचा राणा अमर यांच्या काकांच्या मालकीचे देवालय होते. या ठिकाणी असलेली 'वराह' या देवतेची मूर्ती विटंबित करण्यात यावी असा हुकूम बादशहा **जहांगिर** याने दिला होता. (नकाशा २ क क्रमांक ५६) या बादशहानंतर गादीवर आलेले त्यांचे चिरंजीव शहाजहान यानी **राजा महाराज सिंग** यांच्या पिताजींच्या आश्रयाखाली असलेले **ओरच्छा** येथील देवालय जमिनदोस्त केले. **राजा महाराज सिंग हे** मोगल सैन्यात उच्च स्थानावर असलेले अधिकारी होते. परंतु त्यावेळी बादशहाविरुद्ध त्यांनी उघडपणे बंडाचे निशाण उभारले असल्याकारणाने **शहाजहानाने** ही कृती केली असावी (क्रमांक ५८) इ. स. १६६९ साली **बनारस** येथील जमिनदारानी बंड केले. यापैकी काहींनी **औरंगजेब** बादशहाला खतरनाक ठरलेल्या शत्रूला **शिवाजी** महाराजाना कैदेतून सुटण्या-बाबत मदत केली होती असा त्यांच्याबद्दल संशय होता. तसेच त्यावेळी असाही समज होता की अकबराच्या दरबारात व सैन्यात फारच मानाचे स्थान असलेल्या राजा मानसिंग यांचे पणतू **मिर्झा राजे जयसिंग** यांनी **शिवाजी** महाराजांची कैदेतून मुक्तता करण्याबाबत सूत्रे प्रथम हालविली होती. या **मिर्झा राजे जयसिंग** यांनी **महा-विश्वनाथ** देवालयाची उभारणी निश्चितपणे केली होती. हे देवालय जमिनदोस्त करण्याचा जो हुकूम **औरंगजेबाने** इ. स. १६६९ च्या सप्टेंबर महिन्यात दिला. त्याची ही पार्श्वभूमी आहे. याच सुमारास **मथुरेच्या** आसपासच्या प्रदेशातील जाटानी फारच उग्र बंड उभारले. मुसलमानांना त्या शहरात नमाज पढण्यासाठी म्हणून जी मशिद होती, तिच्या आश्रयदात्याला त्या जटानी ठार मारले. या कारणाने त्या बंडाच्या म्होरक्याला अटक झाल्यानंतर त्या शहरातील **'केशव देवाचे'** देवालय जमिनदोस्त करण्याचा हुकूम देण्यात आला, आणि त्याच ठिकाणी इस्लामी धार्मिक इमारत – इदगाही (id-gahi) ची उभारणी करण्यात आली. (क्रमांक ७०) यानंतर नऊ वर्षांनी, राजस्थानातील मोगल सम्राटांच्या राजवटीला ज्यांनी विरोध केला व शत्रुत्व प्रकट केले त्यांच्याशी संबंधित होती अशी कित्येक देवालये जमिनदोस्त करण्याचा हुकूम औरंगजेब बादशहाने दिला होता. या देवालयात **खानदेला** या ठिकाणच्या बंडखोर नेत्यांच्या आश्रयाखाली असलेली देवालये, तसेच **दाराशिको** या बादशहाच्या भावाच्या व त्याच्या पहिल्या क्रमांकाचा शत्रूच्या इतिहासकाळातील पाठीराख्यांच्या आश्रयाखाली असलेली **जोधपूर** येथील देवालये, **राणा राज सिंग** यांनी मोगल राज्याला असलेला आपला पाठिंबा काढून घेतल्यानंतर या रजपूत प्रमुखाच्या आश्रयाखाली असलेली उदयपूर व चितोड येथील सर्व देवालये ही सारी देवालये ह्या जमिनदोस्त करण्यात आलेल्या देवालयात समाविष्ट आहेत. (क्रमांक ७१ ते ७४)

**बनारस** येथील **विश्वनाथाचे** देवालय आणि **मथुरेतील केशवदेव** देवालय ही दोन्ही

देवालये जमिनदोस्त करण्यापूर्वी इ. स. १६६९ च्या एप्रिल महिन्यात, हिंदू देवालयांचे स्थान काय असावे या संबंधात काढलेल्या **माथिर-इ-आलमगिरी** या औरंगजेबाच्या हुकुमातील एका परिच्छेदाबद्दल फारच गैरसमज निर्माण झालेला आहे. **औरंगजेबाने,** केवळ **मथुरेतील केशवदेवाचे** देवालय आणि **बनारस** येथील, **विश्वनाथ** ही दोनच देवालये नष्ट करावी असे न सांगता मोगल साम्राज्यांतील सर्व देवालये नष्ट करण्याचा तो हुकूम होता. असा त्या परिच्छेदाचा अर्थ लावण्यात येतो. तो परिच्छेद खाली दिल्याप्रमाणे आहे. "इस्लामी कारभारा-संबंधी (affairs) आदर दर्शविणारे हुकूम सर्व प्रांताच्या सुभेदारांना रवाना झाले होते. या हुकूमानुसार इस्लाम या धर्माला सोडून बाकीच्या सर्व पाठशाला आणि पूजा स्थाने, ही जमिनदोस्त करण्यास पात्र (subject) आहेत. या प्रकारच्या अश्रद्धांच्या पंथियांची (irreligious) सर्व सार्वजनिक स्थाने दडपून टाकली पाहिजेत." या हुकूमात पाठशाळा आणि पूजास्थाने जमिनदोस्त करावीत असे सांगितलेले नाही. याउलट या पाठशाळा आणि पूजास्थाने जमिनदोस्त करण्यास पात्र आहेत असे सांगितले आहे. त्यात गर्भित अर्थ असा आहे की, कोणतीही कारवाई करण्यापूर्वी स्थानिक अधिकाऱ्यांनी याबाबत चौकशी केली पाहिजे.

या गेल्या परिच्छेदा अगोदरच्या जो छेदक आहे त्यातील वाक्ये ही अधिक महत्त्वाची आहेत. याचे कारण औरंगजेबाच्या हुकूमाचे एकंदर उद्दिष्ट काय होते या विषयाचा संदर्भ त्या वाक्याकरवी मिळतो. दिनांक ८ एप्रिल इ. स. १६६९ रोजी **औरंगजेबाच्या** दरबारात अशी बातमी येऊन पोचली की **मुलतानमधील थट्टा** (THATTA) या ठिकाणी आणि शिवाय खास करून **बनारस** येथे ब्राम्हणांनी 'पाठशाळा' प्रस्थापित केल्या आहेत. या पाठशाळा पाखंड पुस्तके (false books) शिकविण्याच्या उद्योगात व्यस्त आहेत. तसेच या पुस्तकांचे हिंदू व मुसलमान चहाते, अनेक योजने पायाखाली घालून, विपतकाल सूचक, अशुभ विज्ञानाचा अभ्यास करण्यासाठी या बंडखोर ब्राम्हणांनी (deviant) दिलेले शिक्षण घेण्यासाठी जातात. **अर्थात ही पाखंड पुस्तके, अगर त्या पाठशाळातून कोणत्या प्रकारच्या शिक्षणाचा अंर्तभाव होता हे आपणास या घडीलाही माहीत नाही. तसेच हिंदू** आणि **मुसलमानही** अनेक योजने पार करून त्या पाठशाळात का जात होते, त्याना त्या पाठशाळाबद्दल कोणत्या प्रकारचे आकर्षण होते, हेही आपणास सांगता येणार नाही. हे दोन्ही प्रश्न चांगलेच बुचकळ्यात टाकणारे आहेत हे खरे आहे. परंतु त्याबद्दल काहीही अटकळ बांधता येत नाही. या वाक्यामुळे व त्यानंतर औरंगजेबाने काढलेल्या हुकूमावरून ही गोष्ट स्पष्ट होते की मोगल साम्राज्यात अंर्तभूत असलेल्या प्रदेशात एका विशिष्ट प्रकारच्या (mode) अगर पद्धतीच्या (manner) शिक्षणाचा प्रभाव रोखण्यासाठी या हुकूमाला खास करून कर्तव्य होते. एवंच **औरंगजेब** बादशहाच्या साम्राज्यात अंर्तभूत असलेल्या प्रदेशातील सर्व देवालये जमिनदोस्त करावीत या उद्देशाने हा सर्वसाधारण हुकूम काढलेला नसून,

बादशहाकडे येऊन पोहचलेल्या काही विशिष्ट शैक्षणिक प्रकृतीच्या अहवालाला बादशहाने दिलेला तो प्रतिसाद होता. तसेच बादशहाला मंजूर नसलेले एका विशिष्ट प्रकारचे शिक्षण ज्या ठिकाणी देण्यात येत होते, त्याची चौकशी व तपासणी व्हावी हे त्या हुकूमाचे उद्दिष्ट होते.

हिंदू-देवालये या विषयाचा **औरंगजेब** बादशहाच्या धोरणाचा सारांश काढल्यास तो येणेप्रमाणे असेल. **बनारस** शहराच्या परिसरात नवीन देवालये बांधण्यास बंदी होती. परंतु साम्राज्यात समाविष्ट असणाऱ्या देवालयांचा आदर करण्याबाबत, त्यांच्या अगोदर जे मोगल बादशहा होऊन गेले, त्यांचे जे धोरण होते तेच **औरंगजेबाने** चालू ठेवले होते. साम्राज्यात समाविष्ट असलेली हिंदू देवालये ही राज्याच्या मालकीची होती. बादशहाच्या पदरी असलेले जे कोणी हिंदू अधिकारी विश्वासघात करीत, अथवा त्यांची साम्राज्यावर असलेली निष्ठा विचलित झाली आहे असे दिसून येई. त्यांच्या आश्रयाखाली असलेल्या देवालयांची विटंबना करण्याचे धोरण **औरंगजेब** आणि भारतातील इतर बिगर मोगल मुसलमान राज्यकर्त्यांचे होते. या ठिकाणी असा प्रश्न उपस्थित होईल की मोगल सम्राटांचे जे कोणी मुसलमान अधिकारी अशाच प्रकारची बंडखोरीची प्रवृत्ती प्रकट करीत, त्यांना कोणत्या प्रकारचे शासन होत असे? अशी प्रवृत्ती प्रकट करणारा मुसलमान हा त्या भारतातील मुसलमान राजवटीच्या नोकरशाहीत वा सैन्यात जी उतरंड होती, त्यातील ज्या पायरीवर असे, तेथून त्याला खालच्या पायरीवर लकटण्यात येत असे. परंतु जो कोणी मुसलमान अधिकारी उघडपणे बंड करून उठे त्याला वेगळी शिक्षा देण्यात येत असे. सामान्यपणे बंड, विश्वासघात अशा स्वरूपाच्या गंभीर गुन्हांना देहांताची शिक्षा देण्यात येई. या अशा गुन्हांनी हिंदू आणि मुसलमान अधिकाऱ्यांना एकाच प्रकारची (देहांताची) देण्यात येत असे. याठिकाणी हिंदुस्थानातील मुसलमानी राजवटीतील त्या अधिकाऱ्याचा धर्म कोणता हे विचारात घेण्यात येत नसे. उदा. **तघलक** घराण्याच्या नोकरीत असलेला फारच उच्च स्थानावरचा **बदा-अल-दिन-गुरशाय** याने इ. स. १३२७ साली **कामपिला** येथील राजाबरोबर एकजूट करून तघलक घराण्याविरुद्ध बंड केले. सुलतान **मंहमद बिन-तघलक** यांच्याविरुद्ध केलेले हे बंड अयशस्वी ठरले. त्या बंडाचा पूर्णपणे बिमोड केल्यानंतर **कामपिलाचा** राजा व **बदा-अल-दिन-गुरशाय** या दोघानाही कैद करण्यात आले. राजाला त्यामानाने 'सौम्य' शिक्षा-शिरच्छेद फर्माविण्यात आली. उन्मेखून नोंद करावयाचा मुद्दा, हा बंडखोर मुसलमान सुभेदार हा **तघलक** घराण्याच्या राजवटीचा केवळ अधिकारी नव्हता, तर तो बादशहाचा फारच जवळचा नातेवाईक होता. या अधिकाऱ्याच्या नातेवाईक स्त्रिया, त्याच्यावर जाहिरपणे थुंकल्या, या अधिकाऱ्याची तो जिवंत असतानाच सालडी काढण्यात आली. शिल्लक राहिलेल्या मृत देहातील मांस, भाताबरोबर कालवून, त्याचे गोळे करून हत्तींना देण्यात

आले. हा येथवरचा वृत्तांत हा इतिहासात दस्ताऐवजातून नमूद आहे. पण **'गुरशाय'** यांचा आणखी कमालीचा अवमान झाल्याचे आख्यायिका सांगतात. **इब्न बटूटा** आपणास असे सांगतात की, या बंडखोराच्या शरीराच्या मासाचे गोळे, त्या हत्तीनी खाण्यास नकार दिला होता !!

याचबरोबर हेही नमूद केले पाहिजे, की सुफींचे मठ व मशिदी अशा प्रकारची मुसलमानांची सार्वजनिक प्रार्थना स्थाने, ही एखाद्या सुलतानाविरुद्ध बंड करून उठलेल्या अगर ज्या अधिकाऱ्यांची निष्ठा विचलीत झालेली आहे. अशा या विद्रोही व्यक्तींच्या आश्रयाखाली ती प्रार्थना स्थाने असली तरीही **त्यावर मुसलमान राज्यकर्ते हल्ला करीत नसत.** तसेच हिंदुस्थानातील एखाद्या मुसलमानी राजवटीने आपल्या प्रतिस्पर्धी, आपल्यासारख्याच दुसऱ्या मुसलमानी राजवटीच्या अंमलाखाली असलेला प्रदेश पादाक्रांत करून तो प्रदेश आपल्या साम्राज्यात समाविष्ट करून घेतल्यानंतर त्याठिकाणच्या पराभूत झालेल्या मुसलमान सुलतानाच्या आश्रय असलेला **सार्वजनिक श्रद्धा स्थानांना भ्रष्ट वा विटंबित करण्यात येत** नसे. याउलट ज्या मुसलमान राज्यकर्त्याचा पराभव या नव्या मुसलमान राज्यकर्त्यांनी केला आहे, ते सारे **चिस्तीशेख** या **सुफीपंथी प्रार्थना स्थानांचा आदर करून, त्याला राजाश्रय मिळण्याच्या बाबतची कारवाई ताबडतोब करीत.** उदा. दिल्ली या राजधानीतून राज्य करणाऱ्या अखेरच्या सुलतानाचा इ. स. १५२६ साली पराभव केल्यानंतर हिंदुस्थानातील पहिला मोगल सम्राट **बाबर** याने त्या शहराचा ताबा घेतल्यानंतर, त्या शहरात असलेल्या प्रमुख चिस्ती– कबर– प्रार्थनास्थानांना आपल्या राजवटीचा आश्रय जाहीर करण्यात कसलीही हयगय न करता, जाहीर केला होता. मोगल सम्राटानी आपल्या साम्राजाचा विस्तार करताना, हिंदुस्थानांनी इतर मुसलमानांच्या राजवटीचा पराभव केल्यानंतर आपल्याला सुपरिचित असलेल्या आकृतिबंधाची पुनरावृत्ती झालेली दिसते. बंगाल प्रांत इ. स. १५८० साली मोगलानी काबीज केला. त्यानंतर पानदुआ (Pandua) येथील दोन चिस्ती पंथी प्रार्थना स्थानावर आश्चर्य वाटावे अशी राजाश्रयाची खैरात केली.

ही दोन्हीही स्थाने **शेख आला-अलहक** (मृत्यू इ. स. १३९८) आणि **शेख नुर कुतब इआलम** (मृत्यू १४५५) या दोन सुफी पंथियानी प्रस्थापित केली होती. मोगलानी हा प्रदेश काबीज करण्याअगोदर तोवर बंगालवर राज्य करणाऱ्या हिंदुस्थानातील मुसलमानी राजवटीने-सुलतानानी-या सुफी पंथीय प्रार्थनास्थळाना ज्या प्रमाणात राजाश्रय दिला होता. तसा अन्य कोणत्याही प्रार्थना स्थळाला दिलेला नव्हता. कालांतराने मोगल साम्राजाचा विस्तार दख्खनमधील हिंदुस्थानातील मुसलमानांच्या राजवटींचा पराभव करून झाला. फकीर– संत-महात्मे यांचे जे पंथ असत त्याना कर्मठ व कठोर औरंगजेब बादशहा कधीही आश्रय देत नाही अशी त्याची किर्ती होती. परंतु या बादशहाने **खुलदाबाद** आणि **गुलबर्गा** या

ठिकाणच्या चिस्ती प्रार्थना स्थळाना मोठ्या प्रमाणात द्रव्य देणगी म्हणून दिले होते. लक्षात घेण्याचा भाग म्हणजे अगोदरच्या राजवटींना वैधत्व प्राप्त व्हावे यासाठी या सुफी-पंथिय प्रार्थना स्थळानी सहाय्य केले होते.

**हिंदू देवालये आणि मशिदी यांना देण्यात येणाऱ्या वागणुकीतील फरक**

स्वतंत्र हिंदू राज्यात राजाश्रयाखाली असलेले देवालये अगर हिंदुस्थानातील मुसलमान सुलतानांच्या पदरी असलेल्या हिंदू सरदारांच्या आश्रयाखाली असलेली देवालये यांच्याशी तुलना करता, मशिदी आणि इतर इस्लामी तीर्थस्थाने, श्रद्धास्थाने यांना देण्यात येणाऱ्या वागणूकीत फरक केला जात होता. येथवरच्या चर्चेत जो पुरावा सादर केलेला आहे, त्यावरून हे निश्चितपणे सूचित झालेले आहे. याचे कारण राजाश्रय असलेल्या हिंदू देवालयाना राजकीय संदर्भ होता. त्या राजाश्रयाचा अर्थ वेगळा लावला जात असे. मशिदी बांधणे हे हिंदुस्थानातील मुसलमान-राज्यकर्त्यांच्या दृष्टीने एक धार्मिक स्वरूपाची श्रद्धेय कृती होती. इतकेच नव्हे तर ते त्यांचे कर्तव्यच आहे असे समजले जात होते. परंतु त्या मशिदीतील वा दर्ग्यातील ज्या काल्पनिक व्यक्तीच्या (Deity) पूजा-अर्चा-प्रार्थना केली जात असे,तिचा सुलतानाशी वा त्याच्या राजवटीशी कोणत्याही प्रकारचे वैयक्तिक नाते नव्हते; हा विचार त्याकाळी मान्य झाला होता असे दिसते. तसेच ही अशा प्रकारची स्मारके, ही काही हिंदुस्थानातील मुसलमानी राजवटींचे आधार (under pinnigs) नव्हते. तसेच सुलतानाला राज्य करण्याचा अधिकार त्या प्रार्थनास्थळापासून प्राप्त झाला आहे, असे तर कोणीच मानीत नव्हते. हा मुद्दा यापुढे देण्यात आलेल्या उदाहरणावरून चांगल्या प्रकारे अधोरेखित व्हावा. मोगल बादशहा **औरंगजेब** आणि शेखं महंमद (मृत्यू १६९६) हा सुफी-पंथी, या दोघांच्यातील तंट्यांचा वृत्तांत उपलब्ध आहे. **औरंगजेब** बादशहाला, धर्मशास्त्रदृष्ट्या जो दृष्टीकोन इस्लामला सोडून आहे असे वाटत होते त्या दृष्टीकोनाचा या सुफीने इन्कार व त्याग करण्यास नकार दिला होता. शेख-महंमद यांना मोगल साम्राज्यात समाविष्ट असलेला प्रदेश सोडून जाण्याचा हुकूम देण्यात आला. या सुफीने या हुकूमाकडे दुर्लक्ष करून, स्थानिक मशिदीत आश्रय घेतला. **औरंगजेबाने** असे जाहीर केले की, हे कृत्य खपवून घेतले जाणार नाही याचे कारण बादशहाच्या साम्राज्यात अंर्तभूत असलेल्या भूमीवर ही मशिद आहे. बादशहाच्या 'या उर्मटपणावर' प्रतिक्रिया व्यक्त करताना या सुफीने एवढेच म्हटले की, मशिद ही अल्लाचे स्थान म्हणूनच ती अल्लाची मालमत्ता आहे. हा जो तिढा निर्माण झाला होता त्याची सोडवणूक या सुफी **शेखची** औरंगाबाद किल्ल्यातील तुरुंगात रवानगी करून, करण्यात आली. हा किल्ला ही बादशहाची मालमत्ता हे अगदी नि:संशयपणे स्पष्ट होते.

**(एक)** मोगल हिंदुस्थानात मशिदी ही फारच महत्त्वाची श्रद्धास्थाने (Potent) समजली जात असली तरी ती एखाद्या घराण्याची वा सुलतानाच्या मालकीची नसते. शिवाय त्या

साम्राज्यात अंर्तभूत असलेल्या भूमीशीही त्या मशिदीला काही देणेघेणे नसते. थोडक्यात सुलतान त्याचे साम्राज्य, आणि त्यात असलेली मशिद ही एकमेकापासून सर्वस्वी अलग आहेत असे समजण्यात येत होते. **(दोन)** या कारणामुळेच ती राजकीयदृष्ट्या निष्क्रीय होती. **(तीन)** याचा अर्थ असा होतो की, ही राजाश्रय असलेली श्रद्धास्थाने, अवमानित झाली वा त्यांची विटंबना झाली तर त्याला राजाश्रय देणारी राजवट विस्थापित होणे, याच्याशी या श्रद्धास्थानाना काहीही संबंध नव्हता. हिंदू राजानी मुसलमान राज्यकर्त्यांचा पराभव करून त्या मुसलमानी अंमलाखाली असलेल्या प्रदेशावर आपली सत्ता प्रस्थापित केल्यानंतर त्या पराभूत राजवटीच्या आश्रयाखाली असलेल्या मशिदी, दर्गे व इतर श्रद्धास्थाने ही सामान्यपणे अवमानित केली जात नसत; अथवा त्यांची विटंबना करीत नसत. याबद्दल म्हणूनच आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. उदा. **शिवाजी** (महाराजांनी) विजापूरच्या सुलतानाच्या राजवटीत महाराष्ट्रातील जो प्रदेश अंर्तभूत होता. त्याच ठिकाणी मराठा साम्राज्याची स्थापना केली अगर **बहामनी** सलतनच्या अधिपत्याखाली येणारा प्रदेशावर आपला अंमल प्रस्थापित करून, विजयनगरने ती आपल्या साम्राज्यात सामील करून घेतली. या दोन्हीही वेळा मशिदी, दर्गे वा इतर श्रद्धास्नाने यापैकी एकाचाही अवमान वा विटंबना करण्यात आली नाही. इतकेच नव्हे तर विजयनगरच्या राजानी आपल्या स्वत:च्या मालकीच्या मशिदी बांधल्या. या राजाच्या सैन्यात फार मोठ्या संख्येने मुसलमान होते. त्यांची श्रद्धा लक्षात घेऊन या विजयनगर सम्राटाने हा निर्णय घेतला होता. अर्थात येथवर प्रतिपादन केलेल्या संकल्पनेला अपवाद अशा घटना आहेत, पण त्यांची संख्या तशी फारच अल्प आहे. उदा. काही मशिदी अवमानित करण्यात आल्या वा त्यांची विटंबना जरूर झाली होती. उदा. राजस्थानच्या जयपूर जिल्ह्यातील **सामकार** येथे, **शहा राब्झ अली** यांनी त्या ठिकाणचे देवालय नष्ट करून मशिदीची उभारणी केली होती. **शहा आलमच्या** राजवटीत (इ. स. १७०७-१२) बिगर मुसलमानानी (हिंदूंनी) ही मशिद जमिनदोस्त केली. परंतु ती त्यानंतर फारुख सियार यांच्या राजवटीत त्या मशिदीची पुनर्उभारणी करण्यात आली होती. औरंगजेबाने इ. स. १६८० साली राजस्थानावर स्वारी करून **उदयपूर** आणि त्यांच्या परिसरात असलेली देवालये जमिनदोस्त केली होती. रजपूतांचा प्रमुख **भिमसिंग** यांने बादशहाच्या या कृतीचा बदला घेण्याच्या उद्देशाने गुजराथवर धाड घातली. *वडनगर, विशालनगर* आणि **अहमदाबाद** या ठिकाणी लुटमार केली. **अहमदाबाद** येथील किमान तीस छोट्या मशिदी आणि एक मोठी मशिद, रजपूत प्रमुख **भिमसिंग** यांनी जमिनदोस्त केली होती.

मशिदी आणि हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्ते यांचा संबंध कशा प्रकारचे होते. हे येथवरच्या विवेचनावरून स्पष्ट व्हावे. मध्ययुगीन हिंदुस्थानातील स्मारक स्वरूपाची राजाश्रय मंदिरांच्या संकुलाच्या बाबतीत परिस्थिती वेगळी होती. याचे कारण त्या देवालयांतून सत्ता

स्थानावर असलेल्या राजघराण्याच्या 'कुल-स्वामी देवतांची' प्रतिष्ठापना झालेली असे एखाद्या विशिष्ट राजघराण्याच्या अंमलाखाली असलेल्या प्रदेशावर त्या राजघराण्याची जी सत्ता होती, त्यात तो 'कुल-स्वामी' हा वाटेकरी आहे असे मानले जात असे. याच कारणाने पराभूत विरोधकांच्या राजाश्रयाखाली असलेल्या देवालयांची लूट करणे, त्यातील देव-देवतांच्या मूर्तीची विटंबना करणे हे मुसलमान राजवटींच्या राजवटीचे सुलतान वा त्यांचे सेनापती करीत असत. युद्धात विजय मिळविल्याचे प्रतिक म्हणून देव-देवतांच्या मूर्ती मुसलमान राजवटींच्या राजधानीत नेण्यात येत असत. एवंच **हिंदुस्थानातील राज-कारणातील तोवर प्रस्थापित झालेला तो परंपरागत रितीरिवाज होता.** त्याला एका अर्थाने हे हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्ते मान्यता देत होते. त्याचप्रमाणे हे मुसलमान राजवटीचे सेनापती हिंदूच्या राजाश्रयखाली असलेली देवालये जमिनदोस्त करून, त्या ठिकाणी मशिदीची उभारणी करीत तेव्हा पराभूत झालेले राज्यकर्त्यांना ज्ञात असलेल्या युक्तिवाद वा तर्क यावर, ते विजयी मुसलमान राज्यकर्ते भर देत असत, एवंच विजयी मुसलमान राज्यकर्ते हिंदू समाजाचे जे 'राजकीय तर्कशास्त्र, होते त्यानुसार या मशिदींची उभारणी करण्यात येत होती. त्याचे असे आहे हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्ते त्याकाळी प्रस्थापित व विद्यमान असलेल्या राजकीय सिद्धांत व विचारानुसारच या मशिदींची उभारणी करीत होते. याचे कारण आपल्या अंमलाखाली असलेली हिंदू प्रजेला अशा देवालयांना (मशिदी) किती पराकोटीची राजकीय महत्त्व व लक्षणियता आहे. याचे ज्ञान त्या हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्त्यांना होते. संघर्ष नसलेल्या शांततेच्या काळात या अशा राजाश्रयी देवालयांचे महत्त्व किती मोठे आहे । होते, हेही हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्ते जाणून होते. उन्मेखून लक्षात ठेवावयाचा मुद्दा हा आहे की शांतता असताना (म्हणजे हिंदू प्रजाजनावरोबर लढा वा संघर्ष होत नव्हता त्या काळात) अशा खास देवालयांना सरकारने संरक्षण दिले पाहिजे हे मान्य करण्यात आलेले होते. पण हिंदू–मुसलमान यांच्या संघर्षाच्या काळात नेमकी याच देवालयांची लुट, त्या देवालयातील मूर्तीचा अवमान, विटंबना करणे व जमिनदोस्त होणे यास पात्र आहेत असे याच तर्कशास्त्रात अनुस्यूत होते.

**देवालयांची विटंबना अपमान आणि राज्य उभारणीच्या मागचा लिखित सिद्धांत**

हिंदुस्थानात मुसलमानानी स्थापलेल्या 'राज्यां'ची उभारणी विषयीचा लिखित सिद्धांत आणि **प्रत्यक्ष व्यवहार** यात फरक करण्यात अपयश आल्याकारणाने, देवालये अपमानित करणे आणि त्यांची विटंबना करणे याचे भारतीय इतिहासात नेमके स्थान काय आहे, यासंबंधी फारच गैरसमजुती निर्माण होतात. त्याचे असे आहे की लिखित सिद्धांत हा आदर्श काय आहेत, यांची नियमावली (normative) सांगणारा, सनातनी तत्वप्रणालीशी अगदी

जखडबंदपणे चिकटून राहणारा असतो. याउलट अनेक मूलस्त्रोतातून निर्माण झालेल्या कल्पना, अभिरुची, ढंग यांचा स्वीकार कोणत्याही एका तत्त्वज्ञानाशी बांधिलकी नसलेला, अनेक मूलस्त्रोतातून निर्माण झालेल्या श्रद्धा स्विकारणारा आणि तत्त्वप्रणालीची शार्गिदी न पत्करणे ही आपली प्रवृत्ती,'प्रत्यक्ष व्यवहार' प्रकट करतो. लिखित सिद्धांतानुसार देवालये अवमानित करणे आणि त्यातील मूर्तीची विटंबना करणे यांना हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्त्यांच्या पदरी असलेल्या तवारिखकारांच्या लिखाणात प्रमुख व महत्त्वाचे स्थान आहे. लिखित सिद्धांतानुसार हिंदुस्थानातील मुसलमानी राज्य उभारणीत तो एक आवश्यक आणि कौतुकास्पद असा घटक होता. अगदी सुरुवातीच्या काळात जे मुसलमान हिंदुस्थानावर स्वारी करून आले वा त्या काळात जे मुसलमान राज्यकर्ते होते त्यांना कमालीच्या धर्मनिष्ठ आणि वस्त्रगाळ (Puritanical) अशा हिरोच्या भूमिकेत नेऊन बसविण्यासाठी त्यानंतरच्या काळात आलेल्या तवारिखकारांनी त्यांच्या नांवावर वेळप्रसंगी अनेक 'पराक्रम' नमूद करून ठेवले आहेत. देवालयांची लुट, त्यांचा अवमान आणि त्या देवालयातील मूर्तीची विटंबना या संदर्भात या तवारिखकारानी पेश केलेली माहिती तशी फारच लक्षणीय आहे. उदा. **गझनीच्या मंहमदाने,** कनोजमधील दहा हजार देवालये, मथुरेतील एक हजार देवालये, मंहमद गझनीचा नातू **इब्राहिम** याने दिल्ली **दोआबा** भागातील एक हजार आणि **माळव्यातील** एक हजार, दिल्लीत **ऐबक** सुलतानाने एक हजार आणि **मंहमद धुरीने** बनारस भागातील एक हजार देवालये पार जमिनदोस्त केली होती असे हे तवारिखकार लिहून ठेवतात आणि हिंदू राष्ट्रवादी हे आकडे सत्यच आहेत असे मानून त्यांचा स्विकार करतात. या समजाला आणखी खतपाणी मिळते ते **इसामी** या कवी– तवारिखकाराने इ. स. १३५० साली आपल्या सत्ताधारी आश्रयदात्याला जो सल्ला दिला होता त्यामुळे दख्खनमधील मुसलमानी राज्याचा संस्थापक सुलतान **'अला-अल दिन हसन बमन शहा'** यांस असा सल्ला देण्यात आला होता की,

"जर तू आणि मी, हे बुद्धीवान माणसा आपले या देशावर प्रभुत्व असेल, आणि या देशातील मूर्ती असलेल्या देवालयांच्या जागी मशिदी उभारण्याच्या, काही वेळा ब्राम्हणांची जानवी सक्तीने तोडण्याचा, आणि स्त्रिया, बालके यांना गुलाम बनविण्याचा अधिकार असलेल्या स्थानावर असलास तर हे त्या गझनीच्या मंहमदाच्या किर्तीमुळे आहे – तू आज जे काही साध्य करशील ते उद्याची कथा बनणार आहे."

या दरबारी कवीच्या मनात त्या सुलतानाने ज्या गोष्टींचा पाठपुरावा करून किर्ती प्राप्त करून घ्यावी व तो **मंहमद गझनीचा** वारस पुढे चालू ठेवावा अशी इच्छा होती. परंतु हा असा सल्ला मिळाला होता तरी त्या सुलतानाला त्या इच्छेला मान देण्यापेक्षा आपल्या राज्याच्या राजकीय स्थैर्याबद्दल अधिक कर्तव्य होते. या नव्या सुलतानाने कोणत्याही

देवालयांचे रूपांतर मशिदीत केल्याचा पुरावा उपलब्ध नाही. खरे म्हणजे त्याचे असे होते की पूर्वीच्या दिल्ली सलतनतच्या समाविष्ट असलेल्या काही प्रदेशाच्या कब्जा घेऊन, **बहामनी** सलतनतच्या संस्थापकाने आपल्या नव्या राज्याची स्थापना केली होती. याचा अर्थ हा होता की, या प्रदेशात हिंदू राजेच नव्हते. म्हणजे त्यांच्या अंमलाखाली असलेल्या प्रदेशाचा प्रश्नच उपस्थित होत नाही. थोडक्यात सुलतानाने स्थापन केलेल्या नव्या राजवटीला, ज्याच्यापासून धोका निर्माण होईल अशी राजाश्रय असलेली देवालयेच नव्हती.

देवालयांची विटंबना करणे, त्याठिकाणी असलेल्या देवतांच्या मूर्तींचा अपमान करणे, वेळप्रसंगी ती जमिनदोस्त करणे अगर चिस्तीपंथीय शेखाना सुलतानाश्रय देणे. या दोन्हीही गोष्टीचा हिंदुस्थानातील– मुसलमानी– राज्यउभारणीबाबतच्या तत्कालीन लिखित वा मौखिक सिंद्धातातून वारंवार आवर्जुन नमूद झालेल्या आहेत. पण याहीपेक्षा वेगळ्या अशा या मुसलमान सुलतानाना प्रिय असलेल्या कर्मकांडाचा पुसटता उल्लेखही त्यात आढळत नाही. मौर्य राजवटीपासून (ख्रिस्तपूर्व ३२१-१८१) **गंगा नदीचा** हिंदू सम्राटांच्या साम्राज्याशी असलेला 'मिथ' सदृष्य संबंध चांगलाच प्रस्थापित झाला होता. 'गंगा नदी' ही देवता स्वरूप आहे. तिच्या 'पवित्र' स्थानात अनुस्यूत असलेल्या अर्थ गंभीर आणि भावनाना आवाहन करणाऱ्या या प्रतिकाचा विचार, हिंदुस्थानातील मुसलमान राज्यकर्त्यांच्या संदर्भात या ठिकाणी प्रस्तुत आहे. या संबंधाचा पुसटताही उल्लेख हे तवारिखकार कटाक्षाने करीत नव्हते. हिंदुस्थान या एका द्विपकल्पाशी मध्ययुगीन काळापासून, या ठिकाणच्या अत्यंत सामर्थ्य–शाली साम्राज्यांशी, या मिथिकाच्या संबंधी अगदी घनिष्ट होता हे स्पष्ट आहे. उदा. **चालुक्य, राष्ट्रकुट** आणि **चोला** – दक्षिण हिंदुस्थानातील साम्राज्ये या साम्राज्यानी पवित्र **'गंगा'** ही आपल्या साम्राज्याच्या राजधानीतही आणून सोडली आहे असा दावा केला होता. अशा प्रकारे आपल्या साम्राज्याची राजवट ही **'गंगा नदी'**चा आशीर्वाद असलेली राजवट ही वैध आहे असे दाखविण्याचा प्रयत्न त्या त्या साम्राज्यांच्या राजवटी करीत असत. **चालुक्य** आणि **राष्ट्रकूट** या राजवटींची संबंध बहुधा या प्रतिकाकरवी प्रदर्शित केला जात होता. 'गंगा' नदीच्या प्रत्यक्ष गंगाजलाचे कुंभ, आपल्या दक्षिण हिंदुस्थानातील राजधानीत प्रत्यक्ष नेऊन या पुरातन 'मिथ' संबंधाला या राजवटींच्या सम्राटानी मान्यता दर्शविली होती. आपणास असे सांगितले जाते की **मंहमद बिन तघलक** याने इ. स. १३२७ नंतर याच पुराण्या प्रथेला मान्यता दिली होती. एवढेच नव्हे तर त्यानुसार वर्तनही केले होते. इ. स. १३२७ साली महाराष्ट्रातील **दौलताबाद** येथे दिल्ली– सलतनतच्या प्रचंड साम्राज्याची राजधानी म्हणून त्याची प्रतिष्ठापना केली होती. हा निर्णय घेतल्यानंतर हिंदुस्थानातील पूर्वसूरींनी – म्हणजे हिंदू साम्राज्यांच्या राज्यकर्त्यानी जे केले होते, तेच या सुलतानाने केले. म्हणजे आपले साम्राज्य वर्धिष्णु होण्यासाठी **'गंगाजल'** हे आवश्यकच आहे. **'गंगा'**



अनुक्रमणिका

नदीवरूनच घेतलेले हे **'गंगाजल'** आपल्या नव्या राजधानीत येण्यास किमान चाळीस दिवस त्याकाळी लागत होते. त्याचे त्या सुलतानास ज्ञान होतो. उन्मेखून लक्षात घ्यावयाचा मुद्दा म्हणजे हे **'गंगाजल'** हा सुलतान आपल्या वैयक्तिक अशा धार्मिक कर्मकांडासाठी आणीत होता. अशा प्रकारे तोवर शास्त्रपूत ठरलेल्या हिंदू कर्मकांडाला (ritual) आपली सहमती आहे हेच तो सुलतान सांगत होता. हिंदुस्थानातील मुसलमान राजवटीचे हे 'गंगाजल' महात्म्य यानंतरही अनेक शतके चालूच होते. **तघलका**नंतर काही शतकांनी बंगालमधील मुसलमान सलतनतीला आपल्या राज्यारोहण समारंभाच्या वेळी **'गंगासागर'** या पुरातन क्षेत्रातून आपल्या स्नानासाठी 'गंगाजला'सारखे 'पवित्र' पाणी आणीत असत. बंगालच्या उपसागराला ज्या ठिकाणी गंगा नदी येऊन मिळते, त्या स्थानास गंगासागर हे नाव आहे.

ही वस्तुस्थिती होती, तरी हिंदुस्थानातील मुसलमानी राज्यांची प्रस्थापित व्यवस्था, अगर त्या राज्यांची देखभाल यांच्याशी 'गंगानदीचा संबंध होता, **यांची नोंद कोणत्याही तत्कालीन तवारिखात अगर शिलालेखात आढळत नाही.** हिंदुस्थान बाहेरच्या देशातून आलेल्या प्रवाशांनी लिहून ठेवलेल्या वृत्तांतावरून आपणास ती वस्तुस्थिती ज्ञात होते. **मंहमद बिन तघलक** यांच्याविषयी एका **अरब** प्रवाशाने या घटनेची नोंद केलेली आहे. बंगालमधील सुलतानाबद्दल एका **पोर्तुगीज** धर्मगुरूने लिहून ठेवले आहे. छप्परधारी रथात बसून जगन्नाथाच्या रथोत्सवात बसून अध्यक्षाच्या भूमिकेत असलेल्या मोगल सरदाराचे चित्रण कोणत्याही मोगल तवारिखेत आढळत नाही. एका **इंग्लिश** प्रवाशाने या प्रसंगाचे वर्णन लिहून ठेवलेले आहे. इ. स. १६३३ साली हा प्रवासी जगन्नाथ पुरी येथे होता. सिद्धांत व प्रत्यक्ष व्यवहार या दोघांच्यात झालेली ही फारकत याची नोंद मुसलमानी तवारीखात आढळत नव्हती. तीच परिस्थिती बिगर मुसलमानी राजवटींच्या वर्णनातही आपणास आढळून येते. हिंदुस्थानाबाहेरून आलेल्या 'रानटी तुर्क– म्लेच्छांच्या' हल्ल्यापासून धर्माचे रक्षण करण्यासाठी **विजयनगरचे** योद्धे आणि धर्मगुरू (sages) आपली सर्व ताकद एकत्र करून, **विजयनगर** साम्राज्याची स्थापना कशी झाली याची तपशीलवार गाथा ब्राम्हण भाटानी व धर्मगुरुनी अगदी वस्त्रगाळ संस्कृतमध्ये रचलेली आपणास आढळते. हा झाला लिखित सिद्धांत. परंतु **विजयनगर** साम्राज्याचे दैनंदिन व्यवहार आणि राजकारण हे एक वेगळ्याच पायावर उभे होते हे मात्र ते सांगत नाहीत. दैनंदिन व्यवहार व राजकारण याबाबत **विजयनगरच्या** राज्यकर्त्यांनी मुसलमानी सलतनतीकडून घेतलेल्या गोष्टींचा उल्लेख त्यांच्या रचनात आढळत नाही. उदा. मुसलमानी राजवटीत एखाद्याचा बहुमान करण्यासाठी त्याला किताब देण्यात येत असे. तीच प्रथा राजकर्त्यांनी स्विकारली होती. दरबारी पोशाख, सैन्य रचना राज्यकरण्यामागची तत्त्वप्रणाली, स्थापत्य, नगररचना आणि अर्थकारण या सर्व क्षेत्रात



अनुक्रमणिका

ते तत्कालीन हिंदुस्थानातील इस्लामी जगताचे अनुकरण करीत होते. हिंदुस्थानातील मुसलमानी राजवटीने स्विकारलेल्या **'हिंदू'** प्रथाबद्दल त्या समाजाबाहेरच्या लोकांकडून – परदेशी व्यापारी परराष्ट्राचे वकील, प्रवासी इत्यादी – आपणास कळते, तोच न्याय ब्राम्हण भाट व सिद्धांती या दोघानी लिहून ठेवलेल्या वृत्तांताना लागू आहे.

**निष्कर्ष**

तेराव्या आणि अठराव्या शतकातील हिंदुस्थानातील मुसलमानी राज्ये ज्यूडीको (ज्यू)– इस्लामी मूर्तीभंजन धर्मशास्त्राने पछाडलेली होती. केवळ लुट-मार करणे आणि हिंदू देवालयांचा कसलाही विचार न करता त्यांचा अवमान वा विटंबना करणे हा उद्योग त्या मुसलमानी राजवटी करीत होत्या. असे वारंवार सांगण्यात येते. इ. स. ११९२ नंतरच्या काळातील याबाबत जो पुरावा उपलब्ध आहे, त्यावरून तरी हे चित्रण वास्तव नाही असेच आढळून येते. हिंदू देवालये विटंबित करणे, ती अवमानित करणे, इत्यादी कृती मूर्ती–भंजकानी आपल्याला प्रिय असलेल्या धर्माच्या धर्मशास्त्राच्या प्रेरणाने केल्या जात होत्या असा काही भाष्यकारांचा (उदा. विन्क wink यांचा **अल-हिंद** हा ग्रंथ) दावा आहे. असे जर असते, तर मूर्तीभंजनी– धर्मशास्त्रानुसार हिंदुस्थानात सर्वत्र असणारी सर्व देवालये नष्ट करणे या कामगिरीला, हिंदुस्थानातील मुसलमानी राजवटींची बांधिलकी असावयास हवी होती. विटंबित केलेल्या वा जमिनदोस्त केलेल्या देवालयात काही लक्षणीय देवालयांची अंर्तभाव न होता, हिंदुस्थानातील सांदिकोन्यात असलेल्या देवालयांचा अंर्तभाव व्हावयास हवा होता. पण तसा तो न होता फक्त काही प्रमुख देवालये विटंबित वा अवमानित करण्यात आली होती. (असे उपलब्ध पुराव्यावरून तरी दिसते) याउलट असे चित्र स्पष्ट होते की, शत्रू पक्षातील (हिंदू) राजांच्या हुकुमती खाली असलेला प्रदेश जिंकून घेतल्यानंतर या आपल्या साम्राज्यात नव्याने सामील करून घेतलेल्या प्रदेशातील हिंदू देवालये, विटंबित वा अवमानित करण्यात येत होती. हिंदुस्थानातील मुसलमानी सत्तेचा त्याकाळी सतत विस्तार पावत असलेल्या साम्राज्याच्या सीमेलगतच्या या काबीज केलेल्या पूर्वीच्या हिंदू राज्याचा प्रदेश असे. या मुसलमानी राजवटींच्या चाकरीत असलेल्या एखाद्या प्रमुख सरदाराने, गद्दारी केली, तर त्याला शिक्षा म्हणून त्याच्या आश्रयाखाली असलेली प्रमुख देवालये विटंबित वा अवमानित करण्यात येत असत. याचबरोबर हिंदुस्थानातील मुसलमानी राज्यात जो प्रदेश समाविष्ट होता त्यातील हिंदू देवालये ही सामान्यपणे मुसलमानी राज्याची मालमत्ता समजली जाई; आणि त्या मालमत्तेला कोणत्याही प्रकारे इजा पोहोचेल असे काहीही करण्यात येत नसे.

सरतेशेवटी एका महत्त्वाच्या मुद्याची उन्मेखून नोंद केली पाहिजे. आपल्या धार्मिक स्मारकांचा तत्कालीन भारतीय– हिंदू व भारतातील मुसलमान हे वेगवेगळ्या प्रकारे अर्थ लावीत असत. तसेच प्रस्थापित राजकीय व्यवस्था, व्यवहार आणि राजकीय अधिकार



अनुक्रमणिका

यांच्याशी या स्मारकांचे असलेले संबंध वा नाते हेही वेगळ्या प्रकारचे आहे असे मानले जात होते. मोगल बादशहा औरंगजेबाच्या राज्यातील शेख मंहमदाने एका मशिदीत आपले स्वत:चे संरक्षण करण्यासाठी आश्रय घेतला होता. असे करताना मशिद ही इमारत मुलभूतपणे राजकारणी संबंधी नसलेली, राजकारणापलीकडे जाणारे (a political) असे स्थान आहे. म्हणजे ती राजकारणापेक्षा खरोखरच वरच्या पातळीवर असल्याकारणाने त्या स्थानावर मोगल बादशहाचा अधिकार नाही अशी शेख मंहमदाची श्रद्धा होती. याउलट तत्कालीन हिंदू देवालये, ही अशी श्रद्धास्थाने होती की ती स्मारके राजकारणाने पुरेपूर भारलेली होती.या परिस्थितीत त्यांच्यावर बाहेरून हल्ला केला जाणे अपरिहार्य होते. म्हणूनच पराभूत हिंदू राजांच्या आश्रयाखाली असलेली देवालये, या राजांचा युद्धात पराभव करून, त्यांना जिंकून घेणाऱ्या तुर्कांना ती विटंबित करण्यासाठी, अवमानित करण्यासाठी आपले लक्ष बनविली होती. विशेषत: हिंदुस्थानात त्यांनी आपले सार्वभौम असे राज्य स्थापन करण्याची मनिषा बाळगल्यानंतर. परंतु हे कृत्य करीत असताना, एखाद्या प्रदेशावर राज्य करण्याचा अधिकार ज्यामुळे प्राप्त होती, त्या विषयींच्या हिंदू धर्मियांच्या कल्पना स्वहिता–साठी त्यांनी राबविल्या होत्या. एका अर्थाने, त्या कल्पनांना सहमती दर्शविली होती. तत्कालीन जे शिलालेख, ताम्रपट अशा प्रकारचे जे साहित्य आहे त्यात हिंदू राजावर स्वारी करून येणाऱ्या हिंदुस्थानातील मुसलमानांचा धर्म लक्षात घेऊन त्याचा कधीही उल्लेख साहित्यात करण्यात आला नव्हता. सर्वसामान्यपणे या स्वारी करून येणाऱ्या इस्लाम-धर्मियाचा उल्लेख त्यांची मातृभाषा कोणती होती हे लक्षात घेऊन केली जात होता. उदा. तुर्क मुसलमानांचा उल्लेख **तरूक्षा** असा केला जात असे. एवंच तत्कालीन हिंदुस्थानात अनेक 'एथनिक' गट होते. त्यापैकी तुर्की हा एक गट आहे असे मानले जात होते. या संदर्भात **ब्रजदुलाल चटोपाध्याय** यांच्या संशोधनाची नोंद आवर्जून घ्यावयास हवी. उदा. त्यांची Representing the other. Sanskrit sources and the Muslims (8th-14th century) [(त्या 'दुसऱ्याचे' प्रतिनिधित्व करताना– संस्कृत आणि इस्लामी या मुलस्त्रोतातून (आठवे शतक ते चौदावे शतक)] या संशोधकाच्या मते, एखादी राजवट जोवर जबाबदार आणि परिणामकारक आहे तोवरच ती 'वैध' आहे अशी आवश्यक (essential) प्रेरणा हिंदुस्थानातील मध्ययुगीन काळातील 'ब्राम्हणी' असे जे लिखाण संस्कृत मुलस्त्रोतात आहे त्यात आढळते ही 'प्रेरणा' प्रत्यक्ष कृतीत कशी आणली गेली याची काही उदाहरणे या संशोधकाने आपणास पेश केली आहेत. एके काळी तोमारस आणि कहामानस (TOMARAS-CAHAMANAS) या मुसलमान घराण्यातील राजाचा अंमल होता. त्यांचा पाडाव करून त्यांच्या जागी **तघलक** आले. पण आपल्या पूर्वीच्या इस्लामी राजवटीचे आपण वैध वारस आहोत याचे कारण आपण चंद्रवंशी पांडवांचे वारस आहोत शिवाय



अनुक्रमणिका

आपण रामराज्याचे (म्हणजे प्रभु रामचंद्राच्या राजवटीचे) पाठीराखे असल्याने, मोगल सम्राटांच्या गादीवर येणारे वैध वारस आहोत, अशी तघलक यांची धारणा होती. (perception)

एवंच हिंदू देवालये विटंवित करणे, ती अवमानित करणे आणि वेळप्रसंगी ती जमिनदोस्त करणे या ऐतिहासिक पुराव्याने, सिद्ध झालेल्या घटना हिंदुस्थानात राहणाऱ्या मुसलमानी केलेली स्वतंत्र राज्यांची उभारणी आणि त्यानंतर त्या राज्यांची देखभाल व स्थैर्य यासाठी अंगिकारलेली धोरणे या सर्वाकडे आपण एक विस्तृत संदर्भ लक्षात घेऊन पाहिले पाहिजे. असे केल्यानंतर आपणास काय आढळते? सर्वसामान्यपणे जो दृष्टीकोन बुद्धीला सोडून आहे (irrational) अगर त्याहीपेक्षा अगदी कनिष्ठ दर्जाचा आहे असे सिद्ध होईल तो निकालात काढण्यात यावयास हवा. त्या दृष्टीकोनाऐवजी या विशिष्ट संदर्भातून उपलब्ध जे आकृतिबंध आहेत असे जे त्याना बौधिक पाया आहे असे सुचविणारा एक दृष्टीकोन आहे, असे आपणास आढळून येईल. तेराव्या शतकाच्या अगोदरपासून, हिंदुस्थानातील राजवटीला वैधत्व कशामुळे प्राप्त होते. या संवंधातील जी हिंदू श्रद्धा होती ती हिंदुस्थानातील मुसलमानी राजवटीतही प्रचलीत होती म्हणजेच जुन्या हिंदू परंपराशी हिंदुस्थानातील मुसलमानी राजवटीनी फारकत करून घेतली नाही असे हे आकृतिबंध सुचवितात.

हे सारे मुद्दे लक्षात घेतल्यानंतर एका अत्यंत गंभीर प्रश्नाला सामोरे जावे लागते. ब्रिटीश राज्यकर्त्याच्या पाठीराख्यानी केलेल्या वसाहतवादी इतिहास लेखनात; हिंदुस्थानातील इतिहास लेखन करताना 'हिंदू रियासत' व 'मुसलमानी रियासत' असे विभाजन केले होते. त्यांचेच अनुकरण करून पाकिस्तानी आणि हिंदू राष्ट्रवादी विचारधारानी, ब्रिटिश राज्यकर्त्यांनी केलेल्या आपल्या इतिहास लेखनात विभाजन केले होते. हे विभाजन यथार्थ आहे का? असा प्रश्न उपस्थित होणे स्वाभाविकच आहे. भरत वाक्य म्हणून सांगावयाचे झाल्यास या शोध- निबंधाची उद्दिष्टे येणेप्रमाणे होती. (एक) सार्वजनिक अशा धार्मिक स्मारकांना तत्कालीन राजे- सुलतान जो राजाश्रय देत होते व वेळप्रसंगी ती विटंबित करीत, त्यांची अवहेलना करीत वा जमिनदोस्त करीत, या त्यांच्या कृतीना किती वेगवेगळा 'अर्थ' होता हे जाणून घेण्याचा प्रयत्न या प्रबंधात केलेला आहे. तत्कालीन कार्यप्रवण व प्रभावी अशा राज्यकर्त्यांना मार्गदर्शक काय ठरले असेल याचा शोध केवळ त्यांची वक्तव्ये लक्षात न घेता, त्यांनी प्रत्यक्ष कृती काय केली त्याच्या आधारे तो अर्थ काय असेल यावद्दल अटकळ बांधण्याचा प्रयत्न केलेला आहे. अशी आशा आहे की या शोध निबंधात ज्या परिकल्पना, अगर दृष्टीकोन सूचित केलेला आहे, तो या अत्यंत जटील व वादग्रस्त प्रश्नासंबंधी जी चर्चा आहे तिला काही प्रमाणात तरी रचनात्मक व जबाबदारपणे सहाय्यभूत ठरावी. या अत्यंत वादग्रस्त प्रश्नाला अशाच प्रकारच्या चर्चेची फारच आवश्यकता आहे.



अनुक्रमणिका

## दोन

हा लेख प्रख्यात इतिहासकार प्रा. रिचर्ड एम. इअटोन (RECHARD M. EATON) यांच्या लेखावरून तयार करण्यात आला आहे. अमेरिकेतील फ्लॉरीडा विद्यापीठाने गेन्सव्हील येथे प्रकाशित केलेल्या ग्रंथात इ. स. २००० साली तो प्रकाशित झाला होता. पण भारतातील व्यावसायिक इतिहासकारांनी त्याची आजवर दखल घेतल्याचे पहाण्यात नाही. प्रा. इअटोन हे अमेरिकेतील तुसकॉन येथील ॲरिझोना विद्यापिठात प्राध्यापक आहेत. 'इस्लामचा' इतिहास या विषयातील ते पहिल्या फळीतील इतिहासकार असा त्यांचा लौकिक आहे. इतिहास काळातील मुसलमानी राजवटींचा त्यांनी सखोल अभ्यास व समीक्षा केलेली आहे. हे काम करण्यासाठी पारशी, पर्शियन, उर्दू आणि इतर मुसलमान देशातील आणखी काही भाषातील अस्सल साधने वापरून त्यांनी आजवरचे लिखाण केलेले आहे. त्यांनी लिहिलेल्या ग्रंथात SUFIS OF BIJAPUR (1300-1700) SOCIAL ROLES OF SUFIS IN MEDIEVAL INDIA आणि THE RISE OF ISLAM AND THE BENGAL FRONTIER हे ग्रंथ समाविष्ट आहेत. येथे सादर केलेला लेखही त्यांच्या प्रकांड पांडित्याची साक्ष आहे. त्यांच्या लिखाणाला मराठी भाषेत उपलब्ध असलेल्या साधनांचा त्यांनी वापर न केल्याने, त्यांच्या प्रतिपादनात काही त्रुटी अर्थातच निर्माण होतात. त्याविषयी या टिपणात पुढे येईलच, या लेखात त्यांनी हिंदू देवालयांची विटंबना-मुसलमानांकडून आणि हिंदू राजाकडून झाली होती, याविषयी एक सूत्र मांडले आहे. या लेखकाचा दृष्टीकोन पूर्वग्रह दूषित आहे. (पण असे असले तरी ते सत्यालाप करीत नाहीत) आणि त्यांच्या लेखातच जे पूर्वग्रह आहेत ते दाखवून त्याबद्दल चर्चा केल्यानंतर त्यांनी बसविलेल्या सूत्राबद्दल चर्चा करण्यात येणार आहे.

ब्रिटिश राज्यकर्त्यांनी 'फोडा व झोडा' या राजनीतिचा अवलंब करताना हिंदुस्थानातील लोकांची 'मुसलमान आणि बिगर मुसलमान' अशी विभागणी केली होती. प्राध्यापकांनी बुद्धीपरस्पर नसेल. (तसे ते नाहीच आहे, याचा पुरावा त्यांनी या लेखातच दिलेला आहे) पण तीच विभागणी आपलीशी केलेली आहे. गंमत अशी आहे की 'अल्पसंख्य' असलेल्या मुसलमानांची त्यांचा धर्म लक्षात घेऊन एक विभाग, आणि बहुसंख्य असलेल्या हिंदूची रवानगी, 'बिगर-मुसलमान' या बिरूदात केली गेली होती. यावर कोणी असा युक्तीवाद करतील की अल्पसंख्याक आपण सदैव विचारात घेतले पाहिजेत हा लोकशाही विचारात अनुस्यूत असलेल्या विचारांबद्दल आपण सदैव जागरुक आहोत हे दर्शविण्यासाठी तशी विभागणी केली असावी. हा जर युक्तीवाद मान्य केला, तर त्यांनी ख्रिश्चन आणि बिगर ख्रिश्चन, पारशी आणि बिगर पारशी अशी विभागणी का बरे केली नाही असेल. खरे म्हणजे अल्पसंख्य लोकात कोणाला जास्त संरक्षणाची गरज असेल, तर या अशा त्यामानाने नगण्य असलेल्या अल्पसंख्य गटाना. पण तसे झाले नाही. ख्रिश्चन व पारशी हे धर्मगट



अनुक्रमणिका

ब्रिटिशाना अगदी जवळचे असूनही हे असे का झाले? या प्रश्नाचे उत्तर एकच आहे. ख्रिश्चन आणि पारशी या अल्पसंख्यांकाचा जाहिरपणे गौरव करून आपल्याला काही राजकीय लाभ होणार नाही हे त्या चतूर व धोरणी राज्यकर्त्यांनी ओळखले होते. प्राध्यापकांनी केलेल्या काही विधानांकडे, आणि त्या विधानाना छेद देणाऱ्या दुसऱ्या काही विधानांकडे वळू या. उदा. त्यांनी असे विधान केले आहे की, उत्तर हिंदुस्थानातील मुसलमानी राज्ये "had been expanding at the expense of **non-Muslim**" states. याचा अर्थ असा होतो की 'बिगर-मुसलमानी' राज्ये फक्त हिंदूची नव्हती, तर इतर धर्मियांची राज्ये त्यात अंर्तभूत होती. पण हे विधान केल्यानंतर त्यांच्या पुढच्या वाक्याने, ते सांगतात 'As non Hindus The latter had never shared sovereinigty with deities म्हणून बाकीचे सारे 'बिगर हिंदूत' मग राहिले कोण? मुसलमान ख्रिश्चन, पारशी, बुद्ध, जैन? पण **non-Muslim** हा शब्द प्राध्यापकांच्या मनात पार घर करून बसलेला असावा. दुसरे एक उदाहरण when Indo- Muslim states expanded into the domains of the **non-Muslim** states आणखी एक उदाहरण "In the newly annexed areas formerly ruled by **non-Muslims**" "Founding of **non-Muslim** states" हिंदू राज्याशिवाय दुसरी कोणाची राज्ये तेथे होती? आणखी एके ठिकाणी ते म्हणतात 'when a sub-ordinate non-Muslim officer in an Indo-Muslim state- हा **non-Muslim** अधिकारी हिंदूच असणार याचे कारण ख्रिश्चन, पारशी, बौद्ध, जैन, शीख तेव्हा एवढ्या उच्च स्थानावर मुसलमानी राजवटीत पोहचतच नव्हते. लक्षात घेण्याचा आणखी एक मुद्दा म्हणजे हेच प्राध्यापक 'Hindus Kingdom' 'independent Hindus States' 'Maratha Kingdom' असेही शब्द वापरतात. याचा अर्थ प्राध्यापकाना तत्कालीन वस्तुस्थितीचे चांगलेच भान होते. एवंच प्राध्यापकांना 'हिंदू' या शब्दाची **आर्लजी** आहे. ब्रिटिश साम्राज्य-शाहीचा हा प्रभाव. **या सामान्यपणे पुराव्याशिवाय विधान न करणाऱ्या इतिहासकारावर अजूनही आहे वा तो प्रभाव अजूनही त्याच्या मनात तग धरून आहे,** असे मानावयाचे का? आपणास एवढे नक्कीच म्हणता येईल त्यांच्या मनात हा पूर्वग्रह अजूनही घर करून आहे. यावर Devil's Advocate या इंग्लिश शब्दाकरवी जो अर्थ व्यक्त होतो, त्यानुसार पुढील प्रतिपादन करता येईल. यात केलेला युक्तीवाद सामान्यपणे बंगाली- भाषा प्रेमी, तथाकथित सेक्युलर, दलित प्रेमी व प्रगतीशील विचारांचे आपण आहोत असे सांगणाऱ्या व्यक्ती करतात. त्यांच्या मते 'हिंदू' हा शब्द अलीकडच्या काळातील म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानावर राज्य करू लागल्यानंतरच्या काळातला आहे. पूर्वी 'ब्राम्हणी' धर्म असाच उल्लेख बंगाली इतिहासात होत असे. या विधानाचा मला पडताळा घेता आलेला नाही. पण प्रा. इअटोन यांनी हा युक्तीवाद ऐकलेला जर असेल तर आपल्या लेखात ते 'हिंदू' या शब्दाचा वापर का बरे करतात?



अनुक्रमणिका

प्राध्यापकांचा हा पूर्वग्रह आणखीही एका ठिकाणी दिसून येतो. मुसलमानी राजवटीची जागा ब्रिटिश राजवटीने घेतली असे प्राध्यापकांनी अप्रत्यक्षपणे सुचविले आहे. याचा अर्थ या देशाचा ताबा घेण्यासाठी त्यांना फक्त मुसलमानाशी लढावे लागले असा होता. प्रत्यक्ष वस्तु-स्थिती काय होती? हिंदुस्थानावर आपले राज्य प्रस्थापित करण्यासाठी अखेरच्या पर्वात ज्या लढाया झाल्या त्या मराठ्यांशी (हिंदूशी) व शीखांशी झाल्या. परंतु ब्रिटिशानी प्रचलित केलेला हा गैरसमज अजूनही अनेक उच्च पदस्थ, यात केंब्रिजसारख्या नामवंत विद्यापिठात विद्यादान (?) करणाऱ्यांच्या मनात अगदी पक्केपणी घर करून आहे. प्रख्यात मुसलमान राजकीय समीक्षक व प्रशासक **तारा अली बेग** यांनी **कै. ए. डी. गोरवाला** यांच्या ओपिनियन या साप्ताहिकात एक लेख लिहिला होता. त्यात याच गैरसमजुतीचा पुनरुच्चार केला होता. त्याला **'नवी क्षितिजे'च्या संपादकांचे परममित्र श्री. ज. द. जोगळेकर यांनी ओपिनियनमध्येच लेख लिहून उत्तर दिले होते.** त्याचे **श्री. ज. द. जोगळेकर** यांनी भाषांतर केले होते. ते मी या ठिकाणी उद्धृत करीत आहेत. यावरून प्राध्यापकांचा पूर्वग्रह स्पष्ट व्हावा.

**इंग्रजांनी हिंदुस्थान कोणाकडून जिंकला? मराठे की मोगल?**

"त्यालाही भूतकाळ हवा आहे. पण आलमगीर नको.

मलाही तसेच वाटते. दक्षिणी ब्राह्मण काय म्हणतात हे तुम्हाला माहीत आहे? इंग्रजांनी हिंदुस्थान त्यांच्याकडून जिंकला. लक्षात घ्या. त्यांच्याकडून; मोगलांकडून नाही. हा त्यांचा उर्मटपणा नाही? आणि हे उदाहरण क्रमिक पुस्तकात छापण्यासाठी त्यांनी लाचही दिली आहे."

फोस्टर यांच्या पॅसेज टू इंडिया (पृ. ६०) या कादंबरीतील वरील संवाद मनोरंजक आहे. इतिहासाविषयीच्या अशा दृष्टीकोनामुळे बहुसंख्य मुसलमानांची भारतीय राजकारणाकडे पाहाण्याची दृष्टी विकृत झाली आणि त्यामुळे भारतीय राष्ट्रवादाच्या नैसर्गिक विकासावर त्याचा वाईट परिणाम झाला असे म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही. या दृष्टीकोनात आजही वापरण्यात येणारा वाक्प्रचार 'मुसलमानांचे ऐतिहासिक स्थान' याचा उगम पूर्वकालीन ऐश्वर्याच्या विकृत दर्शनामध्ये आहे. भारतीय समाजाच्या नैसर्गिक विकासासाठी इतिहासाकडे पाहाण्यांच्या दृष्टीकोनाचा 'फोकस' Focus नीट लावून भूतकाळातील घटनांकडे यथार्थ दृष्टीने पाहिले पाहिजे. त्यासाठीच भारतीय इतिहासातील मराठ्यांच्या विजयी काळाचे विहंगमावलोकन पुढे केले आहे. इंग्रजांनी हिंदुस्थान मराठ्यांकडून जिंकला हे विधान पुस्तकात छापण्यासाठी लाच देण्याची आवश्यकता नव्हती, हे नि:पक्षपाती वाचकाला दाखवावे इतकाच त्याचा हेतू आहे.

तेव्हा आता पूर्वेतिहासाकडे वळू. शिवाजीने स्थापन केलेले राज्य हे हिंदूराज्य होते हे सर्व ज्ञात आहे. त्याचा नाश करण्यासाठी औरंगजेब ससैन्य सन १६८२ मध्ये महाराष्ट्रात

आला. हे नवकोमल राष्ट्र चिरडून टाकण्याची आणि दक्षिणेत मोगली राज्य स्थापन करण्याची मोठी मनीषा औरंगजेबाला होती. सातत्याने नि कडवेपणाने स्वातंत्र्याची एखादी लढाई भारतात सतत वीस वर्षे झुंजली गेली असेल तर ती औरंगजेबाविरुद्धची मराठ्यांची लढाई होय. ज्या प्रदेशात स्वत:चे राज्य स्थापन करण्यास औरंगजेब आला होता तिथे त्याचा मृत्यू झाल्यावर या लढाईचा अंत झाला. त्याच्या मृत्यूमुळे दिल्लीच्या शासनातला समर्थ हात नाहीसा झाला. आणि परिणामत: जे नेहमी घडते ते या वेळीही घडले. दिल्लीच्या सिंहासनासाठी यादवी युद्धाला सुरुवात झाली.

मराठी सैन्याला स्वत:च्या प्रदेशात यादवी युद्धात गुंतवून ठेवण्यासाठी मोगल राजनीतिज्ञांनी शाहूला. . . शिवाजीच्या नातवाला – मोगलांच्या दहा वर्षाच्या नजर कैदेतून मुक्त केले. हा डाव यशस्वी झाला काय? होय, सुरुवातीच्या काळात झाला. परंतु थोड्याच समयात मराठी राज्य सावरले गेले– आणि मराठी सैन्याने मोगलांच्या प्रदेशात चढाया करण्यास सुरुवात केली. आपल्या राज्यापासून दूर ठेवण्यासाठी परंतु त्याच वेळी त्यांना दिल्लीच्या हितसंबंधाशी जखडून ठेवण्यासाठी मोगली राजनीतिज्ञांनी शाहूचा पहिला पेशवा बाळाजी विश्वनाथ याच्याशी करार केला. या करारातील पुढील महत्त्वाच्या अटी पाहिल्या म्हणजे मराठी स्वामित्व दक्षिण हिंदुस्थानात किती पसरले होते याची कल्पना येते.

(१) शिवाजीचे स्वराज्य म्हणून जो प्रदेश ओळखला जात होता तो प्रदेश नि त्यातील किल्ले हे शाहूच्या हाती संपूर्णपणे सुपूर्द करावयाचे.

(२) खानदेश, वऱ्हाड, गोंडवन, हैद्राबाद नि कर्नाटक या प्रदेशातील जो भाग मराठ्यांनी नुकताच जिंकला होता, आणि ज्याचे वर्णन या तहाच्या परिशिष्टात दिले आहे तो भाग मराठी राज्याचा अंगभूत प्रदेश म्हणून मान्य करायचा.

(३) दक्षिणेतल्या सहा मोगली प्रांतातून मराठ्यांना चौथ नि सरदेशमुखी वसूल करण्याचा अधिकार असावा.

(सरदेसाई – न्यू हिस्टरी ऑफ द मराठाज् खंड २. पृ – ४१)

बाळाजी विश्वनाथाने माळवा नि गुजरात प्रांतांच्या चौथाईची सनद मिळवावी अशी शाहूची इच्छा होती. परंतु त्यासाठी योग्य समय आला नव्हता. बाळाजी विश्वनाथाचा मुलगा बाजीराव याने या सनदी मिळवल्या. इतकेच नाही तर मराठी राज्याच्या स्वामित्वाच्या सीमा उत्तरेत वाढवल्या. हे काम त्याने हळूहळू कसे साधले ते थोडक्यात इथे सांगणे शक्य नाही. पण बाजीरावाने दिल्लीच्या शासनाकडे सन १७३५ मध्ये ज्या मागण्या केल्या त्यावरून मराठी स्वामित्वाची कल्पना येते. त्या मागण्यांपैकी काही मागण्या पुढीलप्रमाणे होत्या :

(१) तंजावरचे राज्य शाहूला देण्यात यावे.

(२) चंबळेपर्यंतचा सगळा उत्तरेकडचा प्रदेश पेशव्यांना जहागीर म्हणून देण्यात यावा.

(३) दक्षिणेतला सगळा व्यवहार पेशव्यांच्या मार्फत चालला पाहिजे.

(४) बाजीरावाला, त्याचे कर्ज निवारण्यासाठी, रु. ५० लाख देण्यासाठी ताबडतोब बंगालच्या सुभेदाराला हुकूम व्हावा.

(५) बादशहाची भेट घेण्यासाठी बाजीराव आग्र्याला जाईल. तेथून अमिरखान व जयसिंग त्याला आग्र्याला नेतील आणि बादशहाची स्वारी बाहेर निघाली असताना त्या वेळी बाजीरावाची बादशहाशी मुलाखत होईल. (दरबारात होणार नाही) त्यानंतर दक्षिणेत परत जाण्याची त्याला परवानगी देण्यात येईल.

(सरकार – फॉल ऑफ मोगल एंपायर खंड १. पृष्ठे २७५– २७६)

ही शेवटची अट विशेष महत्त्वाची आहे आणि या दृष्टीने की, त्यात मराठी सत्तेचे खरे स्वरूप दिसते.

मराठी स्वामित्व जसे उत्तरेकडे पसरत होते तसेच ते पूर्वेकडेही वाढत होते. नागपूरकर भोसल्यांच्या नेतृत्वाखाली मराठी फौजा बंगालवर स्वाऱ्या करू लागल्या. मराठी खड्गाचा धाक किती पसरला होता याची कल्पना कलकत्याला असणाऱ्या मराठी खंदकाच्या उल्लेखावरून यावी. (सरकार, पृ. १००). दहा वर्षांच्या सततच्या मराठी स्वाऱ्यांनी बंगालचा सुभेदार अलिवर्दीखान थकला. शेवटी त्यांनी भोसल्यांशी तह केला. त्यानुसार –

(१) मीर हबीब हा अलिवर्दीखानाचा नोकर झाला नि ओरिसा प्रांताचा नायब सुभेदार म्हणून त्याने अलिवर्दीखानातर्फे काम पाहावे असे ठरले आणि त्या प्रांताचा खर्च जाऊन जे शिलकीउत्पन्न राहील ते त्याने रघूजीला त्याच्या सैन्याचा पगार म्हणून द्यावे.

(२) बंगालच्या उत्पन्नातून बारा लाख रुपये त्या प्रांताची चौथाई म्हणून प्रतिवर्षी रघूजीला मिळावे. (सरकार, पृ. १६६)

पण थोडेच दिवसात ओरिसा भोसल्यांच्या राज्याला जोडण्यात आला. इथेच हेही लक्षात ठेवणे आवश्यक आहे की, बंगाल प्रांताच्या चौथाईची हमी इंग्रजांनी घेतली होती नि त्याच्या मोबदल्यात मराठ्यांनी मीर जाफरला त्रास देऊ नये तसेच मीर कासीमला सहाय्य करू नये असे कलकत्याच्या कौन्सिलने जानोजीला कळवले होते. (सरकार – पृ. १७६)

नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीत मराठ्यांची सत्ता सार्वभौम झाली होती. याच काळात भारतावर अब्दालीच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. या संकटाला तोंड देण्यासाठी दिल्ली दरबाराने मराठ्यांशी करार केला. त्या करारानुसार असे ठरले की,

(१) दिल्लीच्या सम्राटाने पेशव्याला त्याने दिलेल्या सैनिक सहाय्यासाठी ५० लाख रुपये द्यावे. त्यापैकी ३० लाख रुपये अब्दालीला भारताबाहेर ठेवण्याच्या कामगिरीसाठी होते.

(२) पंजाब, सिंध, तसेच शियाळकोट, पसरूर, औरंगाबाद नि गुजरात या महालांची, शिवाय, हिसार, संभाल, मोरादाबाद, बदाऊ या जिल्ह्यांची चौथाई मराठ्यांना मिळावी.

(३) अजमीर आणि आग्रा या प्रदेशांच्या सुभेदारीवर पेशव्याची नेमणूक व्हावी.



अनुक्रमणिका

(४) पेशव्याने आपल्या सरदारांच्या सहाय्याने दिल्लीच्या राज्याचे जे परकीय नि स्वकीय शत्रू आहेत त्यांचा बीमोड करावा आणि ज्या राजेरजवाड्यांनी, जमिनदारांनी जमिनी लाटल्या होत्या त्या परत जिंकून दिल्ली दरबाराच्या नोकरांना सुपूर्द कराव्या. (सरकार, पृ. ३६१)

या करारामुळे मराठे आणि अब्बदाली यांच्यात वितुष्ट आले नि पुढे त्याची परिणती पानिपतच्या संग्रामात होऊन त्यात मराठ्यांचा पराभव झाला. परंतु अब्दालीच्या हा विजय तात्कालिक ठरला. त्याला काहीच फलप्राप्ती झाली नाही. म्हणून त्याने नानासाहेब पेशव्याला लिहिले,'तुमच्यात नि माझ्यात शत्रूत्व असण्याचे कारण नाही. . . तुम्ही सतलजपर्यंतचा पंजाबचा भाग आम्हाला दिलात नि शहा आलमला दिल्लीचा बादशहा म्हणून चालू ठेवलात तर दिल्लीच्या शाही राज्याचा व्यवहार तुमच्याकडे सोपवण्यास मी तयार आहे.'

(गंडा सिंग – अहमद शहा दुराणी. पृ. २६२)

दिल्ली दरबारचे कुलमुखत्यार होण्याचे मराठी स्वप्न हे महादजी शिंदे यांच्या कारकीर्दीत साकार झाले. दिल्लीच्या सम्राटाने भर दरबारात पेशव्यांना आपले प्रतिनिधी नि सरसेनापती नेमले. अर्थात या श्रेष्ठ पदांचा अधिकार चालविण्याची कायमची जबाबदारी महादजी शिंदे याचीच राहिल या लेखी आश्वासनावरच वरील पदे पेशव्यांना देण्यात आली. (सरकार : खंड ३. पृ. २९३)

शिंदे आणि भोसले यांचे राज्य किती विशाल होते याची कल्पना या दोन्ही सरदारांचा पराभव झाल्यावर त्यांनी इंग्रजांशी जे तह केले त्यावरून येते.

देवगावच्या तहाने रघुजी भोसल्याने (१) ईस्ट इंडिया कंपनीला ओरिसा प्रांत सोडण्यात. (२) वर्धा नदीच्या पश्चिमेला नि नर्नाळा नि गाविलगड या किल्ल्यांच्या दक्षिणेला असलेला सगळा प्रदेश ब्रिटिश आणि निजाम यांना सोडण्यात आला.

सुरजी अंजनगावच्या तहाने शिंद्याने खालील गोष्टी कबूल केल्या :–

(१) गंगा– यमुना या दोआबात शिद्यांचे जे किल्ले, प्रदेश, आणि अधिकार होते तसेच जयपूर, जोधपूर राज्यांच्या नि गोहदच्या राणाच्या प्रदेशाच्या उत्तरेला जे प्रदेश होते त्यावरचे सर्व अधिकार नि हक्क ईस्ट इंडिया कंपनी आणि तिचे दोस्त यांना कायमचे देण्यात आले.

(२) भडोच नि अहमदनगर हे किल्ले आणि त्यांच्यावर अवलंबून असलेले प्रदेश तसेच अजंठा डोंगरमाळेच्या दक्षिणेकडचा प्रदेश ईस्ट इंडिया कंपनीला सोडण्यात आला.

(३) वरील प्रदेशातले सर्व हक्क, तसेच ब्रिटिश, निझाम, पेशवा नि गायकवाड यांच्या संबंधातले सर्व प्रकारचे दावे सोडण्यात आले.

(४) ब्रिटीश सरकारने आपल्या मांडलिकांशी जे तह केले होते ते सर्व शिंद्याने मान्य केले.

(५) मोगल सम्राट दुसरा शहा आलम याच्यावरचे सर्व हक्क सोडले नि त्याच्या



अनुक्रमणिका

कुठल्याही व्यवहारात हस्तक्षेप न करण्याचे कबूल केले.

दिल्लीच्या मोगल सम्राटावरचे हक्क शिंद्याने सोडल्याने २३ मे १८०५ या दिवशी गव्हर्नर जनरलने त्या सम्राटाच्या नि त्याच्या कुटुंबियांच्या निर्वाहाच्या व्यवस्थेसंबंधी एक हुकूम काढला. या हुकमान्वये दिल्ली शहराजवळच्या नि यमुनेच्या उजव्या काठावरचा एक विविक्षित प्रदेश राजघराण्याच्या निर्वाहासाठी राखून ठेवण्यात आला. परंतु त्या प्रदेशात सम्राटाला स्वामित्वाचे अधिकार नव्हते. केवळ किल्ल्याच्या तटबंदीच्या आतच सम्राटाचे दिवाणी फौजदारी अधिकार चालू राहणार होते. (सरकार – खंड ४ : पृ. ३३३ – ३३५)

जाता जाता हे लक्षात ठेवायला हवे की, दिल्लीच्या सुलतानांना नि मोगल सम्राटांना भारताच्या अंतिम सीमांपर्यंत पोहोचायला .पाचशे वर्षाचा काळ लागला. इतिहासाने मराठ्यांना जेमतेम शंभर वर्षाचा काळ दिला. साहजिकच मराठ्यांना आपले आसन बळकट करता आले नाही किंवा परकीय राज्यांचे तळ उद्ध्वस्त करता आले नाहीत.

**ओपिनिअन मे २३, १९७२.** मूळ लेख इंग्रजीत.

हिंदू देवालयाची विटंबना, त्यातील मूर्तीची मोडतोड त्या मूर्तींना मुसलमानानी दिलेली अपमानास्पद वागणूक, देवालये जमिनदोस्त करून त्या ठिकाणी मशिदी उभारणे या–बाबतचा पुरावा History of India as told by its own Historian या आठ खंडी असलेल्या प्रचंड ग्रंथातून, राष्ट्रवादी लेखकाना उपलब्ध झालेला आहे. ही वस्तुस्थिती अर्थातच कोणीही नाकारणार नाही. हा पुरावा अतिशयोक्त आहे व ब्रिटीश राजवटीचा उदोउदो करण्याकरता हा ग्रंथ केल्याने तो छापला, असे विधान अनेक मान्यवर पंडितानी केलेले आहे व यात प्रख्यात कायदेपंडित श्री. जयंत गडकरी **(नवी क्षितिजेच्या संपादकांचे आणखी एक घनिष्ट मित्र) समाविष्ट आहेत. पुरोगामी विचारांचा झेंडा सदैव खांद्यावर असलेले, विचार प्रवर्तक लिखाण करून त्याच विचारांचा प्रसार करण्यात व त्यासाठी आर्थिक, शारीरिक झीज सोसण्यास सदैव तयार असलेले, (याचसाठी त्यांचा अलीकडे गौरवही करण्यात आला होता)** हे व्यंजनेने लिहिलेले नाही, म्हणून कृपा करून वाचकांनी गैरसमज करून घेऊ नये. 'नवी क्षितिजे'च्या संपादकांनी आपल्या मित्राबद्दल जे काही सांगितले त्यानुसार **श्री. जयंत गडकरी यांनी महाराष्ट्रातील पददलितांसाठी अपार शारीरिक कष्ट, आश्चर्य करावे इतका आर्थिक त्याग, प्रकृतीची हेळसांड, केली आहे. मला हे सारे पटलेले आहे. त्यांचा जो गौरव करण्यात आला होता तो यर्थाथच.** या अशा लेखकाच्या मते, ब्रिटिश राजवटीच्या काळात हिंदुस्थानातील प्रजा, अगोदरच्या मुसलमानी राजवटीपेक्षा किती सुखात होती हे सिद्ध करण्यासाठी हा ग्रंथराज सिद्ध करण्यात आला होता. हा मुद्दा मान्य होण्यास कोणालाही अडचण येणार नाही याचे कारण कोणतीही राजवट आपण ज्या राजवटीची जागा घेऊन सत्तेवर आलो आहोत. त्या राजवटीपेक्षा अधिक सुखदाई व कल्याणकारी आहे हे सांगतेच. विद्यमान काळी सर्वच

राजकीय पक्ष हेच सांगतात. मुद्दा एकच आहे. ग्रंथात अतिशयोक्ती असण्याचा संभव आहे पण असा मजकूर शब्दबद्ध होऊन तवारिखात दाखल झाला. म्हणजे अर्थातच तत्कालीन आम मुसलमान जनतेसाठी तो होता हे **एक. दुसरे** हा मजकूर तवारिखात जेव्हा दाखल करण्यात येत होता. त्याकाळी हिंदुस्थानातील कोणासही ब्रिटिश राजवट येथे येणार आहे याची अजिबात कल्पना नव्हती. म्हणजेच तत्कालीन इस्लामी मनाला सुखदायक वाटणारा, त्यांच्या धार्मिक प्रवृत्तींना आल्हाद देणारा तो वृत्तांत होता असा निष्कर्ष कोणी काढल्यास कोणी सुजाण वाचक त्याला आक्षेप घेणार नाही. (अर्थातच हे 'कोणी' स्वत:ला तथाकथित 'पुरोगामी व सेक्युलर' वाचक मानतात असे मान्यवर सोडून) तथाकथित सेक्युलर मंडळींना हा निष्कर्ष मान्य होण्यास खरे म्हणजे अडचण येता कामा नये. या संदर्भात प्रख्यात सुधारक व पुरोगामी विचारांचे **राजा राममोहन रॉय** यांनी ब्रिटिश राजवट ही प्रगतीशील आहे, आवश्यक सुधारणांच्याकडे आगेकूच करणारी आहे, असे सांगून हा पुरोगामी हिंदू बुद्धीवंत व कष्टाळू सुधारक त्या राजवटीचे स्वागत करीत होता. परंतु तथाकथित सेक्युलर, पुरोगामी आणि अनेक लाल निशाणी डावे **राजा राममोहन रॉय** यांच्या विधानातील शेवटचा भाग अस्तित्वातच नाही असे भासवितात. या भागात राजा राममोहन रॉय यांनी स्पष्टपणे असे सांगितले होती की पराकोटीच्या जुलमी मुसलमानी राजवटीतून ब्रिटिशांनी या हिंदू समाजाची मुक्तता केली होती

पण हा मुद्दा तसा प्रस्तुत नाही. एक वेळ **राजा राममोहन रॉय** यांचे विधान नगण्य मानू या. मुद्दा एकच आहे मुसलमानांना दुष्कीर्त करणाऱ्या ज्या घटना नमूद करण्यात आल्या होत्या, त्या प्रत्यक्षात घडल्या असोत वा नसोत, पण तरीही ते तवारिखकार आपल्या लिखाणात त्या नमूद करीत होते.

एवंच **इलीओट** आणि **डाऊसन** हे लिखाण संकलित करून भाषांतरीत करून का प्रसिद्ध करीत आहेत याबद्दल ते लपवाछपवी अजिबात करीत नाहीत. आपण ज्या राजवटीचे समर्थक अहोत त्या राजवटींचे 'गुलाबी' चित्र रंगविणे हे आपले कामच आहे, असे ते समजत होते व तसे करण्यात ते सामान्यपणे काहीही चूक करीत नव्हते. मुख्य मुद्दा वेगळाच आहे. तो हा आहे की त्या तवारिखांच्या समकालीन व नंतरच्याही इस्लाम धर्मियांना ते लिखाण मंजूर होते की नाही? **प्रा. इअटोन** यांनीच याच लेखात असे नमूद केले आहे की, "starting with the writings of his own contemporary and court poet Firdausi (death AD 1020) Mahamuds career soon became a legend as generations of Persian poets Lionized Mahmud as a paragon of Islamic kingsly virtue celebrating his famous attacks on Indian Temples as models for what other Sultans should do. थोडक्यात **एलीओट** आणि **डाऊसन** यांचे लिखाण ब्रिटिश धार्जिणे आहे, अगर मुळातील त्या पर्शियन भाषेतील लिखाणात अतिशयोक्ती आहे. (पण

त्यात अजिबात तथ्य नाही असे **प्रा. इअटोनही** सांगत नाहीत) हे मान्य जरी केले, तरी **फिरदोसी** आणि त्यानंतरच्य पर्शियन कवीनी ते लिखाण तत्कालीन मुसलमान सुलतान आणि इस्लामी प्रजाजनाना भावत होते म्हणूनच ते केले होते ना? कवी हृदयाचा मनुष्य धर्माच्या नावाखाली लुटालूट, जाळपोळ, मानवी हत्या, स्त्रियांना पळविणे, लोकांना गुलाम करणे, या सर्वास प्रोत्साहन देत होता. त्याबद्दल तथाकथित विद्यमान **सेक्युलर व पुरोगामी लेखक यावर काहीच भाष्य करणार नाहीत का?** हे लिखाण करण्यामागची प्रेरणा इस्लाम– धर्माकडून मिळाली नव्हती, तर मग ती कशापासून प्राप्त झाली होती? ती प्रेरणा मानवता प्रेमी खासच नव्हती.

**एलीएट** आणि **डॉउसन** यांच्या प्रतिपादनात एकंदर तीन मुद्दे आहेत (१) मुसलमान राजवट जाऊन त्यांच्या जागी ब्रिटिश राजवट आली. (२) मुसलमानानी हिंदूवर आनन्वित अत्याचार केले त्यांची देवालये विटंबित केली, वेळप्रसंगी जमीनदोस्त केली व त्या जागेवर मशिदी उभारल्या. (३) ब्रिटिशांची राजवट त्या पूर्वीच्या राजवटीपेक्षा अधिक चांगली आहे. यापैकी पहिला आणि तिसरा मुद्दा **प्रा. इअटोन** यांना मान्य आहे. दुसऱ्याबद्दल लिहिताना त्यांनी म्हटले आहे की तवारिखकारांचे लिखाण मुळातच अवास्तव आहे. बडेजाव मिरविणारे आहे (पण त्यात तथ्य जरुर आहे) त्यापैकी **प्रा. इअटोन** यांनी **मान्यता दर्शविलेला पहिला मुद्दा साफ चुकीचा आहे हे श्री. ज. द. जोगळेकर यांच्या लेखाने यथार्थपणे दाखवून दिले आहे.** दुसऱ्या मुद्याबाबत **प्रा. इअटोन** यांच्या या लेखातच परस्पर विरोधी विधाने कशी आहेत हेही आपण पाहिले. तिसरा जो मुद्दा आहे त्याकडे वळू या. ब्रिटिश राजवट सत्तेवर येण्यापूर्वी किमान पन्नास वर्षे अगोदर मुसलमानी राजवट पार कोसळली होती. शिवाय ब्रिटिशांची राजवट पूर्णत: सत्तेवर आल्यानंतर काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत एकच कायदा एकच प्रशासन व्यवस्था प्रस्थापित झाली होती. उदा. न्यायालयात एकच कायदा सर्वांना, ब्राम्हणाना, दलिताना आणि मुसलमानानाही लागू होता. कायद्यापुढे सर्व समान आहेत हे तत्त्व मान्य होऊन त्याचा अंमल प्रत्यक्षात होत होता. सुमारे ७५० वर्षांच्या मुसलमानी राजवटीत हिंदुस्थानातील भूखंडावर एकछत्री मुसलमानी राजवट कधीही प्रस्थापित केली गेली नव्हती. या संबंधातले विवेचन पुढे येणारच आहे. प्रस्तुत मुद्दा हा आहे की ब्रिटिशांची राजवट या देशात येण्यापूर्वीची बिगर मुसलमानी मराठ्यांची राजवट कशा प्रकारची होती? ती ब्रिटिशांच्या राजवटीपेक्षा अप्रगत होती का? हिंदुस्थानला ती आधुनिकीकरणाकडे घेऊन जाणारी होती का? या संदर्भात अगदी आरंभीच्या काळातील ब्रिटिश राज्यकर्त्यापासून अनेक मान्यवर इतिहासकारांनी साक्ष काढाता येईल. वानगी दाखल तेही अलीकडचे भाष्य देता येते. इ. स. २००१ साली बी. बी. सी. या जगप्रसिद्ध दूरचित्रवाणीवर मारीआ मिश्रा (MARIA MISHRA) यांनी An India Affair या शीर्षकाची मालिका सादर केली होती. मारिया मिश्रा या नामवंत ऑक्सफर्ड विद्यापिठाशी संलग्न असलेल्या (Keble college)

'केबल कॉलेज'मध्ये फेलो व ट्यूटर आहेत. त्यांनी या व्याख्यानात पुढील विधान केले होते "In fact the states (in India) of late 18th century and early 19th century India had not failed at all. India was a dynamic society in which the process of Modernity was already strongly present. This was a society in flux-caste rules were fluid, property was circulating, banking was developing...." **प्रा. इअटोन** या मुद्याला स्पर्शही करीत नाहीत. ते ज्या सुत्राचे प्रतिपादन करणार होते त्याच्याशी हा मुद्दा संबंधित नसेल म्हणून त्यांनी हे केले असावे !

विचाराने मार्क्सवादी आणि व्यवसायाने इतिहासकार असलेल्या प्रा. महंमद हवीब यांचे एक अवतरण प्रा. इअटोन हे आपणास पेश करतात. त्यात प्रा. महंमद हबीव यांनी म्हटले आहे की मुसलमान या देशात सुमारे (about thirty to forty) ! तीस ते चाळीस दशके वास्तव्य करून आहेत. जो इतिहासकार आपली व्यावसायिक जबाबदारी ओळखून 'सेक्युलर' लिखाण करतो त्याचे हे लिखाण असल्याने हे पं. नेहरु यांच्या विचारसरणीच्या राज्यकर्त्यांना ते मान्य असणार हे ओघानेच आले. या विधानात अगदी उघड-उघडपणे गफलत आहे. पुर्वीचा हिंदू असलेला मागाहून 'काही कारणाने' (!) जो मुसलमान धर्मात गेला अशा व्यक्तींच्या संबंधात प्रा. हबीब लिहित होते. त्यांना असे सुचित करावयाचे होते की, आजच्या शांतताप्रेमी (peaceful) मुसलमानांचे पूर्वज हिंदू होते, मग त्यांचे रुपांतर या नव्या पोशाखात (परदेशी, रानटी, देवालयांचे भंजक, गोमांस भक्षकात) होणेच शक्य नाही. गतकाळातील हिंदूकडून कालांतराने 'काही कारणाने' (!) मुसलमान झालेल्या व्यक्तींनी हिंदूकडून वारसा घेतला होता. असे जर असेल, तर या शांतताप्रिय मुसलमानानी– ब्रिटिश राजवटीत व स्वातंत्र्य काळातही नक्कीच शांतताप्रिय न समजल्या जाणाऱ्या अनेक कृती केल्याचे उदा. अल-अक्सा या मशिदीच्या संदर्भात या शांतताप्रिय मुसलमानानी जोरदार निर्दशने केली, बाबरी मशिद पाडल्यानंतर 'शांतताप्रिय निर्दशने' (मिरवणूक, मोर्चा इत्यादी) न करता मुंबईत बॉंबस्फोट झाले. **प्रगतीशील मुसलमान** सोडून बहुसंख्य 'शांतताप्रिय' मुसलमानानी याबद्दल काही प्रतिक्रिया व्यक्त केली नाही. इस्त्रायलने अल-अक्सा मशिदीवर हल्ला केले. या 'शांतता प्रेमी' मुसलमानानी दंगल केली हैद्राबादला व त्यात मेले निरपराध हिंदू तालिबान राजवटीमध्ये बुद्धाचे पुतळे पाडले जात होते, तेव्हाही अल-अक्साच्या धर्तीवर निर्दशने झाली नाहीत. ते त्यावेळेस शांतताप्रिय हिंदूकडून आलेला वारसा जपत असावेत. खिलाफत चळवळ दोन वर्षे जोमात होती, पण केमालपाशाने तुर्कस्थानात ती निकालात काढल्यानंतर, हा अल-अक्साबाबत निर्दशने करणारा मुसलमान व त्याला प्रोत्साहीत करणारे जे कोणी असतील ते सारे सुमारे तीस ते चाळीस शतकापूर्वीच्या हिंदू पूर्वजाप्रमाणेच शांतताप्रिय राहिले. अशा प्रकारची आणखीही उदाहरणे देता येतील. मुद्दा एकच आहे. 'शांतताप्रिय' मुसलमानाला हिंदू पूर्वजांचा हा जो वारसा होता त्याचा विसर

त्याला पडल्यामुळे, त्याचे जे मानसिक परिवर्तन झाले होते त्यात जो 'नवा पोशाख' त्यांच्यावर चढविण्यात आला होता. याचा वाटा किती होता? याचे विवेचन विचाराने मार्क्सवादी व व्यवसायाने नामवंत इतिहासकार **इरफान हबीब** करीत नाहीत. यात आश्चर्य करण्यासारखे काहीही नाही. **प्रा. राबर्ट इअटोन** यांच्यासारखा साक्षेपी व विचक्षण इतिहासकार याबद्दल एकही प्रश्न उपस्थित न करता, वेगळ्याच दिशेने आगेकूच करतो, याचेही आश्चर्य वाटत नाही, याचे कारण त्यांचा पूर्वग्रह आपणास परिचित झाला आहे.

**प्रा. राबर्ट इअटोन** असे बजावतात की "In reality...each scrap of evidence requires scrutiny" पुरावा म्हणून सादर केलेली माहिती अगदी सूक्ष्मात जाऊन तपासली पाहिजे. त्यांचे हे सांगणे योग्यच आहे. पण खरे म्हणजे त्यांची तक्रार वेगळीच आहे. भारतीय राष्ट्रवादी आपल्याला सोईस्कर असलेला पुरावा, आपल्या प्रतिपादनाच्या समर्थनार्थ तवारिखकारांचे जे लिखाण आहे, त्यातून वेचून काढून सादर करतात, असे त्यांचे मत आहे. त्यांनी उपस्थित केलेला मुद्दा योग्यच आहे. पण त्यात दोन वेगळेच मुद्दे अनुस्यूत आहेत **एक** राष्ट्रवाद्यांनी सादर केलेला पुरावा त्यांनी 'तयार' केलेला नाही. **दोन एलीओट** आणि **डाऊसन** यांनी जो पुरावा आठ खंडातून सादर केला आहे, भले तो ब्रिटिश राजवटीच्या समर्थनार्थ असेल – त्याची सूक्ष्मात जाऊन तपासणी **इरफान हबीब** सारखी मार्क्सवादी विचारांची प्रगतीशील व व्यवसायाने इतिहासकार असलेली मंडळी का बरे करीत नाहीत? खरे म्हणजे **प्रा. इअटोन** यांनी हा प्रश्न उपस्थित करावयास हवा होता. हेच दुसऱ्या एका प्रगतीशील व पेशाने व्यावसायिक इतिहासकार रोमिला थापर यांचेही आहे. त्यांनीही हे काम केल्याचे ऐकीवात नाही. या दोन मान्यवर व त्यांच्यासारख्या अनेक मान्यवर व्यावसायिक इतिहासकारांनी तशी तपासणी करून, त्या आठ खंडातून सादर केलेला पुरावा हा किती अतिशयोक्त वा चुकीचा आहे हे सिद्ध केले असते, तर मग राष्ट्रवादी लेखकांना ते लिखाण पुरावा म्हणून वापरताच आले नसते. इतकी वर्षं होऊन गेली तरी त्या लिखाणाची सूक्ष्मात जाऊन तपासणी झालेली नाही, हे लक्षणीय आहे. खुद्द **प्रा. इअटोन** हे आपले ज्ञान वापरून, ही अशी तपासणी करण्याचा प्रयत्न तरी करीत आहेत का?

धार येथील कबर-तीर्थस्थानाच्या दरवाज्यावर खोदलेल्या मजकुराबद्दल भाष्य करताना **प्रा. इअटोन** यांनी फारच पिष्टपेशन केलेले आहे. राष्ट्रवादी लेखक फक्त एवढेच सांगतात, त्या ठिकाणी पूर्वी असलेले देवालय जमीनदोस्त करून तेथे या कबरतीर्थस्थानानी उभारणी करण्यात आली. राष्ट्रवाद्यांच्या दृष्टीने एवढाच मुद्दा प्रस्तुत आहे. गमतीचा भाग हा आहे की, **प्रा. इअटोन** हा मुद्दा मान्य करतात. त्यानंतर विषयांतर करून बरेच पिष्टपेशन करतात. एवंच सादर करीत असलेले सूत्र विचारात घेता त्यांनी त्या संबंधात जे काही सांगितले आहे ते कमालीचे अप्रस्तुत आहे.

**प्रा. इअटोन** असे म्हणतात की **गझनीच्या महंमदाने** केवळ संपत्तीसाठी देवालयांची

लुटालूट केली. या संदर्भात मराठी भाषेतील मान्यवर इतिहासकारांची साक्ष आपण काढणार आहोत. **रियासतकार सरदेसाई** यांच्या **'मुसलमानी रियासत'** या ग्रंथात पुढील नोंद आहे. "मंहमूद (सोमनाथ देवालयातील) थेट गाभाऱ्यात गेला, मूर्ती नऊ फूट उंचीची होती. ब्राम्हणानी नाना तऱ्हेच्या विनविण्या करून सांगितले **'तुम्ही मूर्तीस हात न लावाल तर सोन्याच्या राशी आम्ही देण्यास तयार आहोत'.** मंहमद बोलला,'मूर्ती विकणारा' (बलफरोश) अशा किर्तीपेक्षा, ती फोडल्याची (बुदशिकन) किर्ती मला जास्त प्रिय आहे'. नंतर सोटा मारून त्याने ती मूर्ती फोडली. (मुसलमानी रियासत खंड १ पृष्ठ ६८ नवी आवृत्ती इ. स. १९९२) रियासतसार सरदेसाई यांनी हे गझनीच्या मंहमदाचा स्विस चिटणीस **उतबी** (UTBI) याच्या लिखाणातून उपलब्ध झालेल्या पुरावा वापरून हे विधान केलेले आहे. **प्रा. इअटोन** यांनी असे विधान केले आहे की *"while Hindu Nationalist..... have endeavored to document a pattern of wholesale temple destruction.....few professional Historians have engaged the issue even though it is a properly historical one"* भारतातील 'व्यावसायिक इतिहासकार' लक्षात घेता प्राध्यापकांच्या या विधानाशी कोणीही सहमत होईल. पण या इतिहासकारानी या प्रश्नाकडे दुर्लक्ष कां केले असावे याचा शोध ते घेत नाहीत. तो जर त्यांनी घेतला असता, तर त्यांना असे आढळून आले असते की, असा शोध घेणे, हे त्या व्यावसायिक इतिहासकारांना फारच अडचणीचे गैरसोईचे आहे. त्यांची आपल्या स्वत:च्या तथाकथित – 'सेक्युलर' – विचारांशी जी बांधिलकी आहे, ती लक्षात घेता, त्यांना जे प्रश्न टाळण्याची इच्छा आहे अशा अनेक प्रश्नांना त्यांना सामोरे जावे लागले असते. उदा. **प्रा. इअटोन** यांनी आपल्या सूक्ष्म तपासणीनंतर मुसलमान बादशहा, सुलतान व त्यांचे सेनापती यांनी हिंदू देवालयांची विटंबना करणे, त्यातील मूर्ती फोडणे, वेळ प्रसंगी ती जमीनदोस्त करणे, ती लुटणे हा पराक्रम करून पर्यायाने इस्लामची जी 'सेवा' केली त्याची दखल घेऊन, त्या कृत्यामागच्या विचारसरणीची त्यांना समिक्षा करावी लागली असती. या तथाकथित सेक्युलर पुरोगामी व मार्क्सवादी विचारवंतांना नेमके हेच करण्याची इच्छा नाही. **या प्रश्नाबाबत प्रा. इअटोन यांनी फार परिश्रम घेऊन केलेले विश्लेषण व विवेचन याच्याशी सर्वस्वी सहमत होता आले नाही, तरी ते अत्यंत मोलाचे आहे.**

व्यावसायिक इतिहासकार **रोमिला थापर** यांनी मुसलमानानी देवालये जमीनदोस्त केली हे मान्य करतात. पण त्याजबरोबर हिंदू राजानीही देवालये विटंबित केली होती त्याचे काय? असा प्रतिसवाल उपस्थित करून, तो प्रश्न निकालात काढतात. समाजवादी पुढारी **कै. मधु लिमये** यांनी याच मार्गाचा अवलंब केला होता. पण ही देवालये कोणती हे त्यांनी सांगितले नव्हते. इतिहासकार **रोमिला थापर** यांनी चार देवालयांचा निर्देष केला होता. **प्रा. इअटोन** यांनी सादर केलेली संख्या त्याहून चांगलीच जास्त आहे. मुसलमानानी या प्रकारची वागणूक





अनुक्रमणिका

दिलेल्या देवालयांची प्रचंड संख्या एका बाजूला, आणि हिंदू **राजांनी हिंदूंची** देवालये विटंबित केल्याची नगण्य संख्या दुसऱ्या बाजूला या दोन संख्यात इतकी प्रचंड तफावत असण्याचे कारण काय असावे? या तपशीलात जाण्याचे हे व्यावसायिक इतिहासकार कटाक्षाने टाळतात. **प्रा. इअटोन** यांनी ही तफावत इतकी प्रचंड का आहे, याचे स्पष्टीकरण देण्याचा आपल्या परीने प्रयत्न केला आहे. **प्रा. इअटोन यांच्या लेखातील आणखी एक विशेष म्हणजे कधी काळी कोठेतरी हिंदूनीही मशिदी जमिनदोस्त केल्या होत्या. याबद्दल पुरावा ते सादर करतात.**

**प्रा. इअटोन** यांच्यापुढे आणखी एक अडचण आहे. भारतीय राष्ट्रवादी जमीनदोस्त करण्यात आलेल्या हिंदू देवालयांची संख्या अडसष्ट हजार आहे असे ते सांगतात. पण **प्रा. इअटोन** यांना हा आकडा अतिशयोक्त वाटतो पण तो नेमका किती हे त्यांना सांगता येत नाही. शिलालेख, इतर इतिहास विषयक कागदपत्र वापरून त्यांनी जमिनदोस्त करण्यात आलेल्या अथवा विटंबित करण्यात आलेल्या देवालयांची संख्या ८० (ऐंशी) आहे असे म्हटले आहे. म्हणूनच मुसलमान तवारिखकारांनी नोंदविलेली अडसष्ट हजार आणि आपण नेमकी केलेली ८० या संख्येतील प्रचंड तफावतीचे स्पष्टीकरण देताना ते म्हणतात "undoubtelly some temples were desecrated but facts in the matter were never recorded or facts were recorded but the records no longer survive. Conversly Indo-Muslim chroniclers seeking to glorify the religious zeal of earlier Muslim Rulers, sometimes attributed acts of temple desecration to such rulers even when no contemporary evidence supports such claim" थोडक्यात लेखकाने आपल्या पुढे असलेल्या पेचप्रसंगातून फारच सफाईदारपणे मुक्तता करून घेतली आहे.

उदारमतवादी मुसलमानांपुढे नेहमीच एक पेच असतो. उदा. मंहमद गझनीने केलेल्या दुष्कृत्यांचे ती इस्लामला मंजूर आहेत या स्वरूपात त्यांचे समर्थनही त्यांना करता येत नाही पण त्याजबरोबर हिंदुस्थानात इस्लामला पाय रोवण्यास सहाय्यभूत झालेल्या पराक्रमी मुसलमान सेनापतीला दोषीही ठरविता येत नाही. त्यातून सुटका करून घेण्याचा विद्यमान काळातील भारतीयाना सुपरिचित असलेला राजमार्ग हे उदारमतवादी मुसलमान स्विकारतात. उदा. पं. नेहरू, सज्जन, दूरदर्शी, प्रामाणिक धोरणी नेते व पंतप्रधान, पण त्यांच्या अवती–भोवतीचे लोक चुकीचे. चीन बरोबरच्या युद्धात भारताची नाचक्की पं. नेहरूंचे सल्लागार कृष्ण मेनन यांच्यामुळे झाली. पण हे एकीकडे सांगताना दिल्लीतील एका रस्त्याला त्यांच्या कर्तृत्वाचा गौरव करण्यासाठी त्याचे नाव देण्यात आलेले आहे. याच चालीवर **भोळ्या गझनीच्या मंहमदाला त्यांचे** fanatiocal bigots असे जे सल्लागार होते, त्यांनी **गझनीच्या मंहमदाला** चुकीचे मार्गदर्शन केल्याकारणाने **गझनीच्या मंहमदाने** ही दुष्कृत्ये

केली ! मोगल बादशहा अकबर यांच्या पंतप्रधानांचे हे प्रतिपादन आहे !

**प्रा. इअटोन** मोगल बादशहा औरंगजेब यांची, आपण जे सूत्र मांडीत आहोत त्यासाठी असेल कदाचित, फारच भलावण करतात. गोळाबेरजेने सांगावयाचे झाल्यास औरंगजेबाबद्दल आक्षेप घेणारे लोक, त्याने काढलेले हुकूम मुळात काय आहेत हे त्या आक्षेपकाना माहीत नसतात, म्हणून ते आक्षेप घेतात असे ते सांगतात. औरंगजेबाबद्दल रियातकार सरदेसाई यांनी येणेप्रमाणे भाष्य केले आहे. औरंगजेबाच्या कारकीर्दीत "इ. स. १६६९ हे वर्ष हिंदूच्या छळाचा पहिला आरंभ होता. त्यावर्षी त्यास अशी खबर लागली की बनारस आणि इतर ठिकाणचे ब्राम्हण आपला धर्म मुसलमानांनाही शिकवित आहेत. हिंदूचा छळ करण्यासाठी हे निमित्त त्यास आयतेच सापडले. लगेच त्याने बनारस येथील हिंदू धर्माध्यक्षांची नेमणूक बंद करून इ. स. १६६९ च्या ९ एप्रिल रोजी सर्व राज्यात असा हुकूम फर्माविला की हिंदूच्या पाठशाला, देवालये वगैरे सर्व जमिनदोस्त करावीत व त्यानुसार इ. स. १६६९ च्या ऑगस्ट, सप्टेंबर महिन्यात काशी येथील **विश्वनाथाचे** मंदिर जमिनदोस्त झाले. तसेच बुंदेलखंडचा राजा, नरसिंह देव याने मथुरा येथे तेहतीस लाख रुपये खर्चून **केशवाचे** भव्य मंदिर बांधले होते. ते इ. स. १६७० च्या जानेवारीत पाडून तेथील मूर्ती आग्र्यास आणिल्या आणि त्या मशिदीच्या पायऱ्या खाली पुरून टाकील्या.... काठेवाडातील सोमनाथाचे मंदिर पुनरपि पाडून टाकण्यात आले.' **(या घटनेचा उल्लेख प्रा. इअटोन यांनी केलेला नाही)** **विश्वनाथाचे** देवालय आणि **केशवाचे** देवालय औरंगजेबाने का जमिनदोस्त केले, याचे स्पष्टीकरण **प्रा. इअटोन** देतात, पण सोमनाथाच्या मंदिराचा उल्लेखही करीत नाहीत. म्हणजेच इ. स. १६६९ च्या एप्रिल मध्ये काढलेल्या हुकुमाचा अर्थ बहुसंख्य भाष्यकार लावतात त्यात थोडे फार तथ्य आहे. हे **प्रा. इअटोन** यांना मान्य करण्यास अडचण पडू नये. इ. स. १६६९ च्या एप्रिल मध्ये काढलेल्या हुकुमासंबंधी **प्रा. इअटोन** असे म्हणतात की 'The order did not state that school or places of worship be demolished, but rather that they may be **subject** to demolition implying that local authoritics were required to make investigations before demolition' येथे **प्रा. इअटोन** असे गृहित धरीत आहेत की (सरंजामदारी) शासनातील स्थानिक अधिकारी नि:पक्षपातीपणे आपला अहवाल तयार करतो. विद्यमान भारतात तरी असे गृहित धरणे फारच कठीण आहे. याचे कारण लोकशाही राजवटीतही, न्यायालयाचे संरक्षण असूनही प्रशासनातील स्थानिक अधिकारी आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याला खूष करण्याकरिता, किती भयानक बेकायदेशीर कृत्ये करावयास तयार असतात याचा अनुभव भारतीयांना पदोपदी येतो. भारत हा सरंजामदारी अवस्थेत अजूनही आहे हे त्याचे कारण आहे असे सांगण्यात येते. **औरंगजेबाची** राजवट ही निखालसपणे सरंजामदारी होती. **रियासतकार सरदेसाई** यांनी औरंगजेबाबद्दल लिहिताना म्हटले आहे. "त्याच्या अत्यंत अविश्वासी स्वभावामुळे लोकास



अनुक्रमणिका

सचोटीने काम करण्याची उमेद राहत नसे. त्याचे अमंलदार केवळ यंत्रासारखे बनले. त्यांची स्वगत हुशारी बाहेर येण्यास अवकाश राहिला नाही.'' थोडक्यात इ. स. १६६९ च्या एप्रिल महिन्यात काढलेल्या हुकुमाचे स्पष्टीकरण देताना **प्रा. इअटोन / औरंगजेबाला** फारच झुकते माप घालीत आहेत, हाच निष्कर्ष काढावा लागतो.

येथवर **प्रा. इअटोन** यांच्या लेखातील जो न पटणारा भाग आहे. त्याबद्दल चर्चा झाली. देवालयांची विटंबना केली जाणे अथवा वेळप्रसंगी ती जमिनदोस्त केली जाणे, याबद्दल **प्रा. इअटोन** यांनी जे सूत्र मांडले आहे ते आता विचारात घेऊ या. **प्रा. इअटोन** यांनी मांडलेल्या सूत्राची स्थूलमानाने रूपरेषा पुढीलप्रमाणे आहे. प्रत्येक हिंदू कुटुंबाची, राज्यकर्त्याची, एखाद्या प्रदेशाचीही एक कुलदेवता असते. म्हणूनच राज्य करणाऱ्या घरण्याचेही कुलदैवत असते हे ओघानेच आले. सामान्यपणे एकाच देवालयात या देवतांची प्रतिष्ठापना केलेली असते. राजाचा अंमल ज्या प्रदेशावर असतो. त्यातील प्रजाजनांची अशी श्रद्धा असते की त्या देवतांची कृपा राजावर जोवर आहे तोवर राज्यात सर्व काही आलबेल असेल. राज्याची भरभराटही होईल. परंतु यदाकदाचित् प्रजेला कसलाही त्रास होऊ लागला, तर त्याचा अर्थ या देवतांचा राजावर काही कारणाने कोप झाला आहे असे समजण्यात येत असे. या देवता त्या प्रदेशाच्या त्या राजघराण्याच्या आणि त्या राज्याच्या प्रजाजनांच्या रक्षणकर्त्या होत्या. या श्रद्धेची दुसरीही एक बाजू अशी होती की या देवतांचा राजावर जोवर वरदहस्त आहे तोवरच त्या राजाला राज्य करण्याचा अधिकार आहे, जेव्हा केव्हा ही कृपा नाहीशी होईल तेव्हा राजाने राज्य करण्याचा आपला अधिकार गमाविला आहे व त्याची राजवट अवैध आहे, असे समजले जात होते. या कारणामुळे एखाद्या राजाचा पराभव झाल्यानंतर त्या राज्यावर स्वारी करून येणारे जे कोणी असतील मग ते हिंदू असोत वा मुसलमान असोत, ते या देवतांची प्रतिष्ठापना ज्या देवालयात झालेली आहे अशा राजाश्रय असलेल्या देवालयाची विटंबना करीत वा वेळप्रसंगी ती जमिनदोस्त करीत, स्वारी करून येणारे मुसलमान अर्थातच हिंदूपेक्षा वेगळे वर्तन करीत हेही **प्रा. इअटोन** यांनी नमूद केले आहे. हिंदूंचे वर्तन सामान्यपणे देवालयातील मूर्ती पळविण्याइतकेच मर्यादीत होते. ही कृती केल्याने, राज्यावर असलेल्या राजाचा व त्या राजघराण्याचा अधिकार निकालात निघत असून येणाऱ्या नव्या राजवटीला वैधत्व प्राप्त होण्याला संधी मिळणार होती. **प्रा. इअटोन** यांनी हिंदू राजे व मुसलमान सुलतान बादशहा या दोघांनी केलेल्या या अशा प्रकारच्या कृत्यांची नोंद घेऊन त्याचे विश्लेषण केले आहे. त्यात हिंदूची उदाहरणे फारच कमी आहेत. याचे कारण **प्रा. इअटोन** याना आणखी उदाहरणे आढळली नाहीत. पण त्यांनी दिलेली संख्या भारतीय 'सेक्युलर' व्यावसायिक इतिहासकारांनी उद्धृत केलेल्या उदाहरणापेक्षा जास्त आहे. यावरून **त्यांनी हे सूत्र बसविताना किती सखोल अभ्यास केला होता याची** कल्पना येते. मुसलमान बादशहा सुलतान व त्यांच्या पदरी असलेले सेनापती यांची त्यांनी

वर्गवारी येणेप्रमाणे केलेली आहे. (१) हिंदुस्थानच्या सीमेपलीकडून येणारे परकीय मुसलमान त्यांना फक्त संपत्ती लुटणे, स्त्री-पुरुषाना गुलाम करून आपल्या देशात नेणे एवढ्याच गोष्टी करण्यात 'दिलचस्पी' होती. **प्रा. इअटोन** यांचे हे प्रतिपादन सामान्यपणे योग्य असेल. पण गझनीच्या मंहमदाच्या उदाहरणावरून असे ध्यानात येते की देवालयातील संपत्तीची लूट करण्यामागे, आपल्या स्वदेशातील राज्याचा योगक्षेम चालावा एवढा **एकच** हेतू नव्हता, त्याजबरोबर इस्लाम धर्माच्या आज्ञेचे पालन करणे हाही हेतू होता. म्हणूनच ते देवालयातील संपत्तीची फक्त लूट करून थांबत नव्हते. वेळप्रसंगी ती विटंबित करीत, त्यातल्या मूर्तींची मोडतोड करीत व काहीवेळा ती जमिनदोस्त करीत. **प्रा. इअटोन** यांनी असेही सांगितले आहे की सर्वच स्वारी करून येणाऱ्यांना मूर्तींची मोडतोड करणे, वा देवालय जमिनदोस्त करणे जमत नसे याचे कारण त्यांनी स्वत:च सांगितले आहे. 'प्राप्त परिस्थिती अनुकूल आहे असे न वाटल्या कारणाने' तो संयम दाखविण्यात येत होता. (२) परकीय मुसलमानांपैकी जे हिंदुस्थानावर राज्य करण्याच्या उद्देशाने येथेच राहिले. तेही देवालयांची लूट करीत, ती विटंबित करीत, व वेळप्रसंगी जमिनदोस्तही करीत. परंतु हे करताना, येथल्या प्रजेच्या भावनांचा, आपल्या स्वत:च्या धर्माच्या आज्ञा सामान्यपणे बाजूला ठेवून, त्यांना विचार करणे भाग पडत असे. या कारणाने देवालयातील मूर्ती नष्ट करण्याबाबत जी **'धर्माज्ञा'** होती ती त्यांना तात्पुरती बाजूस ठेवावी लागत होती. **प्रा. इअटोन** यांनी हा जो दुसरा विभाग सांगितला आहे त्यातही ते दोन भाग करतात. (अ) एखादी मुसलमानी राजवट जाऊन दुसरी एखादी मुसलमान राजवट येई. अशा वेळी देवालये विटंबित करण्याचा प्रश्न उपस्थित होत नव्हता. ही पहिली राजवट इस्लाम धर्मातील चिस्ती पंथाच्या एखाद्या विशिष्ट शेखच्या कृपाछत्राखाली असे. परंतु विजयी सुलतान या चिस्ती शेखाचे जे स्थान असे, त्याला हात लावत नसे. याउलट तो त्याच्या भजनी लागत असे. हे असे का होत असे याचे स्पष्टीकरण **प्रा. इअटोन** देत नाहीत. (**औरंजेबासारख्या** इस्लाम धर्माच्या शिकवणूकीबाबत अगदी काटेकोर असलेला बादशहा 'अल्ला' शिवाय कोणालाही मानीत नसे. (म्हणूनच अल्लाच्या कृपेव्यतिरिक्त आणखी एका कोणा महात्म्याच्या कृपेने राजवट स्थिरावते वा यशस्वीही होते हे मुसलमान सुलतान मानणे हा हिंदू धर्माचा परिणाम होता का? अर्थात हिंदूची आपल्या कुलदेवतांवर असलेली श्रद्धा आणि चिस्ती शेखावर असलेली मुसलमानांची श्रद्धा यात फरक जरूर आहे मुद्दा एकच आहे **प्रा. इअटोन** एरवी अनेक उप-मुद्यांचे सखोल परिक्षण करतात पण या मुद्याला ते हात घालत नाहीत. कदाचित देवालयांची विटंबना या प्रश्नांशी तो संबंधित नाही असे त्यांचे म्हणणे असावे. **(ब)** हिंदुस्थानात जन्माला आलेल्या मुसलमानांच्या ज्या राजवटी होत्या. त्यांचा विस्तार त्या काळच्या स्वतंत्र्य हिंदू राजांचा पराभव करून झाला होता. या कारणामुळे पहिल्या भागापेक्षा या विभागामध्ये अधिक देवालये विटंबित / जमिनदोस्त करण्यात आल्याचे आढळते. **(क)** अशा एखाद्या मुसलमानी



अनुक्रमणिका

सत्तेचं साम्राज्य प्रस्थापित होऊन स्थिरस्थावर झाल्यानंतर, आपल्या नोकरीत असलेले जे हिंदू मांडलीक होते. त्यांनी बंडखोरी केली तरच मांडलीकाची श्रद्धा व राजाश्रय असलेल्या देवालयावर हल्ला करून ती विटंबित केली जात होती. **प्रा. इअटोन** यांचे हे प्रतिपादन सर्वस्वी बरोबर नाही हे या पूर्वीच उद्धृत केलेल्या उताऱ्यावरून स्पष्ट होते. औरंगजेबाने **सामेनाथाचे** देवालय जमिनदोस्त केले, ही त्याची कृती **प्रा. इअटोन** यांनी मांडलेल्या सूत्रात बसत नाही. त्यांच्या कृत्याचे स्पष्टीकरण त्याच्या धर्माची जी शिकवण आहे असे तो मानीत होता, त्यावरूनच मिळते. मग यावर असा मुद्दा कोणी उपस्थित करील की असे जर होते, तर मग अशा काळातही हिंदू देवालये बांधली जातच होती. शिवाय इतक्या प्रचंड प्रमाणात तत्कालीन हिंदू देवालये आपण अजूनही पहातो ते कसे या प्रश्नाचे उत्तर **प्रा. इअटोन** यांनी आपल्या लेखातच दिले आहे. त्यांनी म्हटले आहे. "If the idea of conguest became........what happened once the land and the subjects of those enemies were integrated into an Indo-Muslim state? On this point the data is quite clear : **Praqamitism as well as time hounoured traditions of Islamic-Indian statecrafit dictated that temples lying within such states be left unmolested**" हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास मुसलमान राज्यकर्ते एखादे देवालय विटंबित करावयाची की जमिनदोस्त करावयाचे याचा निर्णय 'Reasons of state' (थोडक्यात आपल्या राजवटीचे हित कशात आहे) हे लक्षात घेऊन करीत असत.

या संदर्भात आणखी एक मुद्दा लक्षात घेणे आवश्यक आहे. सर्वसामान्य वा तथाकथित मान्यवर पंडितही असे समजत की (नवी क्षितिजेच्या संपादकाचे घनिष्ट स्नेही **श्री. जयंतराव द. जोगळेकर** हा एकमेव सन्मानीय अपवाद) मुसलमान हिंदुस्थानावर स्वारी करीत आल्यानंतर त्यांनी आपली राजवट सर्व हिंदुस्थानावर प्रस्थापित केली, देवालये विटंबित / जमिनदोस्त केली. एंवच हिंदू धर्मियांना हालचाल करण्यासाठी काहीही जागा नव्हती. हा समज वरवर पाहता योग्यच वाटतो. याचे कारण मुसलमान इतिहासकार आणि **मराठ्यांचा** पराभव करून आलेले ब्रिटिश राज्यकर्ते यांनी बुद्धीपुरस्सर पसरविलेला तो गैरसमज आहे. ही गैरसमजूत आज घडीलाही आहे. केंब्रिज व काही नामवंत विद्यापिठात ज्ञानज्ञाचे (?) काम करणाऱ्या काही शिक्षकांच्या मनात आजमितीलाही ही गैरसमजूत घर करून आहे. विशेषत: त्यातले काही मुस्लीम प्राध्यापक असा युक्तीवाद अजूनही इ. स. २००० नंतरही करतात की ब्रिटिशांनी मुसलमानांकडून सत्ता घेतली, ती त्यांनी वास्तविक मुसलमानांना परत करावयास हवी होती. पण हिंदूच्या भूलथापाना आणि ब्रिटिश सरकारच्या हिताचे संरक्षण करणारा त्यांना जो प्रिय असलेला राजकीय विचार लोकशाही त्याला बळी पडून त्यांनी हे राज्य हिंदूच्या हवाली केले. हा समज किती निखालसपणे चुकीचा आहे हे यापूर्वी **श्री. ज. द.**

**जोगळेकर** यांचा जो लेख उद्धृत करण्यात आलेला त्यावरून अगदी नि:संदिग्धपणे दाखवून दिलेले आहे.

एका वेगळ्या दृष्टीकोनातून या तत्कालीन (म्हणजे ब्रिटिश या देशात येण्यापूर्वी काही शतके) हिंदुस्थानात काय परिस्थिती होती याचा विचार करू या. काश्मिरपासून कन्याकुमारी पर्यंत ब्रिटिशानी जशी एकछत्री,एकच कायदा, एकाच प्रकारची शासनव्यवस्था हिंदुस्थानच्या कानाकोपऱ्यातही लागू असलेली आणि त्याची अगदी काटेकोरपणे अंमलबजावणी करून घेण्यात यशस्वीपणे दक्ष असलेली राजवट मुसलमान राज्यकर्ते प्रस्थापित करण्यात व अंमलात आणण्यात कधीही यशस्वी झाले नाहीत. त्यांच्या ते कुवती पलीकडचे होते. प्रत्येक बादशहाची वा सुलतानाची राजवट अस्थिरच होती. या राज्यकर्त्यांच्या अंमलाखालील असलेल्या प्रदेशातील कोणत्या कोणत्या भागात उठाव होताच. ते उठाव मोडून काढणे मुसलमान राज्यकर्त्यांना सोपे जात नव्हते. यासंबंधी **प्रा. इअटोन** यांच्या लेखातच उदाहरण आहे. उदा. नकाशा २ व क्रमांक ४० या संदर्भात यांनी केलेले वर्णन वाचावे. एका सामान्य किल्लेदाराचा पराभव करण्यासाठी बहामनी राज्याचा सुलतान, आपल्या सैन्यानिशी त्या किल्ल्यावर चाल करून गेला तब्बल सहा महिने वेढा देऊन, मुक्काम केल्यानंतर, मगच त्या किल्लेदाराचा पराभव करणे शक्य झाले ही घटना इ. स. १४७८ सालची म्हणजे मुसलमानानी हिंदुस्थानात प्रवेश केल्यानंतर राजवटी स्थापन केल्यानंतर सुमारे पाचशे वर्षानंतर. मोगल बादशहा औरंगजेब मराठ्यांचा पराभव करण्याकरिता स्वारी करून जाण्यापूर्वी बादशहाला अपमानास्पद वाटत होता असा तह बंड करून उठलेल्या रजपूतांबरोबर करणे भाग पडले होते. रियासतदार सरदेसाई यांनी या सर्वच घटनेचे वर्णन पुढील शब्दात केले आहे "..... मराठ्यावर चाल करून जाणे अपरिहार्य झाले. शिवाजी-प्रमाणेच त्याला संभाजीची अतोनात भिती वाटत होती. तेव्हा कशाही प्रकारे तह करून रजपूत प्रकरण मिटविण्यासाठी त्यास उत्कंठा लागली. **पण आपण होऊन तहाची गोष्ट काढणे लाजिरवाणे असल्याने बिकानेरचा शामसिंह** उभय पक्षांचा दोस्त होता त्याचे मार्फत हे घडवून आणले." ही घटना इ. स. १६८१ च्या जून महिन्यातील म्हणजे मुसलमानानी हिंदुस्थानात प्रथम आक्रमक म्हणून व मागाहून राज्यकर्ते झाल्यानंतर सुमारे सातशे वर्षानंतर.

तत्कालीन राजकीय परिस्थितीत कोणते घटक महत्त्वाचे आहेत व त्यातले नेमके कोणते घटक हजर असले अथवा गैरहजर असले मग मुसलमान राज्यकर्ते देवालये विटंबित करीत वा जमिनदोस्त करीत हा खरा प्रश्न आहे. **प्रा. इअटोन** यांनी नेमके हेच स्पष्ट केलेले नाही. त्यांनी मांडलेल्या सूत्राबद्दल जे विवेचन केलेले आहे. त्यातील ही मोठीच त्रुटी आहे. त्याचे असे आहे की देवालय विटंबित केले तर त्यावेळची 'राजकीय परिस्थिती' मुसलमान राज्यकर्त्याला 'अनुकूल' होती. ते केले गेले नाही तर 'राजकीय परिस्थिती अनुकूल नव्हती.'



अनुक्रमणिका

या बाजूकडून त्या बाजूला उडी मारण्याची सोय या 'तत्कालीन राजकीय परिस्थिती' या कारणात आहे.

हे असे जरी असले तरी 'राजकीय परिस्थिती' हा मुद्दा महत्त्वाचा आहे. त्याचे साधे कारण असे आहे की लुटालूट करावयास येणारा वा प्रदेश पादाक्रांत करण्यास स्वारी करून येणाऱ्या सैन्याला वा सेनापतीला आपणास मूळ ठिकाणावर सुस्वरूप पोहचायचे आहे याचे भान ठेवावयास लागते, याचे कारण परतताना अनंत अडचणीना सामोरे जावे लागेल याची कल्पना व जाणीव चतुर सेनापतीला नेहमीच असावी लागत होती. हा मुद्दा लक्षात न घेणारे लोक **गझनीच्या मंहमदाला** देवालये विटंबित करणे, मूर्तीभंजन करणे, गुलाम करून अनेक स्त्री-पुरुष आणि कारागिर स्वगृही घेऊन जाणे या दुष्कृत्यांबद्दल त्याला दोषी ठरवितात. पण **गझनीचा मंहमद हिंदुस्थानवर** बारा वेळा स्वारी करून आला याचा अर्थ प्रत्येक खेपेस आपणास सुखरूप परत जावयाचे यांचे त्याला चांगले भान होते, हे लक्षात घेत नाहीत. त्याची ही **चतुराई लक्षात घेऊन,** पं. नेहरू त्याचा फार चतुर, व कर्तबगार सेनापती म्हणून गौरव करतात ! पानपतच्या युद्धात मराठ्यांचा पराभव झाल्यानंतर लुटालूट करण्यात फारसा वेळ न दवडता **अहमदशहा अब्दाली** स्वगृही परतला व पुन्हा परत तो केव्हाही आला नाही. याचे कारण तो विजय प्राप्त करून घेण्यासाठी त्याला फार प्रचंड किंमत मोजावी लागली असावी. शिवाय परत जाताना, त्याला कोणत्या प्रसंगातून जावे लागले असेल याचे वर्णन तवारिखकार साहजिकच करीत नाहीत. पण हिंदुस्थानातील लोकसमजुतीत त्याबद्दल पुरावा उपलब्ध आहे. उदा. तो परत जाताना त्याच्या सैन्यावर ठिकठिकाणी हल्ले केले जात होते. याचे वर्णन लोकगीतात वा आख्यायिकात आढळते. एवंच 'राजकीय परिस्थिती' हा मुद्दा महत्त्वाचा आहे. पण **प्रा. इअटोन** यांना अभिप्रेत असलेले घटक त्यांनी नमूद केलेले नाहीत हेच अधोरेखित करण्यासाठी एवढा हा लेखन प्रपंच.

आणखी एका वेगळ्या दृष्टीकोनातून मुसलमानी राजवटीचा हिंदुस्थानातील प्रसार व त्याच्या अनुषंगाने होणारी देवालयांची विटंबना याकडे पहाता येते. प्रेषित मंहमद पैगंबरवासी झाल्यानंतर दहा वर्षाच्या आत इ. स. ६४० मध्ये अरबानी **सिरीया, इराक, पर्शिया** (विद्यमान काळचा इराण) आणि **इजिप्त** या देशातील जवळजवळ सर्व प्रदेश पादाक्रांत करून तेथे आपली सत्ता प्रस्थापित केली. त्यानंतरची तीस वर्षे **युरोपचा** काही भाग, उत्तर आफ्रिका, **मध्य आशिया** या वेगवेगळ्या भागातील आपल्या हुकूमतीखाली आणण्याच्या कामात ते व्यस्त होते व त्यात ते सरतेशेवटी यशस्वीही झाले. **स्पेनमध्ये त्यांचा अंमल सुमारे सातशे वर्षे होता.** थोडक्यात स्पेनपासून हिंदुस्थानपर्यंतच प्रदेश या अल्पावधीत त्यांच्या अंमलाखाली आला. त्या देशातील जवळ जवळ **सर्व प्रजाजनांना इस्लामचा**



अनुक्रमणिका

**स्वीकार करावयास लावण्यात ते यशस्वी झाले. तेथील बहुतेक सर्व परधर्मिय देवालये व तीर्थस्थाने त्यानी नष्ट केली. पण हिंदुस्थानात आलेल्या व येथे राहिलेल्या मुसलमानाना अशा प्रकारचे यश प्राप्त झाले नाही.** इ. स. एक हजार ते इ. स. १७६० या प्रदीर्घ कालखंडात त्यांना आपला एकछत्री अंमल या देशावर कधीही प्रस्थापित करता आला नाही, येथील सर्व प्रजाजनांना इस्लामचा स्वीकार करावयास लावण्यास ते अयशस्वी ठरले. खास करून एका वस्तुस्थितीचा उल्लेख करावयास हवा. **हिंदूंच्या समाजव्यवस्थेने ज्या दलितांवर शेकडो वर्षे अन्याय केला होता, त्यांनीही इस्लामचा स्वीकार केला नाही. रियासतकारांनी** लिहिले आहे. 'ह्या रियासतीचा कालारंभ – इ. स. १००० धरला आहे, तरी सर्व देशभर बादशाही अंमल स्थापन होण्यास पुढे बराच काळ लागला व नंतरही आसेतु हिमालयापर्यंतचा सर्व हिंदुस्थान देश, **मुसलमानी बादशाहीच्या एकछत्री अंमलाखाली फारच थोडे दिवस होता.....** मुसलमानांचे तरी हिंदुस्थानावर एकच राज्य होते असे नाही. निरनिराळ्या ठिकाणी भिन्न काळी स्थापन झालेली **'हिंदी'** व मुसलमानी राज्ये चालू होती.' **मुसलमानांचा अंमल सातशे वर्षे असूनही इतकी देवालये अजूनही भारतात आहेत याचे स्पष्टीकरण या मुद्यातून आहे.** एकतर 'राजकीय परिस्थिती' सरसकट देवालये उद्ध्वस्त करण्याइतकी अनुकूल कधीच नव्हती. दुसरे नवी देवालये बांधली जात होती. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर किती देवालये सारखी बांधली जात आहेत, कितींचा जीर्णोद्धार करण्यात येत आहे, यावद्दल वृत्तपत्रातून सारख्या बातम्या येत असतात, त्या आठवून पहाव्यात. **सोमनाथ हे त्याचे प्रख्यात व गाजलेले उदाहरण.** हिंदू राज्ये मुसलमानी राजवट ऐनभरात असतानाही स्थापन होत होती व ती राज्ये आपली देवालये उभारीत असणार हे ओघानेच आले. शिवाय मुळातच देवालयांची संख्या प्रचंड असेल – शिवाय पाडलेले देवालय पुन्हा नव्याने बांधले जात होते व ते पाडलेही जात होते– उदा. सोमनाथ म्हणून न पाडलेल्या देवालयांची संख्या मोठी होती. तशीच ती आजही आपणास दृष्टीस पडते. त्यांची ही संभवनीय कारणे आहेत.

**प्रा. इअटोन** यांच्या या अभ्यासपूर्ण लेखात मराठी साधनांचा वापर त्यांनी अजिबात केलेला नाही असे दिसते. याच कारणामुळे त्यांच्या या लेखात महाराष्ट्रातील फक्त दोन देवालयांचा उल्लेख आहे. त्यातले तुळजापूरच्या भवानीचे देवालय सर्व महाराष्ट्राला चांगलेच परिचित आहे. पुणे जिल्ह्यातील घोडा या ठिकाणचे देवालय हे दुसरे. पण त्याच्याबद्दल नेमका तपशील त्यांनी सादर केलेला नाही. शिवाय ते देवालय त्यांनी मांडलेल्या सूत्रात कसे बसते हेही सांगितलेले नाही. माझी आठवण जर बरोबर असेल तर इतिहास संशोधक खरे यांनी या विषयावर एक पुस्तिका लिहिली होती. त्यात विटंबित केलेल्या व जमिनदोस्त केलेल्या देवालयांची यादी दिल्याचे स्मरते. पण ते बाजूस ठेऊ या. ता. १६ डिसेंबर २००१

रोजी **निनाद बेडेकर** यांनी लिहिलेल्या लेखात पुढील उल्लेख आहे. पुणे जिल्ह्यातील. . . . गावाच्या मशिदीवर फारसी भाषेत शिलालेख आहे. "तेहतीस मंदिर पाडली आणि तिचा (मशिदीचा) पाया घातला", असे त्यात नमूद केलेले आहे. शिलालेखांच्या विश्वसनियतेबद्दल **प्रा. इअटोन** लिहितात, **"Although Indo-Muslim epiqraphi's are typically recorded near in time to the events they describe."** म्हणजे त्या शिलालेखात नमूद केलेल्या घटना प्रत्यक्ष घडलेल्या आहेत. तो कल्पना विलास नाही शिवाय त्या घटना घडल्यानंतर लगतच्या काळात त्या नोंदविलेल्या आहेत, पण हा मुद्दा प्रस्तुत नाही. ही तेहतीस देवालये कोणती व ती प्रा. इअटोन यांनी मांडलेल्या सूत्रात बसतात का?

येथवर लिहिलेला मजकूर मी फारच अनिच्छेन लिहिला आहे. मी एक सामान्य वाचक आहे याची जाण मला आहे. प्रा. रिचर्ड इअटोन यांच्यासारख्या संशोधकाच्या, व्युत्पन्न पंडिताच्या लिखाणावर टीका करणे, हे लहान तोंडी मोठा घास घेतल्यासारखे आहे. मला त्यांच्या लिखाणातील जे मुद्दे व विधाने विसंगत वाटली, जी प्रत्यक्ष वस्तुस्थितीला धरून नाहीत असे आढळले त्याबद्दल लिहिण्याचे धाडस केलेले आहे. कोणी 'सेक्युलर' वा मार्क्सवादी विचारसरणीचा 'व्यावसायिक इतिहासकार' हे किती चुकीचे आहे हे दाखवून देईल तर मला आनंदच होईल कारण मी ही एक 'सेक्युलर' (अर्थात तथाकथित नाही) विचारांचाच आहे. भारतातील (तथाकथित) सेक्युलर विचारसरणीच्या 'व्यावसायिक इतिहासकारानी' (उदा. रोमिला थापर, इरफान हबीब व महाराष्ट्राला परिचित असलेले प्रा. य. दि. फडके) यांनी या विषयाबाबत काहीच लिखाण केलेले नाही हे **प्रा. इअटोन** यांनी सांगितले. अगदी कटाक्षाने त्यानी लिहावयाचे टाळलेले आहे असे दिसते. बाबरी मशिदी जमिनदोस्त करण्याची घटना घडल्यानंतरही. म्हणून मला प्रा. इअटोन यांच्या लेखाचा मराठी वाचकाला परिचय करून द्यावा असे वाटले. या माझ्या संकल्पात **'नवी क्षितिजे'** च्या संपादकांचे गेल्या अनेक वर्षांचे घनिष्ट मित्र माननीय **श्री. ज. द. जोगळेकर** यांच्या ज्ञानाची व अनुभवाची संपादकाकरखी मला फारच मदत झालेली आहे. आजवर मार्क्सवाद या नावाने जी मान्यता पावलेली (त्याचे दुसरे नाव पूर्वीच्या सोव्हियट युनियनला वेळोवेळी मान्य असलेली) विचारसरणी आहे तिचा परिचय असलेला एखादा म्हणाला असता, या **'मार्क्सवादी' पंडिताना मार्क्सवादी- धर्मपिठातून सांगावा आला नसल्याकारणाने** त्यांनी आजवर हे धाडस केले नसावे. एवंच त्यांनी लिहलेच नाही वा या घटनांचा अभ्यास करून त्यामागे एखादे सूत्र आहे का? याचा शोध घेतला नाही हा प्रश्न अर्थातच उपस्थित होत नाही. हिंदू राजानी त्यांच्या पदरी असलेल्या सेनापतीनी प्रतिस्पर्धी राजाच्या आश्रयाखाली असलेल्या देवळातील मूर्ती पळवून त्यांची मोडतोड त्यांनी कधीही केली नाही. पण त्या



अनुक्रमणिका

देवालयांची विटंबना केली, हा मुद्दा निखालसपणे मान्य करण्यात कोणतीही अडचण नाही. **प्रा. इअटोन हे 'सूत्र' आपणास ज्ञात करून दिले याबद्दल आपण त्यांचे सदैव ऋणी राहिले पाहिजे.** मतभेद आहे तो हे 'सूत्र' हे मुसलमान राज्यकर्त्यांच्या (**प्रा. इअटोन** यांनीच दाखवून दिलेल्या वर्तनाबद्दल. त्यांचे वागणे हे त्यांच्या 'सूत्रात' बसत नाही त्याचे कारण काय असावे? हे त्यांनीच सांगावयाचे व त्यांनाच ते शक्य होईल) याचे कारण या प्रश्नाचा त्यांच्या इतका सखोल अभ्यास कोणी केला असेल असे मला वाटत नाही, भारतातील 'व्यावसायिक इतिहासकारांनी' **प्रा. इअटोन** यांनी बसविलेल्या सूत्रापेक्षा वेगळे सूत्र मांडवून दाखवावे, अगर त्या सुत्रातील त्रुटी असतील त्या दूर करून, ते सुधारीत स्वरूपात सादर करावे. प्रगतीशील विचारसरणीचे **प्रा. य. दि. फडके** हे कार्य हाती घेण्यास समर्थ संशोधक आहेत. शिवाय ते शिवचरित्राच्या कामात सध्या व्यत असल्याने, त्यांना या विषयाबाबत संशोधन व अभ्यास करणे क्रमप्राप्तच आहे, हे लक्षात घेऊन ही विनंतीवजा सूचना केलेली आहे.

हिंदुस्थानचा इ. स. एक हजार नंतरच्या इतिहासाबद्दल **प्रा. इअटोन** यांनी केलेले सर्वच लिखाण हे माझ्यासारख्या वाचकास नवी माहिती देणारे व म्हणूनच नवी दृष्टी देणारे असते. याबाबत एक छोटे उदाहरण देऊन ही टिप्पणी (अधिक करून टीका असलेली) वा लेख आवरता घेतो. **प्रा. इअटोन** यांनी 'Historical introduction to Firuzabad Palace city of the Deccan' हा लेख मी वाचण्यास सुरुवात करण्याअगोदर, हिंदुस्थानचा इतिहास या विषयाचे माझ्यासारख्या असंख्य वाचकांचे 'बायबल' असणाऱ्या रियासतीत या 'Palace City' चा उल्लेख आहे की हे मी पाहिले. रियासतीत 'फिरोजाबाद' शहराचा उल्लेख आहे हे वाचून मी खुशाललो. त्या शहरासंबंधी त्यात पुढील मजकूर आहे. "भीमेच्या काठी फिरोजाबाद नावाचे एक शहर वसविले आणि तेथे जनानखान्याकरिता तटवंदी राजवाडा बांधला तो अद्यापि आहे असे म्हणतात." या मजकुराला नव्या आवृत्तीतही पुढील तळटीप आहे, हे हेच वाडी जंक्शन जवळचे शहाबाद की काय?' या पलीकडे त्या शहराबद्दल आणखी काहीही माहिती नाही. **प्रा. इअटोन** यांनी पाश्चिमात्य संस्कृतीला अनुसरून हे शहर नकाशात कोठे होते, हे दाखविणारा नकाशाही दिला आहे. याशिवाय हे शहर बहाननी सलतनतीतील एक सुलतान, **फिरोझ शहा** याने का वसविले, का प्रस्थापित केले. त्या शहराची मुलभूत प्रकृती काय होती? त्या शहरातील दरबारी जीवन कशा प्रकारचे होते? आणि त्या शहरात कोणत्या प्रकारच्या राजकीय कृती व हालचाली होत असत यांचे चित्रण आणि सरतेशेवटी हे शहर या सलतनतेने वाऱ्यावर का सोडून दिले? या सर्व प्रश्नांची तपशीलात जाऊन, समर्पक पुरावे देऊन चर्चा केलेली आहे. हा सारा वृत्तांत वाचनीय आहे. हे सारे माननीय रियासतकाराकडून अपेक्षित नाही. याचे साधे कारण, **प्रा. इअटोन** यांना

**ज्या सुविधा, स्वास्थ व स्वातंत्र्य उपलब्ध आहेत, त्या अर्थातच रियासतकारांना कधीही नव्हत्या.** तक्रार करायचीच झाली, तर रियासतीची अगदी अलीकडेच इ. स. १९९२ साली प्रसिद्ध झालेल्या नव्या आवृत्तीबद्दल त्यात त्या तळटीपेकडे पलीकडे काहीही नवी माहिती नाही. हे लक्षात आल्यानंतर **प्रा. इअटोन**बद्दलचा आदर शतगुणित होणे स्वाभाविकच आहे.

एवंच देवालयांची विटंबना / जमिनदोस्त होणे या इतिहासकालीन वस्तुस्थितीबद्दल **प्रा. रिचर्ड इअटोन** यांनी उपलब्ध असलेल्या पुराव्यानुसार त्यांनी जे भारतीय 'व्यावसायिक इतिहाकारांनी' आजवर जे उन्मेखून टाळले होते. त्याबाबत सविस्तर चर्चा करून, आपण जे सूत्र बसविले आहे, ते आम जनतेला सादर केल्याबद्दल **त्याना 'सलाम'.**

आपल्या लेखाचा शेवट करताना त्यांनी एक मनोज्ञ विधान केले आहे. **प्रा. रिचर्ड इअटोन** म्हणतात "These pattern also suggests points of continuity in turn call into serious question the sort of civilizational divide between India's 'Hindus' and 'Muslim' periods first postulaled in British colonical Historigraphy and subsequality replicated in both Pakistani and Hindu. Nationalist Schools भारतीयाना हा विचार नवीन नाही. रिसायतकारानी म्हटले आहे. **"वस्तुतः हिंदुस्थानचा इतिहास युरोपियन इतिहासाहून पुष्कळ भिन्न आहे. . . . असे विभाग पाडून तथापि विवेचना सोईसाठी मुसलमानी रियासत मराठी रियासत मध्ययुगीन भारताचा स्वतंत्र इतिहास देण्यात येत आहे...** मात्र त्या मध्ययुगाच्या कल्पनेने हिंदूच्या इतिहासध्यानास विशेष मदत होत नाही." पुढेही अनेक ठिकाणी मुसलमानी रियासत/ मराठी रियासत अशी विभागणी किती गैरसोईची आहे हे त्यांनी सांगितले आहे. अगदी अलीकडे **पार्था चतर्जी** यांनीही 'मुसलमान' व 'हिंदू' अशी विभागणी किती चुकीची आहे हे आपल्या 'इतिहास आणि राष्ट्रे' या लेखात विस्ताराने सांगितले आहे. (हा लेख नवी क्षितिजेच्या ५२व्या अंकात देण्यात आला आहे) पार्था चतर्जी म्हणतात – "भारतातील वेगवेगळ्या विभागांचे असे अनेक पर्यायी इतिहास आहेत अशी कल्पना करता येईल.. असे झाले म्हणजे मग प्रश्न 'विभागीय इतिहास' आणि 'राष्ट्रीय इतिहास' असा इत:पर राहणार नाही. तसेच 'विभाग' आणि 'सर्व भारत' यांच्यातील संबंध हेही **चर्चेसाठी खुले होतील.** या अशा पर्यायी इतिहासात काही प्रकारचे ऐक्य असल्यास त्याचे स्वरूप राष्ट्रीय न राहता ते संघराज्याचे राहिले." पार्था चतर्जी यांच्या या विचाराशी कोणाचे दुमत होणारच नाही. तसेच रियासतकार सरदेसाई यांच्यासारख्यानी आधुनिक व्यावसायिक लेखकाना ज्या सुविधा व स्वातंत्र्य आहे, त्यातले काहीही उपलब्ध नसताना आजच्या दशकातही आधुनिक ठरतो, असा विचार त्यांनी सांगितला. याबद्दल सर्वांनीच त्यांना **'सलाम'** करावयास हवा. पण ते का होणार नाही, त्याची कारणे वेगळी आहेत असो.

---



अनुक्रमणिका

## देवालये विटंबित करणे, अवमानित करणे, त्यातील मूर्तींची मोडतोड करणे या घटना वा कृत्ये

| क्र. | इ. स. | स्थळ व जिल्हा | | भारतातील राज्य | हे कृत्य कोणी केले | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | ११९३ | अजमेर | जिल्हा अजमेर | राजस्थान | मंहमद घोरी या सुलतानाने | क्रमांक १ ते २४ करता नकाशा २ अ पहाणे. दिल्लीच्या साम्राज्यवादाचा काळ इ. स. ११९२ ते १३९४ |
| २ | ११९३ | सामना | पातीआळा | पंजाब | सुलतान ऐबक | |
| ३ | ११९३ | कुहराम | कर्नाल | हरयाना | सुभेदार ऐबक | |
| ४ | ११९३ | दिल्ली | | दिल्ली | सुलतान मंहमद घोरी | |
| ५ | ११९४ | कोल | अलीगढ | उत्तर-प्रदेश | सुलतान मंहमद घोरी यांचे सैन्य | |
| ६ | ११९४ | बनारस | बनारस | उत्तर-प्रदेश | सुलतान मंहमद घोरी यांचे सैन्य | |
| ७ | सुमारे १२०२ | नालंदा | पाटणा | विहार | सेनापती बखतिआर ख़िलजी | |
| ८ | सुमारे १२०२ | ओलानापुरी | पाटणा | विहार | सेनापती बखतिआर खिलजी | |
| ९ | सुमारे १२०२ | विक्रमशील | सहरसा | विहार | सेनापती बखतिआर खिलजी | |
| १० | १२३४ | भिलस्त | विदिशा | मध्य-प्रदेश | सुलतान इलतुतमिश | |
| ११ | १२३४ | उज्जैन | – | मध्य-प्रदेश | सुलतान इलतुतमिश | |
| १२ | १२९० | झैन | सवाई माधवपूर | राजस्थान | सुलतान जलाल अलदिन खलजी | |
| १३ | १२९२ | भिलसा | विदिशा | मध्य-प्रदेश | अला-अल-दिन खलजी | |
| १४ | १२९८-१३१० | विजापूर | मेहसाना | गुजराथ | स्वारी करून आलेले खलजी | |







| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १५ | १२९५ | देवगिरी | औरंगाबाद | महाराष्ट्र | सेनापती अला-अल-दिन खलजी | |
| १६ | १२९९ | सोमनाथ | जुनागढ | गुजराथ | सेनापती उलुघ खान | |
| १७ | १३०१ | सैन | सवाई-माधवपूर | राजस्थान | सुलतान अला-अल-दिन खिलजी | |
| १८ | १३११ | चिंदंबरम | दक्षिण आरकोट | तामिळ-नाडू | सेनापती मलीक काफूर | |
| १९ | १३११ | मदुराई | मदुराई | तामिळ-नाडू | सेनापती मलीक काफूर | |
| २० | सुमारे १३२३ | वारंगळ | वारंगळ | आंध्र-प्रदेश | राजपुत्र उल्घ खान | |
| २१ | सुमारे १३२३ | बोधन | निझामाबाद | आंध्र-प्रदेश | राजपुत्र उलुघ खान | |
| २२ | सुमारे १३२३ | पुल्ललमारी | नलगोंडा | आंध्र-प्रदेश | राजपुत्र उलुघ खान | |
| २३ | १३५९ | पुरी | पुरी | ओरिसा | सुलतान फिरवझ तघलक | |
| २४ | १३९२-९३ | साईनथाळी | गुरगांव | हरयाना | सेनापती बहादूर का नहार | |
| २५ | १३९४ | इदर | सांबरकाठा | गुजराथ | सेनापती मुझ्झफर खान | घटना २५ ते ५५ नकाशा क्रमांक २ ब पहावा. घटना काल इ. स. १३९४-१६०० स्थानिय सलतनतीच्या विकासाचा काळ |
| २६ | १३९४ | सोमनाथ | सांबरकाठा | गुजराथ | सेनापती मुझ्झफर खान | |
| २७ | सुमारे १४०० | पारसपूर | श्रीनगर | काश्मिर | सुलतान सिकंदर | |
| २८ | सुमारे १४०० | बिजबेहरा | श्रीनगर | काश्मिर | सुलतान सिकंदर | |
| २९ | सुमारे १४०० | मार्तंड | अनंतनाग | काश्मिर | सुलतान सिकंदर | |
| ३० | सुमारे १४०० | त्रिपुरेश्वर | श्रीनगर | काश्मिर | सुलतान सिकंदर | |



अनुक्रमणिका

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ३१ | १४००-०१ | इदर | सांबरकाढा | गुजराथ | सुलतान सिकंदर | |
| ३२ | १४००-०१ | दिऊ (Diu) | अमरेली | गुजराथ | सुलतान मुझ्झफर शहा | |
| ३३ | १४०६ | मानवी | रायचूर | कर्नाटक | सुलतान फिरूझ बहमनी | |
| ३४ | १४१५ | सिद्धपूर | मेहसाना | गुजराथ | सुलतान अहमद शहा | |
| ३५ | १४३३ | दिलवारा | सांबरकाठा | गुजराथ | सुलतान अहमद शहा | |
| ३६ | १४४२ | कुंभलमिर | उदेपूर | राजस्थान | सुलतान मंहमद खलजी | |
| ३७ | १४५७ | मंडलगड | भिलवारा | राजस्थान | सुलतान मंहमद खलजी | |
| ३८ | १४६२ | मालन | बनासकांठा | गुजराथ | सुलतान अला-अल-दिन | |
| ३९ | १४७३ | द्वारका | जामनगर | गुजराथ | सुलतान मंहमद वेगढा | |
| ४० | १४७८ | कोंडापल्ले | कृष्णा | आंध्र-प्रदेश | सुलतान दुसरा मंहमद बहामनी | |
| ४१ | सुमारे १४७८ | कांची | चिंगलपूर | तामिळ-नाडू | सुलतान दुसरा मंहमद बहामनी | |
| ४२ | १५०५ | अमोद | भडोच | गुजराथ | सेनापती खलील शहा | |
| ४३ | १४८९-१५१७ | नागरकोट | कांगरा | हिमाचल प्रदेश | सेनापती खवास खान | |
| ४४ | १५०७ | उतगिर | सवाई माधवपूर | राजस्थान | सुलतान सिकंदर लोदी | |
| ४५ | १५०७ | नखार | शिवपूरी | मध्य-प्रदेश | सुलतान सिकंदर लोदी | |
| ४६ | १५१८ | ग्वाल्हेर | ग्वाल्हेर | मध्य-प्रदेश | सुलतान इब्राहिम लोदी | |
| ४७ | १५३०-३१ | देवरकोंडा | नलगोंडा | आंध्र-प्रदेश | सुलतान कुली कतुब शहा | |
| ४८ | १५५२ | नखार | शिवपुरी | मध्य-प्रदेश | सेनापती दिलदार खान | |
| ४९ | १५५६ | पुरी | पुरी | ओरिसा | सुलतान सुलेमान कशनी | |



अनुक्रमणिका



| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ५० | १५७५-७६ | बंकापूर | धाखाड | कर्नाटक | सुलतान अली-अदील शहा | |
| ५१ | १५७९ | अहोबिलम | कुरनूल | आंध्र-प्रदेश | सेनापती मुरहारी राव | |
| ५२ | १५८६ | घोडा | पुणे | महाराष्ट्र | मिर मंहमद झमम यांचा हुद्दा ज्ञात नाही | |
| ५३ | १५९३ | कड्डप्पा | कड्डप्पा | आंध्र-प्रदेश | सेनापती मुर्तजाखान | |
| ५४ | १५९३ | कार्लीहास्ती | चित्तूर | आंध्र-प्रदेश | सेनापती इतबार खान | |
| ५५ | १५९९ | श्रीकुमारन | विशाखा-पट्टण | आंध्र-प्रदेश | कुतुबशाही सलतनतीचा सेनापती | |
| ५६ | १६१३ | पुष्कर | अजमेर | राजस्थान | बादशहा जहांगिर | क्रमांक ५६ ते ८० यासाठी नकाशा क्रमांक २ क पहा. इ. स. १६०० ते १७६० च्या दरम्यान मुसलमान मोगलांच्या अधिकाराचा विस्तार वा आपली हुकूमत प्रस्थापित झाली आहे हे पुन्हा एकदा ठासून सांगण्याचा कालखंड |
| ५७ | १६३२ | बनारस | बनारस | उत्तर-प्रदेश | बादशहा शहाजहान | |
| ५८ | १६३५ | ओरछा | तिखमगढ | मध्य-प्रदेश | शहाजहान | |
| ५९ | १६४१ | श्रीकाकुलम | श्रीकाकुलम | आंध्र-प्रदेश | सेनापती शेर मंहमद खान | |
| ६० | १६४२ | उदयगिरी | नेल्लोर | आंध्र-प्रदेश | सेनापती गाझी अली | |
| ६१ | १६५३ | पुनामाल्ले | चिंगेलपूट | तामिळ-नाडू | सेनापती सखसाम बी झुली फीकार | |
| ६२ | १६५५ | बोधम | निझामाबाद | आंध्र-प्रदेश | राजपुत्र व सुभेदार औरंगजेब | |
| ६३ | १६५९ | तुळजापूर | ओस्मानाबाद | महाराष्ट्र | सेनापती अफझलखान | |
| ६४ | १६६१ | कुचबिहार | कुचबिहार | आसाम | सेनापती मिरजुमला | |
| ६५ | १६६२ | देवलगांव | सिबसागर | आसाम | सेनापती मिरजुमला | |
| ६६ | १६६२ | गुन्हगांव | सिबसागर | आसाम | सेनापती मिरजुमला | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ६७ | १६६४ | ग्वाल्हेर | ग्वाल्हेर | मध्य-प्रदेश | सेनापती मुरवतनाद खान | |
| ६८ | १६६७ | अकोट | अकोला | महाराष्ट्र | सेनापती मंहमद अश्रफ | |
| ६९ | १६६९ | बनारस | बनारस | उत्तर-प्रदेश | बादशहा औरंगजेब | |
| ७० | १६७० | मथुरा | मथुरा | उत्तर-प्रदेश | बादशहा औरंगजेब | |
| ७१ | १६७९ | खानडला | सिकार | राजस्थान | सुभेदार खान जहान | |
| ७२ | १६७९ | जोधपूर | जोधपूर | राजस्थान | सेनापती खान जहान | |
| ७३ | १६८० | उदयपूर | उदयपूर | राजस्थान | सेनापती खाहुल्ला खान | |
| ७४ | १६८० | चितोर | चितोर | राजस्थान | बादशहा औरंगजेब | |
| ७५ | १६९२ | कड्डाप्पा | कड्डाप्पा | आंध्र-प्रदेश | बादशहा औरंगजेब | |
| ७६ | १६९७-९८ | सांभार | जयपूर | राजस्थान | शहाबाद आदील याला हुद्दा काय होता हे ज्ञात नाही. | |
| ७७ | १६९८ | विजापूर | विजापूर | कर्नाटक | सेनापती हमीद कुली खान | |
| ७८ | १७१८ | सुरत | सुरत | गुजराथ | सेनापती हैदर क्युली खान | |
| ७९ | १७२९ | कुरलग | कुर्गुल | आंध्र-प्रदेश | सेनापती मंहमद अली | |
| ८० | १७२९ | उदयपूर | पश्चिम | त्रिपुरा | मुर्शिद क्युली (Quli) खान | |



अनुक्रमणिका

(नकाशा २ अ)

दिल्ली सलतनच्या साम्राज्यांचा काळ (इ.स. ११९२ ते १३९४)




देवालयांची विटंबना (इ.स. ११९२ ते १३९४)



अनुक्रमणिका

(नकाशा २ क)

Arabian Sea

Bay of Bengal

Indian Ocean

71 70 76 72 56 67 74 58 57/69 73 64 65 66 80 78 68 62 63 59 77 79 60 75 61

देवालयांची विटंबना (इ.स. १६०० ते १७६०) मोगल अमंलाचा विस्तार व अमंलाची नव्याने मांडणी



अनुक्रमणिका



# राजकारण आणि इतिहास

## भारतीय स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते बडोदा नरेश तिसरे सयाजीराव यांचा गनिमी कावा

**– श्रीकृष्ण खोत**

भूतपूर्वकाळातील बडोदे संस्थानाबद्दल विद्यमान जगतात मोठे आवर्जून लिहिले जात आहे. या विद्वत् जगतात अर्थातच महाराष्ट्रातील विद्वानांचा समावेश नाही. याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. कारण सयाजीराव महाराज ह्यात असतानाही त्यांच्या एकंदर क्रांतिकारी आयुष्याची दखल फारशी कोणीही घेतली नाही. त्याचे कारण काय? या प्रश्नाचे उत्तर कोणासही ठोसपणे देता येणार नाही. Modern Asian Studies या केंब्रिज विद्यापिठाने प्रकाशित केलेल्या संशोधन पत्रिकेत सयाजीराव महाराजांबद्दल गेल्या दशकात (इ. स. १९९० ते २०००) काही लेख आले आहेत. त्याची साधी दखलही महाराष्ट्रात कोणी घेतलेली दिसत नाही.

विसाव्या शतकाच्या अगदी सुरवातीच्या काळात सयाजीराव महाराजांच्या ज्ञानप्रेमी आधिपत्याखाली, एका आदर्श आणि प्रगतिशील संस्थानाचा उदय झाला आणि त्यांच्याच कारकीर्दीत त्याची भरभराट होत होती असे अनेक पाश्चात्त्य लेखकांनी कोणताही हातचा न राखता लिहिलेले आहे. येथे उन्मेखून नमूद करावयाचा मुद्दा म्हणजे, ब्रिटिश राजवटीने, मंजूर केलेल्या संस्थानांच्या उतरंडीत, बडोदे संस्थान महत्त्व आणि त्यामुळे प्राप्त होणारी प्रतिष्ठा लक्षात घेऊन सर्व हिंदुस्थानात ते दुसऱ्या / तिसऱ्या क्रमांकाचे होते. हे लक्षात घेऊन श्री. कुळकर्णी यांनी Princely States and Lapse of British Paramountocy (ब्रिटिश राजवटीतील संस्थाने आणि ब्रिटिशांचे सर्वाभौमत्व नाहीसे होणे) या ग्रंथात असे लिहिले आहे की 'बडोद्याच्या सयाजीराव गायकवाड यांचे कर्तृत्व आढळून, त्यांच्या शहाण्या धोरणी समंजस अशा संस्थानी राजवटीचे स्मरण करून या कथेचा शेवट करणे....... पुरेसे आहे'' हे असे विधान त्यानी करण्यामागचे कारण, तोवर सातत्याने ''अत्यंत गलथान चुकीच्या व वेळप्रसंगी जुलमी अशा राजवटीच्या जागी सयाजीराव महाराजांनी, एक ज्ञानप्रेमी प्रत्यक्ष पुरोगामी व मानवताप्रेमी प्रशासन, प्रत्यक्ष व्यवहारात आणले. आणि त्याला समर्थ असे नेतृत्वही दिले. ''हे विधान करण्यामागे, व या प्रकारचे लिखाण करण्यामागे त्याला काही अगदी मूलभूत ठरतील अशा तीन, ब्रिटिश साम्राज्याला अनुकूल असलेल्या लेखकांनी लिहिलेल्या गायकवाडांच्या इतिहासाचा संदर्भ आहे. त्यातले **एक फिलीप सार्जंट** यांचे The Ruler of Baroda (बडोदे संस्थनचा अधिपती) **दोन इ. एम. टोट्टेमहान** यांचे



अनुक्रमणिका

Highness of Hindostan (हिंदुस्थानातील संस्थानाधिपती) आणि तिसरे स्टॅनलेराईस यांचे Life of Sayajirao III (तिसरे सयाजीराव महाराज यांचे चरित्र). ब्रिटिश राज्यकर्त्यांचा जो दृष्टिकोन होता, त्याचे अत्यंत आदर्श चित्रण स्टॅनले राईस यांनी आपल्या या चरित्र ग्रंथाच्या प्रस्तावनेत केलेले आहे. त्यात त्यांनी असे नोंदविले आहे की 'महाराज सयाजीराव यांनी, दडपशाही, लाचलुचपत आणि भ्रष्टाचार यांच्या कर्दमात गळ्यापर्यंत बुडालेले, संस्थानी राज्यातील प्रजाजन आपल्या संस्थानाधिपतींच्या लहरीवर, आणि ज्याच्या दुष्परिणाबद्दल ज्या अधिपतीला जबाबदार धरले जाणार नाही, अशा दुष्कृत्यांना आकंठ बुडालेले एक मध्ययुगीन राज्य; या अशा दलदलीतून या संस्थानाला पहिल्या दर्जाचे आणि पहिल्या क्रमांकाचे स्थान प्राप्त करून दिले. या **संस्थानाचा राज्यकारभार लिखित घटनेनुसार** चालत होता. या संस्थानाने मंजूर केलेल्या घटनेने मान्य केलेले **कायदे न्याय्य होते आणि ते व्यवहार आणि बुद्धी यांनाही तसे पटणारे होते.** तसेच आधुनिक विज्ञान आणि आधुनिक शहाणपण यांची आजवरची जी प्रगती आहे, त्याला सयाजीरावांचे सरकार आपली अगदी मनापासून सहजप्रवृत्तीने मान्यता देत आहे, हे आपल्या वागणुकीने दाखवून देत होते.'

पाश्चिमात्यांच्या धर्तीवर बडोदे संस्थानची राज्ययंत्रणा निर्माण करून, ती विकसित करण्यात आली असल्याकारणाने त्या संस्थानचा कारभार आधुनिक आणि चांगला आहे अशी कीर्ती बडोद्याला प्राप्त झाली होती. तत्कालीन वसाहतकालीन इतिहासात या मुद्याचे स्पष्टीकरण व विवरण करण्यात आले होते. बडोदे संस्थानाने सुधारणा करण्याकरिता पुढाकार घेतला होता. त्या सुधारणांना आवश्यक असलेल्या सामाजिक संस्था विकसित केल्या होत्या. या सर्वामुळे बडोदे हे आदर्श व प्रगतीशील संस्थान आहे अशी त्यांची प्रतिमा तयार होण्यास मदत झाली होती. सयाजीराव महाराजांच्या या कामगिरीमागे कशा प्रकारची प्रेरणा होती हे जाणून घेण्याचा प्रयत्न या लेखात करण्यात येणार आहे. बडोदे संस्थानाने अनुकरण करून वापरलेल्या तथाकथित पाश्चिमात्य संकल्पना या वस्तुत: एका वेगळ्याच प्रकारच्या होत्या हे त्यावरून आपल्या लक्षात येईल. तसे वरवर पाहिले तर बडोदे संस्थानातील सुधारणा व सामाजिक संस्था पाश्चिमात्यांच्या आदर्शा बरहुकूम होत्या हे खरे आहे. परंतु त्यांची उभारणी अगदी जाणिवपूर्वक वेगळ्या प्रकारे करण्यात आली असल्याकारणाने पाश्चिमात्य आदर्शात असलेला तपशील पार बदलून गेला होता. म्हणून अशा पद्धतीने अंमलात आणल्या गेलेल्या संकल्पना 'पाश्चिमात्य पण त्या तितक्याशा पाश्चिमात्य नव्हत्या' (not quite) असे विधान 'होमी भाभा' या अमेरिकास्थित प्राध्यापकांना करता येते. 'होत्या पण त्या तितक्याशा' नव्हत्या याचा अर्थ ना इकडे पाश्चिमात्य ना तिकडे भारतीय असा होतो. त्या सुधारणांची मूळ भूमी (पाश्चिमात्य देश) आणि त्यातील सैधांतिक घटक याना एकमेकांपासून अलग करून, त्यांना राष्ट्रवादाचे जे संकल्पित वेळापत्रक होते, त्याला त्या संकल्पनांचा उपयोग व्हावा अशा प्रकारे त्या संकल्पनांना करण्याच्या उद्देशाने, त्या सुधारणांची कार्यवाही करण्यात आली होती.

'आपण राज्यकर्ते' यांच्याशी तुलना करता. 'आपल्या साम्राज्यातील प्रजाजन हा तो 'दुसरा' (The other) कसा आहे या निरुपणावर वसाहतवादी तत्त्वप्रणाली अवलंबून होती. आम्हा वसाहतवाद्यांचे आदर्श व ध्येये किती उंच पातळीवरची आहेत, हे आपल्या अंकिताना दाखवून देणे. संस्कृतिहीन अंकिताना सुसंस्कृत करणे अशाप्रकारे त्या अशा लोकांना मुक्ती देणे हे आपले धर्मकार्य (Mission) आहे असे सर्वच वसाहतवादात ठोसपणे सांगण्यात येत होते, म्हणूनच 'तो दुसरा' हा आपल्यापेक्षा वेगळाच असला पाहिजे. तसे असले तरच वसाहतींचे शोषण करणे, आणि त्यांच्यावर प्रभुत्व गाजविणे हे वर्तन ते वसाहतवादी करीत असत, त्याला सैधांतिक पाया प्राप्त होतो. परंतु होमी भाभा यांनी सांगितल्याप्रमाणे 'त्या होत्या पण तितक्याशा नव्हत्या.' थोडक्यात ज्या सुधारणा अमलात आणल्या जात होत्या. त्यांचा तोंडावळा पाश्चिमात्य होता पण त्या वस्तुत: वेगळ्याच होत्या, हे खरे आहे. प्रत्यक्षात वसाहतवादाचा मुकाबला करण्यासाठी योजिलेला तो 'गनिमी कावा' होता. त्याचे असे आहे. अनुकरण करणे (Mimicry) ही जी प्रक्रिया आहे, त्या नाण्याला दोन बाजू आहेत. **एकीकडे** ज्ञान मिळविण्याची पाश्चिमात्यांची पद्धत, तसेच सुधारणा आणि त्यांचे नियमन या गोष्टी प्रस्थापित करावयाच्या. त्याजबरोबर हे कार्यवाहीत आणण्यासाठी 'वसाहतवादी' वापरत असलेली जी भाषा होती त्याचे समर्थन करावयाचे. पण **दुसरीकडे** वसाहतवाद्याना राज्य करण्याचा अधिकारच आहे. हा विचार सूत्रबद्ध व शास्त्रपूत करण्याच्या प्रक्रियेत त्या अधिकारांचा हेतू साम्राज्यावर राज्य करणे आणि त्यासाठी राज्यकर्ते वापरत असलेली वेगवेगळ्या प्रकारची नियंत्रणे उघड करून दाखवावयाची. एवंच वसाहतवाद्यांचा कल्पनेत आपण ज्या प्रकारे राज्य करतो आणि आपले दैनंदिन जीवनातले वावरणे यात काहीही वावगे नाही (normal) असे जे त्याना वाटत होते, ते लक्षात घेता सयाजीराव महाराजांचे धोरण त्याना धोकादायक वाटत होते. याचे कारण असे आहे की, या 'दुसऱ्याच्या' या कार्यवाहीमुळे साम्राज्यवाद्यांच्या प्रचारात अनस्यूत असलेले सत्य दाखविले जात होते व त्याची व्याप्तीही स्पष्ट केली जात होती. एकतर या 'दुसऱ्या'कडून होणाऱ्या कार्यवाहीतील उद्दिष्टे ही एकीकडे साम्राज्यावाद्यांच्या उद्दिष्टाशी विसंगत होती. याचे कारण ही वसाहतवादी संपूर्ण व्यवस्था ही आपल्या स्वत:चीच दांभिकता, विसंगती, मूर्खपणा यांच्या भाराखाली पार वाकलेली होती. यावरून एकच निष्कर्ष काढावा लागेल. **सयाजीराव महाराज**, हे मनापासून 'भारतीय स्वातंत्र्या'चे पुरस्कर्ते होते. हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी आपल्या हाती असलेल्या अधिकाराचा वापर व्हावा यासाठी त्यांना आपल्या हाती असलेला अधिकार गमाविण्याची इच्छा नव्हती. याचा अर्थ त्यांना त्या अधिकाराची अभिलाषा होती असा नाही. हे त्यांनी आपल्या वागणुकीनेच सिद्ध केलेले असल्याकारणाने नगण्य व्यक्तीनी त्यांना शिफारस पत्रे देण्याची आवश्यकता नाही. त्या अधिकाराचा वापर करून भारताला भविष्यकाळात आवश्यक असलेल्या सुधारणांची त्यांनी पायाभरणी केली, व स्वातंत्र्य लढ्यात सहभागी असलेल्याना त्यांनी आवश्यक ती मदत व संरक्षण देण्याचेही काम केले. ही त्यांची कामगिरी ते 'ओबीसी' असल्याकारणाने, महाराष्ट्रातील एका विशिष्ट जातीच्या व

तथाकथित लालनिशाणी पुरोगामी विचारवंतानी खुल्यादिलाने मान्य केलेली नसावी. तरी ती वस्तुस्थिती होती, हे यापुढे सादर करण्यात येणाऱ्या वृत्तांतावरून सिद्धच होईल.

विसाव्या शतकातील पहिल्या दशकात, तत्कालीन बिटिश सरकार आणि बडोदे संस्थान यांच्या दरम्यान राजकीय सत्तेबाबत ज्या गुंतागुंतीच्या वाटाघाटी झाल्या त्याचे स्वरूप या लेखात उघड करून दाखविण्यात आले आहे. बडोदे हे संस्थान हे त्या संस्थानाने केलेल्या सुधारणा, आपल्या संस्थानातील प्रशासन आणि सामाजिक संस्था, यांचे आधुनिकीकरण व्हावे, अशी पुरोगामी स्वरूपाची कळवळ या गोष्टीसाठी चांगलेच महशूर होते. गंमत नेमकी याच ठिकाणी आहे. आपल्या साम्राज्यातंर्गत कोठल्याही समाजाने सामाजिक व्यवहार कसा करावा, या संबंधात आपण आदर्श आहोत अशी पाश्चिमात्य वसाहतवादी अथवा साम्राज्यवादी यांची धारणा होती. आपल्या अंकित देशासमोर आपण जो आदर्श ठेवला आहे आणि हे उद्दिष्ट साध्य करून आपल्याशी बरोबरी करण्यासाठी अंकित देशातील लोकांना संघर्ष करण्याची आवश्यकता आहे अशी त्यांची ठाम समजूत होती. म्हणूनच वसाहतवादी प्रदेशातील वा हिंदुस्थानातील संस्थानी राज्यपद्धतीत समाज सुधारणा ही संकल्पना ही वसाहतवाद्यांचे अनुकरण करण्याच्या कल्पनेशी घनिष्टपणे संबंधित होती. पाश्चिमात्य समाजाशी बरोबरी करणे, हे त्याकाळी अर्थातच सर्वस्वी अशक्य होते. याचे कारण ती बरोबरी **न** होण्यातच वसाहतवादी राज्य वा साम्राज्यांची राजवट यांची का आवश्यकता आहे याचे रहस्य होते. आपण ज्या 'शिक्षका'कडून शिक्षण वा ज्ञान पैदा करीत आहोत, त्या शिक्षकाचा अधिकार नाकारण्यासारखे ते झाले असते. म्हणूनच कोणतीही समाज सुधारणा **जवळजवळ बरोबरी करणारी असली तरी ती प्रत्यक्षात तितकीशी नव्हती.** हा मुद्दा खास करून लक्षात ठेऊन बडोदे संस्थानात ज्या समाज सुधारणा झाल्या त्यांचा अनुकरण (Mimicry) प्रक्रियेच्या संबंधात शोध घेण्याचा प्रयत्न या लेखात करण्यात आलेला आहे. याबाबत पुढील काही मुद्यासंबंधी युक्तिवाद व त्याच्या अनुषंगाने प्रतिपादान करण्यात आलेले आहे. ''जवळजवळ बरोबरी करणारा पण तितकासा नाही.'' या संकल्पनेचा उपयोग (यांना ही संकल्पना ज्ञातही असण्याचे कारण नाही कारण ती अलिकडच्या काळातील आहे.) त्यांनी जे उत्स्फूर्तपणे केले, त्याला मागाहून या 'संकल्पने'च्या रूपाने सूत्रबद्ध करण्यात आले होते. बडोद्याचे नरेश **सयाजीराव महाराज** यांनी पाश्चिमात्यांकडून उपक्रमशीलता आपल्याकडे खेचून घेण्यासाठी केला. हे करताना त्या समाज सुधारणांचा भारतीय संदर्भात वापर केला. असे करून वसाहतवादी जीवनात (म्हणजेच तत्कालीन राज्यकर्त्यांच्या) जे सर्वसामान्यपणे, जे शिष्टसंमत (normailty) समजले जात होते, त्याला **सयाजीराव महाराजांनी** आव्हान दिले होते.

या संबधी अधिक तपशीलात जाण्यापूर्वी, काही महत्त्वाच्या मुद्यांची नोंद घेणे आवश्यक आहे. बडोदा नरेश **सयाजीराव महाराज,** व या कालखंडातील बडोदे संस्थान या विषयी मला जे काही ज्ञान झाले आहे त्यातील बहुतेक ब्रिटिश वसाहतीच्या काळात लिहिल्या गेलेल्या महाराजांच्या चरित्र ग्रंथावरून झालेले आहे. या सर्व ग्रंथाचा उल्लेख या पूर्वी येऊन

गेलाच आहे. परंतु यामुळेच काही चमत्कारिक पूर्वग्रहांचे ते उगमस्थानही ठरलेले आहेत, एकतर हे सारे ग्रंथ **सयाजीराव महाराजांच्या** इंग्रज चहात्यांनी लिहिलेले असल्याकारणाने ते **सयाजीराव महाराजांचे** व्यक्तिमत्त्व कोणाच्याही (खास करून इंग्रजाच्या) पसंतीस उतरेल अशाच शब्दात शब्दांकित करणार हे उघड आहे. परंतु त्याजबरोबर हे **सयाजीराव महाराजांचे** चहाते त्यांच्याबद्दल कितीही सहानभूती, आपुलकी व कौतुक बाळगून असले तरी तत्कालीन वसाहतवादी दृष्टिकोन आणि त्याची जगाकडे पाहाण्याची जी दृष्टी होती, त्याला या चरित्रकारांची बांधिलकी होती. आपण लिहित असलेल्या चरित्र ग्रंथाचे लेखन करताना, ते हा मुद्दा विसरलेले नाहीत. सयाजीराव महाराजानी जी काही लोकोपयोगी धोरणे अंमलात आणली, त्याबरहुकूम ज्या कृती केल्या, हे करणे त्यांना साम्राज्यशाहीने बहाल केलेल्या वरदानामुळे शक्य झाले होते. म्हणूनच या चरित्रकारांनी या पूर्वीच नमूद केल्याप्रमाणे बडोदा नरेश **सयाजीराव गायकवाड** आणि त्यांचे बडोदे संस्थान हे आदर्श व प्रगतीशील आहे असे सांगून त्याचे इतर संस्थानिकांनीही अनुकरण करावे असे सुचविले आहे. ही सूचना साळसूद वाटली वा भासली, तरी ती तशी नव्हती. वसाहतवादी राज्यव्यवस्था अंकित देशाला हितकारक असल्याकारणाने, ती व्यवस्था भारतासारख्या मागासलेल्या देशाला आवश्यकच आहे असे गर्भितपणे त्या सूचनेकरवी सुचित केले जात होते. या एका कारणामुळेच त्यांनी लिहिलेल्या चरित्र ग्रंथातील त्रुटी चांगल्याच लक्षणीय व प्रचंड आहेत. या शृंगापत्तीतून बाहेर पडण्याकरता दोन मार्गांचा अवलंब करण्यात आलेला आहे. एकतर हे मान्यच केले पाहिजे. या चरित्रग्रंथांतून नमूद केल्या गेलेल्या घटना व प्रसंग यांचा वृत्तात अचूक आहे. विषेश करून **स्टॅनलेराईस** यांचे ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस या विद्वत्‌जगतात मानाचे स्थान असलेल्या प्रकाशन संस्थेने प्रकाशित केलेले Life of Sayaji Rao Maharaj III (बडोदा नरेश तिसरे **सयाजीराव महाराज** यांचे चरित्र) आणि **फिलीप सार्जंट** यांनी लिहिलेले व लंडनस्थित प्रकाशन संस्थेने इ. स. १९२९ साली प्रसिद्ध केलेले The Ruler of Baroda (बडोदे संस्थानचे अधिपती) या दोन्ही ग्रंथात सादर केलेला परिपूर्ण असा दस्तऐवज आणि सुक्ष्मात जाऊन सर्व गोष्टी (कागदपत्र घटना) करवी पेश केलेला तपशील यांची बरोबरी आजवर कोणी केलेली नाही व पुढेही केली जाईल असे सध्यातरी दिसत नाही, म्हणूनच पुढील विवेचन या सर्व चरित्रग्रंथावरच मोठ्या प्रमाणात भिस्त ठेऊन केलेले आहे. थोडक्यात सांगायचे म्हणजे अवतरणे देणे, या ग्रंथात देण्यात आलेल्या पत्रव्यवहाराचा संदर्भ देणे, आणि मूलभूत अशा याच प्रकाराचा प्रत्यक्ष घडलेल्या घटनांचा वृत्तांत या प्रकारच्या साहित्याचा हवाला देणे (उदा. बडोदा **नरेश गायकवाड** यांचा दैनंदिन कार्यक्रम, आणि त्यांनी मंजूर करून घेतलेल्या विशिष्ट कायद्यांच्या तारखा) याजबरोबर वसाहतवादी दृष्टिकोनाबद्दल जो पुरावा या सर्व ग्रंथातून उपलब्ध होतो. त्याचा उपयोग या लेखातील विवेचनात केलेला आहे. पण हे एकीकडे करीत असताना या चरित्रग्रंथातून मिळालेल्या माहितीकडे व पुराव्याकडे एका **'अश्रद्ध'** दृष्टिकोनातून पाहून त्या सर्वांचे मूल्यमापनही केलेले आहे.



अनुक्रमणिका

**'आधुनिकता' या समाजातील संकल्पनेत महाराजांनी केलेली सुधारणा**

विसाव्या शतकाच्या सुरवातीला तिसरे **सयाजीराव महाराज** हे युरोपचा दौरा वारंवार करतात. याबद्दल त्याना काहीशी 'कुप्रसिद्धी' प्राप्त झाली होती. ते स्वत: आणि त्याची पत्नी यांना जी शारीरिक दुखणी होती त्यातून आराम पडावा या कारणासाठी या युरोप भेटी वास्तविक होत असत. परंतु ही दुखणी प्रत्यक्षात नव्हतीच, केवळ दौरे करण्यासाठी ते एक निमित्त होते याबद्दल ब्रिटिश साम्राज्यशाहीची खात्री होती. या ठिकाणी तत्कालीन वस्तुस्थिती खास करून लक्षात घेतली पाहिजे. **सयाजीरावांची** पहिली पत्नी **चिमणाबाई** यांच्या बाळंतपणात काही जटील अशी शारिरीक अवस्था निर्माण झाल्याकारणाने इ. स. १८८५ साली मृत्यू पावल्या. हे लक्षात घेऊन महाराज आपल्या स्वत:च्या आणि आपली द्वितीय पत्नी, जिचे नावही **चिमणाबाई** होते, तिच्या शारीरिक प्रकृतीबावत ते फारच काळजी घेत असत. **सयाजीराव महाराज** हे अशाच एकाच युरोपीय दौऱ्यावर गेले असताना इ. स. १९०० साली ब्रिटिश राज्यकर्त्यांनी **कर्झन परिपत्रक** (curzon circular) या नावाने ओळखले जाणारे परिपत्रक सर्व भारतीय संस्थानिकांकडे पाठविले होते. या परिपत्रकानुसार प्रत्येक संस्थानिकाने परदेश यात्रा करण्याअगोदर ब्रिटिश सरकारच्या परवानगीसाठी विनंती करावयास हवी असे सांगण्यात आले होते. ब्रिटिश सरकार भारतीय संस्थानिकांचे संरक्षण करीत असल्याकारणाने त्यांनी आपले शौक आणि वैयक्तिक लहरी यापेक्षा या संस्थानिकांनी आपले संस्थान आणि त्यातील प्रशासनासंबधी जे काही प्रश्न निर्माण होतील त्या विषयी या राज्यकर्त्यांना कर्तव्य आहे, अशी अपेक्षा करणे हा ब्रिटिश सरकारचा हक्कच आहे, असेही बजाविण्यात आले होते. टाईम्सने या परिपत्रकाला इ. स. १९०० च्या ऑगस्ट महिन्यात प्रसिद्धी देताना, असे अगदी स्पष्ट शब्दात लिहिले की हे परिपत्रक खास करून बडोदे संस्थान नजरेसमोर ठेवून काढण्यात आलेले आहे.

**सयाजीराव महाराज** यांच्यावर जो हल्ला करण्यात आला होता, त्यामुळे बुद्धिपुरस्सर आपला अपमान करण्यात आला आहे असे त्यांना वाटणे स्वाभाविक होते. 'गनिमी काव्याचा' अवलंब करून महाराजानी प्रतिहल्ला केला. संस्थानिक केव्हा व कोठे जातात यावर देखरेख व नियंत्रण ठेवणे हेच या परिपत्रकाचे उद्दिष्ट होते, अशी महाराजांची धारणा होती **सयाजीरावांनी** १४ नोव्हेंवर रोजी **सर जॉन वॉटसन** यांना लिहिलेल्या पत्रात म्हटले आहे. या परिपत्रकाने, संस्थानाधिपतींचे हितसंबध आणि त्यांच्या संस्थानाचे हितसंबध यात आपण फारकत केलेली आहे. ही जर वस्तुस्थिती असेल, तर उर्वरित ब्रिटिश अधिपत्याखालील हिंदुस्थानात, अगदी कोणासही कळणार नाही अशा गुपचुपपणे ही संस्थाने नक्कीच गिळंकृत केली जातील.'

संस्थानातील नरेशानी आपले वैधानिक स्वरूपाचा (Legitimate) असा जो आपल्या स्वत:च्या सुखाचा, आणि स्वातंत्र्याचा जो हक्क आहे त्यासाठी भेदरलेल्या अवस्थेत आपल्यावर कृपादृष्टी व्हावी यासाठी ब्रिटिश सरकारचा गोंडा घोळणे त्यांना भाग पडेल. या

अशा प्रकारची वागणूक संस्थानिकांना मिळाल्यानंतर त्यांना स्वतंत्रबाण्याने वागण्याची सवय अंगी लावून घेणे, तसेच चांगली समजली जाईल अशी प्रकृती (Character) प्राप्त करून घेणे हे कदापी शक्य होणार नाही.....याची तर्कशुद्ध परिणती एकच...... या सर्वांमुळे सर्व संस्थानिकांचे आत्मभान व गौरव खालच्या पातळीवर घसरेल. अशा प्रकारे ते अत्यंत क्षुद्रातील (Mean) क्षुद्र ठरतील.' **सयाजीरावांच्या** या पत्रातून दोन मुद्दे अगदी स्पष्टपणे अधोरेखित होतात. **एक** प्रत्येक संस्थानाच्या अधिपतीची प्रकृती किती तकलादू आहे हे त्यातून स्पष्ट होते. **दोन** इ. स. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धानंतर, अप्रत्यक्ष ब्रिटिश राजवटीचा जो काळ आला, त्यातही आपले संस्थान ब्रिटिश राजवट केव्हाही खालसा करू शकते या विचाराची तलवार या संस्थानाधिपतींच्या डोक्यावर नेहमीच टांगती होती.

हे पत्र लिहिल्यानंतर अनेक वर्षांनी हे परिपत्रक सर्वत्र संस्थानिकांच्या हालचालीवर देखरेख ठेवण्यासाठी जे निर्बंध ब्रिटिश सरकार लादीत होते त्या विषयी महाराजानी कर्नल **एस. जे. मिड** यांना लिहिले होते 'काळ जसा जाईल त्याबाबत वाटणारी चिंता कमी-कमीच होत जाणार.' पुढे त्यांनी म्हटले आहे. 'अधिकारावर असलेले लोक आपल्या मनात येईल तसेच वागणारे असले (arbitrary) तर त्या ठिकाणी हे अपरिहार्य आहे. पण त्याचा अर्थ असा नाही की प्रकट झालेली (ब्रिटिश सरकारची) दुष्टप्रवृत्ती (evil) ही नाहीशी झाली आहे.' तत्कालीन ब्रिटिश राज्यकर्त्यांची कारवाई ही लहरी आणि कोणतेही संयुक्तिक कारण नसताना केलेली असते. हे 'शेलापागोटे' **सयाजीराव** महाराजांनी त्या राज्यकर्त्यांना बहाल केले होते. ही कृती करताना त्यांनी शब्द मोजून-मापून वापरलेले नाहीत. आपल्या मनात जे होते त्यांनी फारच परखडपणे व्यक्त केले होते. महाराजांनी पुढे जाऊन असे सांगितले की, "ब्रिटिश सरकारची ही कारवाई दुष्टप्रवृत्ती (evil) प्रकट करणारी आहे." हे अशा प्रकारचे शब्दप्रयोग, स्वत:ची तुंबडी भरणारा, कणा नसलेला (असे बिरुद महाराजांना लाववयाचे झाल्यास) 'साम्राज्यशाहीचा बगलबच्चा व समर्थक 'बिरुद' प्रिय असलेले अशा थोर माणसाला लावणे, याचा अर्थ हे कृत्य करणाऱ्या माणसांचा मेंदूच तपासावयास हवा. ज्या लालनिशाणी लोकांनी भूतपूर्ण सोवियट युनियनची शागिर्दी स्वखुषीने त्यांनी कसली आर्थिक गरज होती म्हणून नव्हे पत्करली होती ते लोक हे असली विधाने बुद्धी धारदार असूनही करीत असत, असा एक मुद्दा कोणी उपस्थित करील. (उदा. डांगे, सरदेसाई रणदिवे) हा मुद्दा वाजवी आहे. हीच शतकातील एक अत्यंत जटील समस्या आहे. (म्हणजे या बुद्धीवान माणसाचे मानस असे का होते) ह्याचा विचार या ठिकाणी प्रस्तुत नाही. मुद्दा एकच आहे **सयाजीराव महाराजांसारखा** स्वाभिमानी व्यक्तीने ब्रिटिश सरकारचे लांगून चालन स्वत:च्या फायद्यासाठी कधीही केले नसते. परतंत्र हिंदुस्थानातील ब्रिटिश राज्यकर्त्यांना आपल्या सारख्या संस्थानिकाना एका झटक्यात (Casually) त्यांच्या स्थानावरून हाकलून देता येते या वस्तुस्थितीची नोंद चतुर व कर्तबगार महाराजांनी आपल्या मनात घेतली नसती तरच ते नवलाचे ठरले असते. परंतु या कातर परिस्थितीत महाराजांनी ब्रिटिश राजसत्तेला आव्हान

देण्याची व वेळप्रसंगी तिच्याशी संघर्ष करण्याची भूमिका घेतली हे उल्लेखून लक्षात घ्यावयास हवे. या आपल्या कृतीने **सयाजीराव महाराज** असे दाखवून देत होते की, **आपल्याकडे असलेल्या सत्तास्थानापेक्षा आपल्याला प्रिय असलेली तत्त्वे अधिक महत्त्वाची आहेत.** याचा अर्थ ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या अन्याय्य धोरणाना विरोध दर्शवून त्याचा परिणाम म्हणून आपले सत्तास्थान गमाविण्याची आपली तयारी आहे या आपल्या निर्धाराचे प्रकटीकरण महाराजानी आणखी एका प्रकारे केले. तत्कालीन ब्रिटिश **व्हाईसरॉय कर्झन** यांची मुदत संपल्याकारणाने ते स्वगृही जाण्यास निघाले. त्यांना निरोप देण्याकरिता जी मेजवानी आयोजित करण्यात आली होती, **त्यात सामील न होता महाराजांनी कर्झनना तार पाठविली. त्यात त्यानी घोषित केले की 'शुभास्ते पंथानाम आपल्या सारख्या माणसाची राजवट भारताच्या वाट्याला कधीही न येवो'.**

**सयाजीराव महाराजांना** बाहेरच्या जगात फारच मानाचे स्थान होते. पण त्यांची जी मानसिक अवस्था होती, त्याबद्दल ते समाधानी नव्हते. म्हणून ब्रिटिश सरकारच्या सार्व-भौमत्वाची टीका करणारी पत्रे पाठविण्याचे काम त्यांनी चालूच ठेवले होते. इ. स. १९०३ च्या ऑगस्ट महिन्यात त्यांनी संभाषणाच्या ओघात असे सांगितले की, 'कोणत्याही महत्त्वाच्या विषयासंबधी (हे सरकार) आपला दृष्टिकोन केव्हा बदलेल याविषयी मला खात्री व आत्मविश्वास नाही. दुर्दैव असे आहे की, भलेपणा (greatness) अथवा स्पष्टपणे दिसणारे भलेपण याला हिंदुस्थानात फारच कठोर वागणूक दिली जाते. म्हणजे त्याचे असे होते, कोणी एखादा संस्थानिक सतप्रवृत्त असतो, लोकहिताची जपणूक करणारा असतो, किंवा तसे करण्याचा तो मनापासून प्रयत्न करतो. पण याचे फलित काय? तर त्याचे ब्रिटिश सरकारशी असलेले संबध अधिक कठोर (harsher) व संघर्षमय होतात. चांगले 'प्रशासन' आणि आधुनिकीकरण या संदर्भात तत्कालीन ब्रिटिश राज्यकर्त्यांची इच्छा व घोषणा किती आशयहीन व पोकळ होत्या, हे महाराजांच्या त्या शब्दातून स्पष्ट झाले आहे एवंच हिंदुस्थानातील संस्थानिक हे एका 'कधीच जिंकणे शक्य नाही.' (no win) परिस्थितीत होते. याचा अर्थ असा की एखाद्या संस्थानिकाने आपल्या संस्थानात 'चांगले प्रशासन' प्राप्त करून दिले, 'आधुनिकीकरणाच्या' दिशेने आगेकूच केली तरी तो ब्रिटिश राज्यकर्त्यांचा रोष ओढवून घेतच असे. या उलट एखाद्या संस्थानिकाने काहीही हालचाल न करता, आपले संस्थान जुन्या पुराणकालीन शिलावस्थेतच राहावे असे धोरण ठेवून संस्थानचा राज्यकारभार केला, तर तोही ब्रिटिश सरकारचा रोष आपल्यावर ओढवून घेणार कारण ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या इच्छेचा तो मानच ठेवीत नाही म्हणून !

**सयाजीराव महाराजांनी** जे काही अवलोकन केले होते. त्यातून निघालेले निष्कर्ष त्यांनी मनाला फारच लावून घेतले असावेत. इ. स. १९०४ साली एक जहाल (radical) अशा नव्या उपक्रमशीलतेच्या निदर्शक अशा अनेक सुधारणा संचाची मोहीम त्यांनी हाती घेतली. महाराजांनी लिहिलेल्या अनेक पत्रातून ब्रिटिश सत्तेबद्दल त्यांचा मनस्ताप, त्या



अनुक्रमणिका

सत्तेबद्दलची अप्रीती, ही ग्रथीत झालेली आहे. तसेच या पूर्वी उदधृत केलेल्या वक्तव्यातही नमूद झालेली आहे. या वक्तव्यात त्यांची ठाम समजून झाली होती की प्रत्यक्षांत 'चांगले प्रशासन' संस्थानी प्रजेला प्राप्त करून देणे, आणि ते 'प्रत्यक्ष कृतीत' उतरविणे. या दोन्हीही कृती, ब्रिटिश राजवटीला धोकादायक वाटत होत्या किंवा किमानपक्षी त्या ब्रिटिश राजवटीला भविष्यकाळात धोकादायक ठरवील अशा प्रकारे, या कृतीकडे ब्रिटिश राज्यकर्ते पहात होते. असे, त्याना मनापासून वाटत असले तरी तत्कालीन पाश्चिमात्य देशात, प्रचलित असेलेल्या प्रशासनानुसार हिंदुस्थानात चांगले सरकार सुस्थापित करणे हे आपले उद्दिष्ट आहे असा दावा ब्रिटिश राज्यकर्ते करीत असत. हा सगळा बनाव मनात ठेवून, सयाजीराव महाराजानी आपल्या संस्थानातील सामाजिक संस्थात सुधारणा करण्यासाठी त्यांनी एक व्यापक मोहीम हाती घेतली. या सुधारणांकरवी एकतर आपल्या संस्थानातील प्रजेला एका वरच्या पातळीवर नेता येईल आणि त्यांना सामर्थ्य प्राप्त होईल. अशी त्यांची श्रद्धा होती. परंतु या त्यांच्या सुधारणा संचासाठी त्यांची कानउघडणी करण्यात येईल हेही ज्ञान त्यांना होते. पण दुसरीकडे ही सर्व कार्यवाही केल्याने ब्रिटिश सरकारच्या दांभिकतेचे वस्त्रहरण होईल याचीही त्यांना खात्री होती. एवंच महाराजांची ही दोन्हीही उद्दिष्टे 'वसाहतवादी' मनोवृत्तीचा जो गाभा होता त्यावर सरळ सरळ हल्ला चढवित होती. **महाराजांच्या 'गनिमी काव्या- तील' ही अत्यंत चतुर अशी खेळी होती.**

हा 'सुधारणा संच' प्रत्यक्ष कार्यवाहीत येण्यासाठी **सयाजीराव महाराजांनी** आपल्या संस्थानातील शासनव्यवस्थेतच फक्त आजवर सुधारणा केल्या होत्या. उदा. महसूल अधिकाऱ्याकडून न्यायदानाचे काम काढून घेऊन ते वेगळया वर्गातील न्यायाधिशांकडे सोपविण्यात आले होते. विद्यमान काळातील 'बहुजन समाजातून' आलेल्या व लालनिशाणी विचारांवर श्रद्धा असलेल्या लोकप्रतिनिधींनी आजवर जे कधीही केले नाही ते महाराजांनी केले होते. पं. नेहरू या अशा लोकप्रतिनिधीचे सर्वात मोठे उन्मेखून सांगावे असे उदाहरण. जयप्रकाश नारायण यांनी पंतप्रधान प. नेहरूंना असे सुचविले होते की, त्यांनी दिल्लीतील सर्वात मोठ्या आणि आलिशान असलेल्या बंगल्यात न राहता, साध्या घरात राहावे. जयप्रकाशानी या संदर्भाच्या लालनिशाणी श्रद्धा असलेल्या लोकांना अत्यंत आदरणीय अशा लेनिनचे उदाहरण पं. नेहरूंना दिले होते. जयप्रकाशानी पं. नेहरूंना असे सांगितले की ऑक्टोबर रशियन राज्यक्रांतीचा जो सर्वाथाने शिल्पकार होता, तो एका चार खोल्यांच्या जागेतच राहत होता. याचे स्मरण त्यांनी ठेवावे. पण तसे काही झाले नाही. ते आलिशान बंगल्यातच राहिले आणि आपल्यानंतर त्या बंगल्यात कोणालाही राहाता येऊ नये, अशी वैचारिक 'मोहिम' निर्माण केली. त्यांच्यानंतर आलेले लालबहादूर शास्त्री आपल्या काँग्रेसी सहकाऱ्यांना म्हणाले होते मला माहीत आहे तुम्ही मला त्या घरात राहू देणार नाही. या पार्श्वभूमीवर **सयाजीरावांची** वागणूक आपण लक्षात घेतली म्हणजे त्यांचे मोठेपण ठसठशीतपणे आपल्या नजरेत येते. **सयाजीराव महाराजांनी** आपल्या दिमतीला असलेल्या शेकडो सेवकांची संख्या कमी करून ती फारच थोड्या संख्येवर आणून ठेवली. इ. स.

१९०२ साली त्यांनी केलेल्या सुधारणांना, त्यांनी जो अत्यंत लक्षणीय व महत्त्वाचा कायदा जारी केला त्याचा उन्मेखून उल्लेख केलाच पाहिजे. या कायद्यानुसार बडोदे संस्थानातील **विधवांना पुनर्विवाह करण्याची परवानगी देण्यात आली होती.** विद्यमान काळातील स्त्री-मुक्तीवादी याचा उल्लेख कधीही करीत नाहीत, हे खास करून त्यांचे पूर्वग्रह चांगलेच प्रदर्शित करते, असेच म्हणावे लागेल.

इ. स. १९०४ पासून, महाराजांच्या सुधारणा विषयक हालचाली झंझावती वेगाने होऊ लागल्या उदा. बालविवाहाच्या बंदीचा कायदा, स्थानिक स्वराज्य संस्थाचा कायदा, या सारख्या महत्त्वाच्या कायद्याचा त्यात अंतर्भाव आहे प्राथमिक शिक्षण, दंड संहिता (Penal code), गुन्हेगारी संबधातील खटले, आणि गुन्हेगारीचे अन्वेषण करण्याची पद्धती (Criminal Procedure) या सर्व विषयांच्या प्राथमिक तपासणीसही सुरवात झाली. मुंबईत **इंडियन नॅशनल कॉंग्रेसचे अधिवेशन भरले होते. त्या अधिवेशनाला जोडून घेण्यात आलेल्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेच्या** (National Social conference) **उद्‌घाटनाचे भाषण सयाजीराव महाराज यांनी केले.** या भाषणात ते म्हणाले,

*'मी हे निमंत्रण स्वीकारले याचे कारण या चळवळीला असलेली माझी सहानुभूती प्रदर्शित करण्यासाठी मी उत्सुक आहे' ही परिषद त्या चळवळीचा एक आदर्श नमुना आहे. ''या पुढे जाऊन ते असेही म्हणाले की शिक्षणाच्या हळूहळू होणाऱ्या प्रगतीबरोबर काही बौद्धिक प्रगती झालेली आहे. तसेच आजवर सामाजिक सुधारणांना तितकी मान्यता मिळत नसे, त्यापेक्षा अधिक प्रमाणात सामाजिक सुधारणांच्या गरजेबाबत मान्यता मिळालेली आहे...... अर्थात आपली जी राष्ट्रीय प्रवृत्ती आहे, जी स्वाभाविक अशी विचार पद्धती, त्याला अनुसरूनच सुधारणानी काम केले पाहिजे. या वैचारिक भूमिकेत जरूर काही तथ्य आहे. कोणत्याही सामाजिक सुधारणा विषयक कल्पनेचा व्यावहारिक वापर करण्यासाठी, त्यात सुधारणा व त्यांचा विस्तार करण्यासाठी, आपल्या (हिंदुस्थानातील) पर्यावरणातील* ***फरक काही घटक*** *चांगलेच समर्थ प्रदीर्घ आहेत, आणि (हिंदुस्थान)चा राष्ट्रातील काही विशिष्ट प्रवृत्तींचा अर्थ या घटकांच्या संदर्भातच लागतो. तसेच अनेक शतकांच्या प्रदीर्घ अशा परकीय व परदेशी अशा, तत्कालीन राज्यकर्त्यालाच व शासन व्यवस्थेला मान्य असलेला आचार व विचार यांच्या प्रभावानंतरही हे घटक भुई धरून आजवर जिवंत राहिले आहेत, ही लक्षणीय बाब आहे हे खरे आहे का?*

गुलामीवृत्तीने केलेले अनुकरण वा नक्कल ही सुधारणांसाठी आणि त्या मूळ दुष्ट (evil) प्रवृत्तीपेक्षा अनेक वेळा पराकोटीची उपायकारक असते. परंतु या अशा शब्दप्रयोगामागे असलेले महान सत्य, राष्ट्राची सर्वसाधारण प्रगती हेच त्या सुधारणा कार्यवाहीत आणण्या-मागचे उद्दिष्ट आहे. तसेच राष्ट्रीय हितसंबधांना उपकारक ठसा त्याना जी सुधारणा आगेकूच करू देते तीच केवळ राष्ट्रीय सुधारणा....

महाराजांनी या भाषणात एक महत्त्वाचा विचार मांडला आहे. कल्पनांचा उगम हिंदुस्थानात वा परदेशात कोठेही होवो. भारतीय पर्यावरणात त्या कल्पना विस्तारित करता

येतील. आणि त्यांच्यात सुधारणाही करता येईल. अशा प्रकारे त्या कल्पनाना लक्षणीय अशी भारतीय प्रकृती प्राप्त करून देता येते. एखाद्या परकीय संकल्पनेचे वा आकृतीबंधांचे केवळ अनुकरण वा नक्कल केल्याने, त्याचा उपयोग कितपत होईल याबद्दल शंकाच आहे. आणि तसे करणे हे धोकादायकही आहे. पण परकीय संकल्पना वा संकल्पचित्रे यांचा वापर मूलत:च विषेश करून भारतात तरी त्रासदायक नसतो. याचे कारण त्या 'दुसऱ्याचे' (other) रूपांतर आपल्या स्वत:त (self) करून घेण्याची कुवत असलेला भारत हा एकमेव अनोखा देश आहे. या विचाराबरोबर आणखी एक लक्षणीय विचार महाराजानी मांडला होता. एक संस्थानाचा नरेश **'राष्ट्रीय-राष्ट्र'** या **संकल्पनेच्या बाजूने जाहीरपणे उभा राहतो ही कृती जिचा खास गौरव झालाच पाहिजे या योग्यतेची होती व आहे.** तत्कालीन ब्रिटिश-हिंदुस्थानातील राष्ट्रीय नेत्यावरोबर आपण आहोत असे ही घोषणा करून **सयाजीराव महाराज** भारतातील जनतेला सांगत होते. इतकेच नव्हे तर भविष्यकाळात हिंदुस्थानला जेव्हा स्वातंत्र्य प्राप्त होईल, त्यावेळी आपले संस्थान हे **हिंदुस्थानापासून अलग असलेले राज्य' नसून तो विशाल स्वतंत्र भारताचा अविभाज्य भाग आहे हेही ते ठणकावून सांगत आहेत.** अर्थातच एखादा छुपा लालनिशाणी प्रा. न. र. फाटक 'छाप' काही विशिष्ट बाबीबाबतच विलक्षण असलेला साक्षेपी विद्वान, या महाराजांच्या विधानाबद्दल असा आक्षेप घेईल की सयाजीराव महाराजांच्या मनात संकल्पित विशाल राष्ट्र रचना असलीच तर त्याबाबतचे विवरण वा तपशील त्यांच्या भाषणात आढळत नाही. थोडक्यात या छुप्या लालनिशाणी प्रा. न. र. फाटकांसारख्या विद्वानांच्या शार्गिदांचे म्हणणे असते. 'सुताने स्वर्ग गाठू नका.' हा आक्षेपाचा उगम जातीयवादी लालनिशाणी प्रवृत्तीतून आलेला असला तरी तो योग्यच आहे. पण हा आक्षेप घेणारांनी तत्कालीन वस्तुस्थिती लक्षात घेणे आवश्यक आहे. **सयाजीराव महाराज** या 'लालनिशाणी' पंडितासारखे एका विशिष्ट तत्त्वप्रणालीच्या अनुरोधाने एखाद्या विषयाचा अभ्यास हाच व्यवसाय असलेले विद्वान नव्हते. महाराज प्रत्यक्ष कृती करणारे, धडाडीचे समाज सुधारणेची तळमळ असणारे संस्थानाधिपती होते. थोडक्यात या संयमात्म्यांनी असे लक्षात घेतले पाहिजे की हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर बडोदा नरेश हे स्वखुषीने विशाल भारतात आपले संस्थान विलीन करणार होते याच अर्थ त्यांना आपल्या गादीचा त्याग करावा लागणार होता.

या 'लालनिशाणी' बुद्धीवंताकडे सहानुभूतीने पाहाणाऱ्या, प्रच्छन्न 'लाल निशाणी', पं. नेहरूच्या काळात ज्यांची भरभराट झाली त्यांना याची ही कल्पना नाही. तो इतिहास आहे **सयाजी महाराज** असे स्पष्टपणे सांगत होते की हिंदुस्थानचे नागरिकत्व (भारतीयत्व) ही संकल्पना 'राष्ट्रीय हितसंबधाला उपकारक आहे' एकदा ही संकल्पना मान्य केली की बडोदे संस्थानच्या भौगोलिक सरहद्दी पार केल्या की, तसे करणे हे 'राष्ट्रवादी प्रवाहात' सामील होण्यासारखेच होते.

सयाजीराव महाराज इ. स. १९०६ च्या अखेरीस अमेरिका आणि इंग्लडची सफर करून



अनुक्रमणिका

परतले. त्यांच्या राजवटीचा रौप्य महोत्सव साजरा करण्याची वेळ आली होती. त्या प्रमाणे तो साजरा झालाही. परंतु इ. स. १९०७ साली महाराजांच्या वाढदिवसानिमित्त जे समारंभ झाले. तो मुहूर्त साधून सर्व समावेशक अशा फार महत्त्वाच्या सुधारणा त्यांनी जाहीर केल्या. त्यांच्या एकंदर राजवटीतील ती त्यांची अत्यंत महत्वाची व लक्षणीय अशी कामगिरी होती. **प्रजाननांपैकी ज्या कोणी कर न दिल्याकारणाने जे थकबाकीदार झाले होते, त्या सर्वांना त्या गुन्हाबद्दल माफी देण्यात आली आणि त्यांची सर्व थकबाकी रद्दबातल करण्यात आली. मातृभाषेतील दिले जाणारे सर्व शिक्षण मोफत करण्यात आले होते. अस्पृश्यांकरिता (दलिताकरिता) दोन वसतीगृहे उघडण्यात आली परदेशात जाऊन शिक्षण घेण्यासाठी पाच शिष्यवृत्त्या जाहीर करण्यात आल्या, बडोदे शहरात नवी इमारत बांधून, त्यात नवी बाजारपेठ वसविण्यात आली, बडोदे शहरातील संपत्तीने गरीब असलेल्या तळागाळातील प्रजाजनांसाठी दोन धर्मादायी संस्था स्थापन करण्यात आल्या. बडोदे शहर वगळून संस्थानाचा जो उर्वरित भाग होता त्यांच्या सेवेसाठी चार रुग्णालये बांधण्यात आली. बडोदे शहरातील नागरिकांना वापरासाठी एका उद्यान व पार्क (Park) प्राप्त होईल अशी व्यवस्था करण्यात आली. व बडोदे शहराला पाणी पुरवठा करण्यासाठी नव्या विहिरी बांधण्यात आल्या.**

याच वर्षी महाराजानी संस्थानासाठी विधानसभेची (legislative Council) ची निर्मिती केली. या विधानसभेत प्रजाजनांनी निवडलेले सभासद बसणार होते. ही एक नवीच संस्था होती. शिवाय या संस्थेला नवे कायदे करण्याचा अधिकार होता. हिंदुस्थानात सामाजिक सुधारणा व्हाव्यात यासाठी जी व्यूहरचना ब्रिटिश सरकारने केली होती. त्याचे सयाजीराव महाराजानी जाहीर केलेल्या आणि प्रत्यक्ष कार्यवाहीत आणलेल्या सुधारणा हे अनुकरण वा त्यांची नक्कल आहे अशा स्वरूपात त्या सुधारणांकडे तत्कालीन ब्रिटिश राज्यकर्ते पाहात असत. परंतु तसे करताना सखेद-अपेक्षा (म्हणजे आपण केलेल्या अपेक्षा पूर्ण करण्यात आल्या याबद्दल खेद) ! एखाद्या विद्यार्थ्याचा क्रमांक पहिला यावा ही अपेक्षा, पण त्याने पहिला क्रमांक पटकाविला याबद्दल खेद) अशाच व्यामिश्र भावनेने त्या सुधारणाकडे ते पहात होते. सयाजीराव महाराजांच्या एका ब्रिटिश चरित्रकाराने असे म्हटले की "ब्रिटिश शासित हिंदुस्थानात ज्या समाजसुधारणा करण्यात आल्या होत्या त्या सर्व किंवा जवळजवळ त्या सर्वच सुधारणांचे अनुकरण बडोदे संस्थानाने आपली कुवत लक्षात घेऊन आणि आपल्या संस्थानाच्या गरजानुसार केले होते."

इ. स. १९०३ साली, तत्कालीन हिंदुस्थानातील लाहोर या शहरातील दयानंद आर्य वैदिक महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांच्यासमोर (या महाविद्यालयाचे नाव प्रत्यक्षात ॲंग्लो वैदिक कॉलेज होते. चुकभूल घ्यावी-द्यावी) केलेल्या भाषणात, त्यांनी आपण केलेल्या सुधारणांचा राष्ट्रावर काय परिणाम झाला आहे याची नोंद घेताना म्हटले होते– या सर्व हिंदुस्थान



अनुक्रमणिका

देशाच्या कल्याणाबाबतची सहानुभूती व दिलचस्पी याचा संदर्भ आपल्या भाषणात आहे. आपल्या सर्वच देशबांधवांचे समान कल्याण (Good) हृदयात असल्याशिवाय आपण आपले कर्तव्य पार पाडले आहे असे कोणीही स्वत:बद्दल समजू नये. **या देशातच एका भागात झालेल्या प्रगतीचा या देशाच्या इतर भागावर परिणाम होणारच अशी माझी श्रद्धा आहे.''** याच भाषणात पुढे महाराजांनी आणखी एक वेगळाच मुद्याचे श्रोत्यांना स्मरण दिले आहे. उदा. सक्तीचे शिक्षण देण्याबाबतची योजना **महाराजांनी** बडोदे संस्थानात, त्याकाळी अलिकडेच जारी केली होती. ही योजना आणि त्यात अंतर्गत असलेल्या कार्यक्रमाला जे यश आले होते, त्यावर त्यांनी आपल्या श्रोत्यांचेही लक्ष केंद्रित केले. पण हे करताना त्यांनी एक सावधगिरीचा इशारा दिला होता. ही योजना आणि या नव्या योजनेच्या जमेच्या बाजूचे मूल्यमापन करताना जो उत्साह असेल तो भावनेने अजिबात भारलेला असता कामा नये, असे त्यांनी अगदी परखडपणे बजाविले होते. थोडक्यात आपल्या या योजनेचे मूल्यमापन केवळ बौद्धिक व शैक्षणिक कसोट्याच वापरून केले जावे असेच महाराज सांगत होते. म्हणूनच इ. स. १९०६ साल उजाडेपर्यंत, प्रयोगादाखल जारी केलेली आपली योजना ही यशस्वी झाली आहे, आणि आपल्या सर्व संस्थानात कार्यवाहीत आणण्याच्या योग्यतेची आहे असा निष्कर्ष त्यानी काढला नाही. एवंच अशा प्रकारे ब्रिटिश शासित हिंदुस्थान आणि बडोद्याव्यतिरिक्त इतर सर्व संस्थानांच्या अंमलाखाली असलेल्या हिंदुस्थानात आपल्या अंमलाखाली येणाऱ्या **संस्थानातील सर्व नागरिकांना मोफत शिक्षण देणारा एकमेव भाग- सयाजीराव महाराजांचे बडोदे संस्थान. हे सक्तीचे प्राथमिक शिक्षण मराठी, गुजराथी आणि उर्दू भाषेत देण्यात येत होते.** या सक्तीच्या शिक्षणाइतक्याच आणखी एका महत्वाच्या योजनेचा शुभारंभ बडोदे संस्थानाने केला. बडोदे संस्थानात वाचनालयांची स्थापना सर्व महत्वाच्या गावातून करण्यात आली. इ. स. १९१० पर्यंत ही चळवळ एकसारखी विकसित होत होती. ***डब्ल्यू. ए. बॉरडन*** (W. A. Borden) *या अमेरिकन तज्ज्ञाचे सहाय्य घेतले गेले होते. सर्व प्रथम बडोदे संस्थानाच्या प्रशासन व्यवस्थेत* ***स्वतंत्र असे बडोदा ग्रंथालय खाते*** (BARODA LIBRARY DEPARTMENT) *निर्माण करण्यात आले होते. यात संस्थानाचे मध्यवर्ती ग्रंथालय, जिल्हा पातळीवरची अनेक ग्रंथालये आणि स्थानिक पातळीवरची वाचन दालने (reading Room) यांचा समावेश होता. या शिवाय* ***'प्रवासी वाचनालये'*** *समाविष्ट करण्यात आली होती. ही वाचनालये ज्या ठिकाणी कायम स्वरूपाची ग्रंथालये तोवर निर्माण झाली नव्हती त्यांना ग्रंथाचा पुरवठा करणार होती. महाराजांची दूरदृष्टी आणखी एका गोष्टीत दिसून येते. ही सतत विकसित होणारी ग्रंथालये (ज्ञान पुरवठा करणाऱ्या संस्था या स्वरूपात सतत) कशी विकसित व्हावीत, ती कशाप्रकारे चालविली जावीत, त्याचा उपयोग कसा केला जावा, याचे शिक्षण देण्यासाठी शैक्षणिक संस्था निर्माण करण्यात आल्या. या ठिकाणी आणखी एक मुद्दा उन्मेखून लक्षात घेतला पाहिजे. महाराज सामान्य प्रजाजनांकडून सूचना वा ज्ञान प्राप्त करून*

*घेण्यासाठी नेहमीच उत्सुक असत.* ***मोटीबाई अमिन*** *आणि* ***मित्रमंडळ*** *या बिगर (संस्थानी) सरकारी संघटनेने बडोदे संस्थानात वाचनालयें स्थापन करण्याची सुरवात या अगोदरच केली होती. या संघटनेच्या या कामास महाराजांनी लगेचच दाद दिली. महाराजानी या संघटनेचा, नेतृत्वाचा आपल्या या ग्रंथालय चळवळीच्या कार्यात उपयोग करून घेतला. या नव्याने हाती घेतलेल्या ग्रंथालय चळवळीबद्दल, त्याचे प्रमुख सल्लागार व त्या विषयातील तज्ज्ञ* ***बॉर्डन*** *यांनी असे म्हटले की, "आज अमेरिकेत साध्य करावयाचे असे अंतिम ध्येय आम्ही अमेरिकत नागरिक मानतो, पण आजवर आम्हा अमेरिकन नागरिकांना ते साध्य झालेले नाही, त्या ध्येयाची ओळख* (introduce) *बडोदे संस्थानाला करून देण्याचा मी चंग बांधला होता..... एवंच अमेरिका जे ध्येय साध्य करण्याची फक्त स्वप्ने बाळगून होते, ते बडोदे संस्थानाला करता येणार होते, आणि काही प्रमाणात त्यानी ते शक्यही करून दाखविले आहे.* ***वाचनालयांच्या संदर्भात बोलावयाचे झाल्यास बडोदे संस्थानाने अमेरिकेला मागे टाकले आहे.*** *गंमत अशी आहे की, अँड्र्यू कार्नेगी या दानशूर व अब्जाधीश अशा धनवान अमेरिकन नागरिकाने पुरस्कार व संपूर्ण सहाय्य दिलेली, अत्यंत विस्तृत आणि तपशिलात जाऊन सुलभ केलेली वाचनालय पद्धती ही या क्षेत्रात अग्रभागी असे समजले जाते. तिला बडोदे संस्थानाने मागे टाकले आहे." महाराजानी दाखविलेल्या, अनुकरणप्रिय उपक्रमशीलतेबद्दल लिहिताना एका वृत्तपत्राने असे नोंदविले की, या ग्रंथालये चळवळीचे तज्ज्ञ मार्गदर्शक म्हणून नियुक्ती करणे याचा अर्थ "अमेरिकेत जी ग्रंथालय पद्धती विकसित झाली आहे तिला लक्षणीय असा तो मानाचा मुजरा आहे. परंतु त्यांची ही नेमणूक गर्भितपणे असे सांगते की या हिंदुस्थानात सध्या विद्यमान असलेली पद्धती ही जुनाट आहे. आणि प्रत्यक्षात जी वापरात येण्यासारखी नाही." या वृत्तपत्राचे हे मत, एका जुन्या ग्रामीण म्हणीप्रमाणे 'नीचे गिरे तो भी टांग उप्पर' या सारखे आहे. त्याचे असे आहे :-* ***बॉर्डन*** *. हे अमेरिकन गृहस्थ हे ग्रंथालय व वाचनालय तज्ज्ञ. त्यांना महाराज पसंत करतात. आणि आपणाला याबाबत सल्ला देण्यासाठी बोलावून घेतात. याचा अर्थ असा आहे की आपले (ब्रिटिशांचे) राज्य असलेल्या हिंदुस्थानात जी काही विद्यापीठाची अशी व्यवस्था आहे, ती जुनाट व प्रत्यक्ष कार्यवाहीत आणण्याच्या दृष्टीने उपयोगाची नाही हाच या वृत्तपत्राच्या विधानाचा गर्भित अर्थ आहे. या वृत्तपत्राच्या पोटात जे खुटखुटत होते ते हे की हिंदुस्थान-सारख्या मागासलेल्या देशातील बडोदा या संस्थानाने, अमेरिकेसारख्या प्रगत देशापेक्षाही वाचनालयाच्या विकास या क्षेत्रात आघाडी मारली आहे. पण त्याजबरोबर अलिकडच्या भाषेत सांगावयाचे म्हणजे– एकतर ब्रिटिश राज्यकर्त्यांनी असे तज्ज्ञ बोलावून अखिल हिंदुस्थानात फार मोठी ग्रंथालय चळवळ उभारलेली नाही. मग ते न करण्यामागे त्यांचे हेतू काहीहा असोत. पण ती चळवळ उभारली नाही ही वस्तुस्थिती आहे. परंतु* ***सयाजीरावांनी*** *या क्षेत्रातही आघाडी मारली होती. त्याला छेद देण्यासाठी आपल्या २ ऑगस्ट इ. स. १९१० च्या अंकात हे विधान या वृत्तपत्राने केले होते. या शिवाय अन्य कोणत्याही प्रकारे या विधानाची 'विरचना'* (deconstruction) *करता येणार नाही.*



अनुक्रमणिका

बडोदे संस्थानातील या सामाजिक सुधारणाच्या संझावाताने, ब्रिटिश पार्लमेंटचे लक्षही या संस्थानाने आपल्याकडे वेधून घेतले. ३१ मार्च इ. स. १९०८ रोजी ब्रिटिश लोकसभेत (HOUSE COMMONS) या बावत प्रश्न विचारण्यात आला. **सर जॉन मोर्ले** हे त्यावेळी सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया (हिंदुस्थानातील घडामोडी संबधीचा मंत्री) होते. सर जॉन मोर्ले यांनी लिहिलेल्या 'On comprmise') या ग्रंथाला भारतातील लिबरल पक्षातील लोकांत फारच मानाचे स्थान होते. लोकसभेत उपस्थित केल्या गेलेल्या प्रश्नाचे स्वरूप दुहेरी होते. एका भागात असे विचारण्यात आले होते की हिंदुस्थानातील बडोदे संस्थानात जी प्रगती चालू आहे. त्याची जाणीव मोर्ले साहेबांना आहे का? दुसऱ्या भागात ही माहिती मोर्ले साहेबांना असल्यास, या सुधारणा हिंदुस्थानातील इतर संस्थानात जारी करण्यात येणार आहेत का? या प्रश्नाचे उत्तर देताना मोर्ले साहेब म्हणाले बडोदे संस्थानात सामाजिक सुधारणाबाबत जे आंदोलन चालू आहे त्यावर आम्ही बारिक लक्ष ठेवून आहोत. परंतु **या**

**सुधारणा ब्रिटिश सरकारच्या अंमलाखाली असलेल्या हिंदुस्थानात कार्यवाहीत आणता येणार** नाहीत. त्याहीपुढे जाऊन हे साहेब असे म्हणाले की हिंदुस्थानातील संस्थानाच्या कारभारात आम्हास हस्तक्षेप करता येत नसल्याकारणाने या सुधारणा बडोदे व्यतिरिक्त इतर संस्थानात जारी व्हाव्यात अशी सक्ती ब्रिटिश सरकारला करता येणार नाही." या उत्तरात मोर्लेसाहेब मोठ्या चतुराईने मूळ प्रश्नाला उत्तर देण्याचे टाळीत होते. एक तर या सुधारणा ब्रिटिश सरकारच्या प्रत्यक्ष अंमलाखाली असलेल्या प्रदेशात अंमलात का आणता येणार नाहीत याबद्दल हिंदुस्थानातील लिबरल (उदारमतवादी) लोकांना प्रिय असलेले **मोर्ले** साहेब काहीही सांगत नाहीत. एवंच 'गोऱ्या माणसांवर मागासलेल्या लोकांना संस्कृती-संपन्न करण्याचे जे ओझे होते (White man's burden) ही कामगिरी करण्याचे ते टाळीत होते. **मोर्ले साहेजांचे** हे उत्तर ब्रिटिश राज्यकर्त्यांची दुटप्पी **राजनीती** चांगल्याच प्रकारे आविष्कृत करते. खरे म्हणजे असे होते की, ब्रिटिश राज्यकर्त्यांना जी कृती योग्य आहे असे वाटत असे ती कृती त्या संस्थानात कार्यवाहीत आणण्यासाठी त्या संस्थानांच्या हक्कावर आक्रमण करण्यासाठी आणि त्यांच्या सत्तेत हस्तक्षेप करण्यासाठी अगदी मुक्तपणे व स्वच्छंदपण करण्याबाबत मागे पुढे पहात नसत[६] **सयाजीराव महाराज** यांच्या अगोदरच बडोदा **नरेश मल्हारराव गायकवाड** यांना पदच्युत करताना ब्रिटिश राज्यकर्त्यांना संस्थानांचे हक्क व सत्ता यांचा सोइस्करपणे विसर पडला होता. बडोद्यासारख्या महत्त्वाच्या संस्थानाची ही कथा. मग इतर त्या मानाने नगण्य संस्थाने विचारात घेण्याचे कारण नाही. बडोदे हे महत्त्वाचे संस्थान असल्याने त्यात हस्तक्षेप करण्यापूर्वी, ब्रिटिश राज्यकर्त्यांना फारच घालमेल करावी लागली होती. नगण्य संस्थानाकडे पाहून नुसते डोळे वटारले तरी भागण्यासारखे होते.

ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या मनात अशी भीती होती की, बडोदे संस्थानात प्रत्यक्ष कार्यवाही झालेल्या सामाजिक सुधारणा हिंदुस्थानात इतरत्रही कार्यवाहीत आल्या तर त्या सुधारणा



अनुक्रमणिका

किती उपयुक्त आहेत, व कल्याणकारी आहेत याची हिंदुस्थानातील लोकांना जाणीव होईल. आणखीही एक पेच होता. गंमत अशी आहे की या सामाजिक सुधारणा, आपल्या संस्थानी राजवटीत प्रत्यक्ष अंमलात आणण्याची कृती एका संस्थानातील नरेशाने केली. याचा गर्भित अर्थ असा होता की, स्थानिक (हिंदुस्थानातील) रहिवाशांच्या प्रशासनाने घेतलेले निर्णयही उपयुक्त व कल्याणकारी असतात. शिवाय आणखीही एक अर्थ सूचित होत होता. तो असा की, तोवर ब्रिटिश साम्राज्यात ज्या ज्या काही सामाजिक सुधारणा विषयक कृती वा कार्यवाही केली गेली, त्यापेक्षा बडोदे संस्थानाने केलेल्या सुधारणा या मूलगामी तसेच नाविन्यपूर्ण (original) आणि श्रेष्ठ आहेत असे समजले जाण्याची शक्यता होती. तसेच ब्रिटिश राज्यकर्त्यांनी याच सुधारणा स्वीकारून, त्या कार्यवाहीत आणल्या, तर या कृती-मागील अर्थ असा झाला असता की, प्रगती करून घेण्यासाठी देशी (native) लोकांकडे, यासंबधी संकल्पचित्रे तयार करणे त्यानुसार कायदे करणे, ते कार्यक्षमतेने अंमलात आणणे, हे सारे करण्याची क्षमता आहे, या वस्तुस्थितीला अनिच्छेने का होईना मान्यता द्यावीच लागली असती. थोडक्यात हिंदुस्थानातील या मागास, स्थितिशील प्रजेवर राज्य करून, त्यांना प्रगतिपथावर नेण्याकरिता त्यांना सुसंस्कृत करण्याकरिता आपण राज्य करतो, हा ब्रिटिश साम्राज्यशाहीचा जो दावा होता. तिच्या मूलभूत प्रकृतीवर प्राणघातक हल्ला करण्यासारखीच **सयाजीराव महाराजांची** कृती होती. म्हणजे त्याचे असे आहे. विषेश करून देशी (native) सामाजिक सुधारणा ज्या काही होतात, जो कोणी करतो, तो ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या कल्पनांचे केवळ अनुकरण करतो, हा जो दावा ब्रिटिश राज्यकर्ते व साम्राज्यवादी करीत होते, तो लक्षात घेता बडोदे संस्थानातील सामाजिक सुधारणांचे अनुकरण करणे, हे त्या साम्राज्यवादी राज्यकर्त्यांना अशक्य होते. ब्रिटिश लोकसभेत या प्रश्नाबाबत जी चर्चा झाली. त्यातून असे सिद्ध होत होते की, **सयाजीराव महाराजांच्या** सुधारणात काहीतरी नवीन (original) होते; काहीतरी बिगर पाश्चिमात्य होते (non western) या मुद्यांची त्या चर्चेत सहभागी झालेल्यांना चांगलीच जाणीव होती. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास ब्रिटिश साम्राज्यवाद्यांनी आपले साम्राज्य कायम टिकवण्यासाठी जी व्यूहरचना केली होती. त्यात बडोदे संस्थानातील सुधारणांचा समावेश करता येत नव्हता. **एवंच गनिमी काव्याच्या लढाईतील सयाजीराव महाराजांचा हा पहिला विजय.**

***सर जॉर्न मोर्ले*** *यांच्या बाजूनेही काही सांगता येईल.* ***मोर्ले*** *यांनी इ. स. १९०६ साली मोर्ले मिंटो सुधारणा जाहीर केल्या तेव्हा त्यांनी बडोदे संस्थानातील सुधारणा विचारात घेतल्या होत्या. खरे म्हणजे अशा प्रकारे एखादे विधेयक मंजूर करावे या कल्पनेबद्दल अनेक वर्षा-पूर्वी चर्चा केली गेली होती. परंतु बडोदे संस्थानात प्रत्यक्षात जे विधेयक अंमलात येणार होते त्यातील संकल्पित विधानसभेकडे सदस्य लोकांनी निवडलेले प्रतिनिधी असणार होते.* बडोदे संस्थानातील **विधेयकता,** हा कळीचा मुद्दा होता. नेमका हाच मुद्दा **इ. स. १९०८ साली ब्रिटिश लोकसभेत चर्चसाठी उपस्थित करण्यात आला होता.** इ. स. १९०९

सालच्या मोर्ले मिंटो सुधारणातही लोकांनी निवडलेले प्रतिनिधी विधान सभेत बसणार होते. यापुढे या दुव्याबद्दलचे जे विवेचन आहे तो केवळ कल्पनाविलास आहे हे खरे आहे. परंतु हा दुवा, असा पल्लवीत करून, त्या आशेकडून अपेक्षित असलेल्या गोष्टी साध्य होणार नाहीत म्हणून त्यामुळे निर्माण होणारे नैराश्यही त्यात अनुस्यूत आहे, हे लक्षात घेऊनच तो कल्पनाविलास केलेला आहे. म्हणजे त्याचे असे आहे, अनेक ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या मते, खुद्द **मि. मिंटो** यांच्या मते मोर्ले-मिंटो सुधारणाद्वारा एकमेकापासून स्वतंत्र अशा, बिगर मुसलमान, आणि मुसलमान अशा मतदार संघाच्या द्वारा विधानसभेचे सदस्य निवडले जाणार होते. हिंदुस्थानातील वर्धिष्णु राष्ट्रवादाची खच्ची करण्याचा तो प्रयत्न होता. बडोदे संस्थानाच्या नरेशाना अभिप्रेत असलेल्या राष्ट्रवादी संकल्पनेनुसार बडोदे संस्थानाच्या प्रजाजनाचे **कोणत्याही प्रकारे धर्म, वा जात असे विभाजन न करता ते प्रतिनिधी सर्व प्रजाजनांचे प्रतिनिधी होते. थोडक्यात ब्रिटिशांच्या फोडा व झोडा या धोरणाला ते गनिमी काव्याने दिलेले आव्हान होते.** ब्रिटिश वसाहतवादाची जी उद्दिष्टे होती; त्याना सहाय्यभूत होण्यासाठी **मोर्ले-मिंटो** सुधारणात धर्म लक्षात घेऊन मुसलमान आणि बिगर मुसलमान अशा स्वतंत्र मतदार संघाचे तत्त्व अंतर्भूत करून, बडोदे संस्थानातील सुधारणाना एका नवा संदर्भ देण्यात आला होता. गंमत अशी आहे की, मोर्ले-मिंटो सुधारणांनी **ब्रिटिश साम्राज्यवादाच्या उद्दिष्टांची परिपूर्णता काही प्रमाणात जरूर केली.** परंतु सरतेशेवटी हे मान्यच करावे लागेल की **राष्ट्रवादाची जी वर्धिष्णू गतिमानता होती, त्यालाही या सुधारणा सहाय्यभूत ठरल्या असे मत अनेक अमेरिकन संशोधक-इतिहासकारानी आवर्जून नमूद केले आहे.**

इ. स. १९०८ साली बँक ऑफ बडोदा लिमिटेडच्या संस्थापनेस परवानगी दिली. या बँकेने थोड्याच काळात स्टेट ट्रस्टी (संस्थानचा जमादारखान्याच्या) कारभार आपल्याकडे घेतला. त्यानंतर थोड्याच दिवसांनी बडोदे संस्थानचा अर्थ व्यवहार आणि या बँकेच्या शाखा (यात बडोद्यापासून त्यामानाने त्या काळी दूर असलेल्या मुंबईचाही समावेश होता उघडण्याचे काम महाराजांनी आपल्या हाती घेतले)

*या बँकेच्या उद्‌घाटन समारंभात महाराजानी जे भाषण केले त्यात त्यांनी अगदी स्पष्ट शब्दात, बँक स्थापनेमागचे उद्दिष्ट जाहीर केले होते. पाश्चिमात्य राष्ट्रात, त्या तारखेपर्यंत ज्या अशा प्रकारच्या संस्था होत्या त्यांना आदर्श मानून त्यांचे आपण अनुकरण करीत आहोत. ही कृती करण्यामागचा आपल्या मनात असलेला युक्तिवाद व भावना त्यांनी आमजनतेला अगदी उघडपणे सांगितली. महाराज आपल्या भाषणात म्हणाले, "संस्थानच्या प्रजाननांना आपली स्वत:ची अशी आर्थिक संस्था हवी होती. या प्रजाजनांच्या या मागणीची परिपूर्ती करणे हेही या बँक स्थापने मागचे सर्व प्रथम व प्रधान उद्दिष्ट आहे. हे लक्षात घेऊन, बडोदे सरकारने या बँकेच्या व्यवहारात कसल्याही प्रकारचा हस्तक्षेप करण्याचे कटाक्षाने टाळले आहे. थोडक्यात या बँकेचे सर्व व्यवहार एका खाजगी कार्पोरेशनकडे सुपूर्द करण्यात आला*

*आहे. हा निर्णय घेताना प्रेसिडेन्सी बँक ऑफ बॉम्बे, कलकत्ता आणि मद्रास, यासारख्या महत्त्वाच्या आर्थिक संस्थानी घालून दिलेल्या आदर्शांचे आम्ही अनुकरण करीत आहोत...... या निर्णयामागचे उघड असे नैतिक तात्पर्य एकच आहे. हिंदुस्थानाने जपानचा उदात्त व धीरोदत्त (noble) आदर्श नजरेसमोर ठेऊन, पाश्चिमात्य विज्ञान, त्यांच्या वित्त संस्था आणि उद्योग यांच्याशी संबंधातील कार्य पद्धतीवर दिर्घोद्योगाने आपण भारतीयांनी प्रभुत्व मिळविण्याचा चंग बांधला पाहिजे........ पाश्चिमात्यांशी स्पर्धा करणे हे मोठे आव्हान या स्पर्धेचा दबाव सातत्याने येत असतो. परंतु त्यापासून संरक्षण करण्यासाठी गतवैभव व संस्कृतीची आठवण करून, त्याविषयी आदर दर्शविणारी कोणत्याही प्रकारची प्रतिगामी प्रतिक्रिया हिंदुस्थानचा बचाव करणार नाही. तसेच हिंदुस्थान ज्या धार्मिक कर्दमात रुतला आहे त्याला त्यातून बाहेर खेचून काढण्यासाठी कितीही उच्च पातळीवरची राष्ट्रभावना हिंदुस्थानाला बाहेर काढणार नाही. राज्यकर्त्यांनी आपणावर ज्यांचा उपयोग करून प्रभुत्व मिळविले, ती सारी अवजारे, व ज्या आधुनिक पद्धती आहेत, त्या सर्वांवर अत्यंत सबुरीने, गंभीरपणे, आणि निश्चयाने आपण एक होऊन राज्यकर्त्यांशी मुकाबला करण्यासाठी त्या अवजारावर व पद्धतीवर प्रभुत्व मिळविण्याची* ***एक राष्ट्र*** *या स्वरूपात कटीबद्ध झाले पाहिजे.*

एवंच या बँकेचेच नव्हे, तर बडोदे संस्थानातील सर्व 'आधुनिक संस्था'चे उद्दिष्ट महाराजानी या भाषणात स्पष्ट केले होते. या उद्दिष्टात 'परकीय स्पर्धेपासून हिंदुस्थानचा बचाव आणि 'आर्थिक परदास्यातून हिंदुस्थानास बाहेर खेचून काढणे.' यांचा अंतर्भाव होता. हिंदुस्थानावर ज्या अवजारांच्या व पद्धतींच्या मदतीने, प्रभुत्व गाजविण्यात येत होते, त्या अवजारांवर व पद्धतीवर आपली मालकी असणे आणि त्यांच्यावर हुकूमत असणे ही हिंदुस्थानात परदास्यातून मुक्तता प्राप्त करून घेण्याची गुरु किल्ली आहे. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास 'देशी' (native) या शब्दाद्वारे केवळ ब्रिटिश सत्तेखालील हिंदुस्थानातील नागरिकांचा समावेश नव्हता. त्यात बडोदे संस्थानच्या प्रजाजनांचाही अंतर्भाव होता. महाराज आपल्या भाषणातून 'राष्ट्रीय' हा शब्दप्रयोग व त्यात अनुस्यूत असलेला संदर्भ वारंवार देत असत. पाश्चिमात्य गोष्टी व संस्था यावर राष्ट्राने नियंत्रण प्राप्त करून घेणे, अथवा महाराज स्वत: सांगत होते त्यानुसार 'आधुनिकतेवर' (modern) नियंत्रण मिळविणे, हेच त्या संदर्भाद्वारे सुचित करण्यात येत होते. तसेच स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याच्या प्रक्रियेत, या नियंत्रणाचे रूपांतर ती प्रक्रिया यशस्वी व्हावी यासाठी कराव्या लागणाऱ्या संघर्षाच्या एकच अवजारात होणारे होते, असेही ते बजावीत होते. या महाराजांच्या गनिमी काव्याने ब्रिटिश राज्यकर्ते चांगलेच चक्रावले होते त्याचे असे आहे, एकीकडे आपण आजवर हिंदुस्थानी लोकांनी जे काही केले पाहिजे तेच महाराज कार्यवाहीत आणीत होते. परंतु आपणच सुचविलेल्या गोष्टी प्रत्यक्ष अंमलात आणल्यानंतर हिंदुस्थानातील स्वातंत्र्य लढ्याला मदतही होणार होती. तत्कालीन ब्रिटिश राज्यकर्त्यांसमोर महाराजामुळे ही शृंगापत्ती निर्माण झाली होती. महाराजांचे मान्यवर ब्रिटिश चरित्रकार **राईस** (Rice) यांनी या

प्रसंगाबाबत जे वर्णन केले आहे, त्यावरून दिसून येते. पाश्चिमात्यांनी प्रवृत्त केलेल्या मुक्तीकडे (Salvation) घेऊन जाणारी एक संस्था या स्वरूपात **मि. राईस** हे या बँकेकडे पहात होते. पाश्चिमात्य आर्थिक व्यवहाराच्या तत्त्वानुसार एकाद्या बँकेची स्थापना करण्यासाठी बडोदे संस्थानातील तत्कालीन नाणी व्यवस्था (COINAGE SYSTEM) जी अत्यंत गुंतागुंताची व कठीणच होती, त्यात सुधारणा होणे आवश्यक होते. अशी सुधारणा केल्याविना या बँकेची स्थापना करणे सामान्यपणे शक्य झाले नसते. परंतु महाराजांना या अडचणींचे भान होते. 'महाराजांनी मोठी हिम्मत दाखवून योग्य तो सल्ला घेऊन, तत्कालीन बडोद्यातील प्रचलित नाणी व्यवस्था पद्धतीत आवश्यक ती सुधारणा केली आणि सरते-शेवटी आधुनिक बँकेचा व्यवहार कसा करावा याच्याशी बडोदे संस्थानातील प्रजाजनांचा काहीही परिचय नसताना, 'बँक ऑफ बडोदे' बँकेची संस्थापना झाली.' असे **मि. राईस** यांनी आपल्या **सयाजीराव महाराज** यांच्या चरित्रात नमूद केले आहे. सहजच मनात असा विचार येतो की आज 'बँक ऑफ बडोदा' या बँकेत काम करणाऱ्या एखाद्या कर्मचाऱ्याच्या मनात, आपणाला या ठिकाणी, नोकरी प्राप्त झाली आहे, याला सयाजीराव महाराजांची दूरदृष्टी कारणीभूत होती असा विचार येतो का? याचे उत्तर नाही असेच येईल !!

असो हिंदुस्थान हे 'एक राष्ट्र' आहे, यावर महाराजांची असलेली श्रद्धा, आणखी एका वेगळ्याच प्रसंगातून अगदी स्पष्टपणे आविष्कृत होते. इ. स. १९०८ च्या उन्हाळ्यात **हिज हायनेस आगाखान** व सयाजीराव महाराज यांची भेट झाली. या प्रसंगी झालेल्या संभाषणात महाराज म्हणाले,

*"भारतावरील ब्रिटिशांच्या राज्याचा...... केवळ हिंदुस्थानातील जनतेच्या संघर्षामुळे अंत कधीही होणार नाही. परंतु जगातील परिस्थिती ही मूलभूतपणे इतकी बदलणे हे अपरिहार्य असल्यामुळे ब्रिटिश साम्राज्य सर्वस्वी नाहीस होणे या घटनेस प्रतिबंध करणे, कोणत्याही, कोणाच्याही प्रयत्नाने शक्य होणार नाही. ब्रिटिश गेल्यानंतर पहिल्या प्रथम या कचऱ्यागत (Rubbishy) संस्थानास निकालात काढावे. लागेल. या संस्थानाधिपतींच्या तथाकथित राजवटी नाहीश्या झाल्याशिवाय हिंदुस्थान या राष्ट्राची निर्मिती होणे कधीही शक्य होणार नाही हे मी आपणास सांगत आहे." या संस्थानाधिपतींच्या अधिपत्याखाली असलेल्या राजवटी या उपयुक्त, संघटनात्मक आणि घटनात्मक स्वरूपाच्या राजवटी कधीतरी बनतील ही शक्यताच डलहौसीने नष्ट करून टाकली होती.*

इ. स. १९११ च्या सुरवातीला युरोपातील सफरीच्या वेळी बडोदे संस्थानाच्या **महाराणी चिमणाबाई** यांनी आपले The Position of women in Indian Life (हिंदुस्थानातील जीवनात स्त्रियांचे स्थान) हे पुस्तक प्रसिद्ध केले या ग्रंथात अखिल युरोपखंड, अमेरिका, जपान, या सर्व देशातील चळवळीच्या यशाचे व अपयशाचेही मूल्यमापन केलेले आहे. या ग्रंथात विद्यमान काळातील नव्या विचारांशी मिळत्या-जुळत्या अनेक जहाल विचार व ०कल्पना आहेत. उदा. स्त्री-श्रमशक्तीची होत असलेली पिळवणूक याबद्दल परखड टीका व

संशोधन, वीजपुरवठा करणाऱ्या सहकारी बँकांची स्थापना व्हावी यासाठी शिफारस आणि पुरुषांच्या प्रभुत्वाखाली असलेल्या व्यवसायात असलेल्या स्त्रियांच्या परिस्थितीबद्दलची चर्चा या चर्चेत तत्संबधीचे कायदे, त्यांच्या अंमल बजावणीची तपासणी आणि जाहिराती यांचाही समावेश आहे. हे सर्व विचार महाराणी साहेबांनी फारच खुबीने मांडले आहेत. महाराणी साहेब स्वत: आणि त्यांचे यजमान ज्या काही सुधारणा करीत होते, त्याला अधोरेखित करणारे ते विधान आहे. त्यात त्या म्हणतात,

*"येथवर नमूद केलेल्या प्रकल्पातील काही 'हिंदुस्थानातील स्त्रियांना आपलेसे* (appeal) *वाटतील याबद्दल संशय नाही परंतु पाश्चिमात्य कल्पनाबद्दल गुलामगिरी दर्शविणाऱ्या स्वरूपाचे अनुकरण करण्यापासून जागरुक असण्याची आवश्यकता आहे हे त्यांनी लक्षात ठेवल्यास फारच चांगले. प्रत्यक्ष राष्ट्र आपली बुद्धी वापरून केलेल्या साक्षेपी निरीक्षणातून दुसऱ्या एकाद्या राष्ट्राकडून काही शिकण्याची शक्यता आहे. परंतु त्याजबरोबर आपली स्वत:ची अशी खास देशी* (Racial) *प्रकृती आहे, ती कायम राखण्यासाठी प्रयत्नशील राहिले पाहिजे. पुरुषांनी स्त्रियांची नक्कल करू नये, त्या सारखेच हे आहे. परंतु या दोन्ही गटातील प्रत्येकाने आपली स्वत:ची अशी जी विशिष्ट खासियत व प्रकृती आहे, त्यापासून जास्तीत जास्त लाभ उठविला पाहिजे."*

पाश्चिमात्यांच्या संस्था, त्यांच्या चालीरीती यांचा उपयोग करावा, त्या 'आपल्याच' असाव्यात हा विचार त्या काळात हिंदुस्थानातील 'आहेरे' वर्गाच्या मनात सदैव घर करून होत्या. परंतु त्या आपल्याच असाव्यात या सर्वत्र आढळून येणाऱ्या संकल्पनाला महाराणी साहेबानी पाश्चिमात्याचे अनुकरणाच्या विचाराला वा संकल्पनेला 'हिंदुस्थानी मार्गानी त्यात संरचनात्मक फरक' करून एक अगदी सर्वोच्च अशा उदात्त पातळीवर (SUBLIMINAL) नेऊन ठेवले होते. तेही अशा प्रकारे की कोणत्याही देशाचा सीमा न मागणारा हा (SUBLIMINAL) अविचार परकी राहिला नव्हता, तर हा विचार तो अस्सल 'देशी' होणे, या विचाराला पुन्हा एकदा उजाळा मिळाला होता. परंतु त्याविषयाची व्याप्ती आखीव-रेखीव झाली नव्हती. या ग्रंथ प्रकाशनाच्या निमित्ताने हे विचार आम जनतेसमोर मांडले गेले.

**३ राजद्रोह (Sedition)**

एकीकडे हा सुधारणांचा धुमधडाका चालू होता. त्यावेळी दुसऱ्याही अनेक घटना घडल्या : महाराजांनी या अगोदर केलेल्या कृतीच्या संदर्भात, त्यांच्यावरती संशयाचे पटल पसरलेले होते. इ. स. १९०९ च्या ऑगस्ट महिन्यात महाराजांना ब्रिटिश व्हाईसरॉयकडून एक पत्र आले. त्यात ब्रिटिशांच्या अधिपत्याखाली असलेला भाग आणि संस्थानांच्या नरेशांच्या अखत्यारित येणारा प्रदेश, या दोन्हीही विभागात राजद्रोहाला प्रोत्साहन देणाऱ्या ज्या चळवळी केल्या जातील त्या संबंधी इषारा देण्यात आला होता. इंग्लंडमध्ये एका ब्रिटिश अधिकाऱ्याचा खून करण्याचा यशस्वी ठरलेला प्रयत्न आणि त्याच्या जोडीला ब्रिटिश भारतात सातत्याने उदयास येणारे आणि संख्येने वाढत असलेले 'जहाल' राष्ट्रवादी

या दोघांविषयी ब्रिटिश राज्यकर्ते चिंतेत होते. राष्ट्रवाद्यांबद्दल त्यांच्या मनात संशय कायमचाच होता आणि म्हणूनच त्यांनी वचावाचा पवित्रा घेतला होता.

*महाराजांना आलेल्या पत्रासारखेच पत्र सर्वच संस्थानातील नरेशाना पाठविण्यात आले असल्याकारणाने **सयाजीरावानी,** त्या पत्राला लगेच उत्तर पाठविले नाही. या ऐवजी **शिक्षणाची प्रकृती आणि त्याचे उद्दिष्ट** या विषयावर बडोद्याच्या कॉलेजमध्ये व्याख्यान दिले. त्यात त्यांनी हिंसक कृत्यांचा स्पष्ट शब्दात निषेध केला. परंतु या भाषणातील दोन अत्यंत महत्त्वाच्या व मोक्याच्या ठिकाणी त्यांनी राजद्रोहाचा उल्लेखही केला नाही वा त्यांचा संदर्भही दिला नाही. महाराजांचे ते एकंदर प्रतिपादन फारच चतुराईचे होते. ते म्हणाले, 'शिक्षण पद्धतीमुळे समाजातील सर्वांना नाहीतरी काही व्यक्तींना अराजक आणि गुन्हेगारी प्रवृत्तीकडे घेऊन जाते. शिक्षण पद्धतीच चुकीची (Unsound) आहे. (अर्थातच व्यंजनने ते असे सांगत होते की, ब्रिटिशांनी अमंलात आणलेल्या शिक्षण पद्धतीमुळे 'राजद्रोह'सारखे काही घडले तर ती शिक्षण पद्धतीच चुकीची आहे !) महाराज पुढे असे म्हणाले की हा नवा धोका– ही अराजक आणि हिंसेकडे घेऊन जाणारी प्रवृत्ती निपटून काढावयाची असेल तर.....! एवंच हे भाषण वस्तुत ब्रिटिश साम्राज्यशाहीचा अंत करण्यासाठी शांततामय संघर्ष करण्यासाठी प्रोत्साहन देत होते.*

या भाषणानंतर थोड्याच दिवसानी **अहमदाबाद** येथे **लॉर्ड मिंटो** यांचा खून करण्याचा अयशस्वी प्रयत्न झाला या प्रयत्नात सहभागी झाल्याबद्दल ज्या तरुणांवर आरोपपत्र दाखल करण्यात आले होते ते सर्व तरुण विद्यार्थी बडोद्यात वास्तव्य करून होते. **लॉर्ड मिंटो** यांनी नोव्हेंबर महिन्यात बडोदे संस्थानला भेट देण्यासाठी आगेकूच केले. लॉर्ड साहेबांच्या स्वागतासाठी जो समारंभ झाला त्यावेळी बिटिशांच्या सार्वभौम सत्तेशी आपण एकनिष्ठ आहोत हे महाराजांनी जाहीर केले होते. त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केली. परंतु याही पुढे जाऊन ते म्हणाले 'देशाच्या प्रशासनांमध्ये प्रजाजनांना त्यांचा योग्य वाटा असावयास हवा आणि प्रजाजनांना हे सरकार आपले आहे असे वाटावयास हवे ! लॉर्ड मिंटो साहेबांनी या भाषणास अत्यंत लक्षणीय ठरेल असा प्रतिसाद दिला. त्यांनी आपल्या भाषणात महाराजांनी बडोद्यात केलेल्या सर्व सुधारणांची स्तुती केली आणि आपणास देण्यात आलेल्या शाही पाहुणचाराबद्दल आभार मानले.

या समारंभानंतर अनेक दिवसानी व्हाईसरॉय साहेबानी बडोद्याहून प्रयाण केले. यानंतर महाराजांनी 'राजद्रोहा' संबधीच्या परिपत्रकाबद्दल आपला प्रतिसाद व्यक्त केला. महाराजांनी आपल्या पत्रात असे म्हटले होते की आपल्या स्वतःच्या संस्थानात राज्यद्रोही प्रवृत्ती प्रत्यक्ष किती प्रमाणात पोचल्या आहेत यांचे ज्ञान त्यांना नाही. परंतु या बाबत त्यांनी काही चौकशी केली आहे, आणि या स्वरूपाच्या कोणत्याही अवैध हालचालीबद्दल सदैव जागरूक राहण्यासाठी आपल्या मंत्र्याना सांगितले आहे.

इ. स. १९१० सालच्या २७ जानेवादी रोजी ब्रिटिश साम्राज्यशाहीचे मुखपत्र समजल्या



अनुक्रमणिका

जाणाऱ्या **'टाईम्स'** मध्ये, एक लेख प्रसिद्ध करण्यात आला. या लेखात 'राजद्रोहा'विरुद्ध जे युद्ध चालू होते, त्यात सक्रियपणे सहभागी झाल्याबद्दल सर्वच संस्थान नरेशांची स्तुती करण्यात आली होती. **अपवाद फक्त बडोदे संस्थानाचा** या लेखात असा दावा करण्यात आला होता की, बडोदा नरेश **सयाजीराव महाराज** यांनी आपल्या संस्थानातील राजद्रोही चळवळी व कट यांच्याबद्दल माहिती नाही असे म्हटले होते. परंतु हे महाराज राज्यद्रोही-विरोधी जे आंदोलन आहे त्याच्याशी आपल्या बांधिलकीला फक्त 'हातचा राखून (gualified) पाठिंबा देण्यास राजी होते. **लॉर्ड मिंटो** यांनी नोव्हेंबर महिन्यात महाराजानी जे उत्तर पाठविले होते, तेच या **टाईम्समध्ये** प्रसिद्ध झालेल्या उत्तराची गंगोत्री होती.

**महाराजानी लॉर्ड** साहेबांच्या पत्राला दिलेले उत्तर व त्यात त्यांच्यावर होणाऱ्या टिकेला दिलेला प्रतिसाद हा इ. स. १९१०च्या २५ जानेवारी रोजी प्रसिद्ध झालेल्या **अमृत बझार पत्रिकेच्या** अंकामुळे जगाला माहीत झाला. हे दैनिक त्या काळापासून (आजही ते विद्यमान आहे) राष्ट्रवादी विचारांचे वृत्तपत्र. हिंदुस्थानातील ब्रिटिश सरकारच्या धाकदपटशाशी मुकाबला करण्याकरता मोठ्या धैर्याने उभे राहिल्याबद्दल या अंकात महाराजाची स्तुती करण्यात आली होती. **अमृत बझार** पत्रिकेतील वृत्तांत प्रसिद्ध झाल्यानंतर **टाईम्स** या दैनिकातील तो लेख लिहिला गेला होता हे निश्चित. पण हा लेख छापून त्यापुढे जाऊन, **अमृत बझार** पत्रिका या दैनिकाची मल्लीनाथी अशी होती की हिंदुस्थानातील ब्रिटिश सरकारच्या विरोधी ज्या शक्ती होत्या त्यांच्याशी महाराजानी एकजूट केल्याचा तो पुरावा होता.

युरोपमध्ये सफरीस गेले असताना, इ. स. १९११च्या ११ जुलै रोजी लॉर्ड क्रेवे (CREWE) सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया (भारत विषयक कारभार मंत्री) यांनी महाराज लंडन मधील महाराजांच्या निवासस्थानी भेटले. हिंदुस्थानातले नवे व्हाईसरॉय लॉर्ड हार्डिंग्ज यांच्याबरोबरचे आपले संबध हे दिवसेदिवस अधिक अधिक बिघडत चालले आहेत असे महाराजांना वाटत होते. ही कटुता वा संघर्ष (Friction) यांची प्रकृती काय आहे, आणि त्याच्यावर उपाय म्हणून काही मार्ग आहे का याचा शोध घ्यावा असेही महाराजांना वाटत होते. लॉर्ड क्रेवे यांनी महाराजांना असे सांगितले की, **इंडिया हाऊस गँगने** महाराजानी खास सहानभूती दाखविलेली आहे. या गँगचे **कृष्णवर्मा** हे प्रमुख होते. तसेच महाराजांनी **बिपिनचंद्र पाल** यांना मदत केलेली आहे. या ठिकाणी **इंडिया हाऊसबद्दल** दोन शब्द सांगणे अप्रस्तुत होणार नाही. खरे म्हणजे त्याची आवश्यकता नाही. याचे कारण **'नवी क्षितिजे' एक लेखक** व **नवी क्षितिजेच्या** संपादकांचे **खास परममित्र (कै) श्री. वि. श्री. जोशी यांच्याविषयी स्वत:च्या बेताच्या आर्थिक परिस्थितीतही पदरमोड करून,** लिहिलेल्या भारतीय क्रांतिकारकांच्या चरित्रांचे ते मान्यवर लेखक. यांनी नवी क्षितिजेतील एका लेखात तपशिलात जाऊन इंडिया हाऊसबद्दल विस्ताराने लिहिलेले आहे. पण त्याला अनेक वर्षे होऊन गेली. म्हणून वाचकाला त्याचे विस्मरण होणे स्वाभाविक आहे म्हणून हे दोन शब्द. हिंदुस्थानातून ब्रिटनमध्ये अभ्यास करण्यासाठी गेलेल्या विद्यार्थ्यांसाठी **कृष्णवर्मा** एक वसतीगृह चालवीत असत. तसेच ते **इंडियन सोशऑलजिस्ट** (हिंदुस्थानाचे

समाजशास्त्र) या नावाची एक पत्रिकाही प्रसिद्ध करीत होते. **बिपीनचंद्र पाल** हे एका राष्ट्रवादी वृत्तपत्राचे संपादक होते. या वृत्तपत्राला एकेकाळी बडोद्यात वास्तव्य करून असलेले अरविंदा यांनी ब्रिटिश राज्यकर्त्यांला विरुद्ध लिहिलेले अनेक लेख या वृत्तपत्रात प्रसिद्ध झाले होते. **मादाम कामा यांच्याशी महाराज** आणि त्यांच्या पत्नी या दोघांचाही परिचय होता असाही आरोप करण्यात आला. **मादाम भिकाजी कामा (१८६१-१९३६)** या एक कट्टर राष्ट्रवादी भारतीय. हिंदुस्थान सोडून त्या ब्रिटन युरोपमध्ये राहावयास गेल्या होत्या. **लेनिन व कृष्णवर्मा** या दोघांवरही जबरदस्त प्रभाव त्यांनी पाडला होता. वसाहतवादाचा पराभव करण्यासाठी हिंसा वर्ज्य न मानणाऱ्या क्रांतिकारी डावपेचांचा अवलंब केला पाहिजे या विचाराचे समर्थन हे दोघेही करीत असत. ब्रिटिश विरोधी साहित्य लिहून घेणे, ते छापून त्याचे वितरण करणे यासारख्या उद्योगात त्या सदैव गुंतलेल्या असत असा त्या काळी समज होता. त्यात तथ्य नव्हते असे नाही. आपण **मादाम कामा, कृष्णवर्मा व बिपिनचंद्र पाल** या तिन्हीही व्यक्तींना ओळखतो व त्याना भेटलो आहोत. हे महाराजांनी मान्य केले. पण या कृतीत काही गैर आहे अगर त्याला राज्यद्रोही कृतीचा वास येतो, याचा इन्कार केला. या तिन्हीही व्यक्तींबरोबर आपल्या व्यवहार व संबध का आहेत व ते कशा प्रकारचे आहेत, याविषयी समर्पक वाटतील अशी कारणे अगदी साळसूदपणे त्यांनी सांगितली. त्याजबरोबर महाराजानी असे ठणकावून सांगितले की आपल्यावर करण्यात येणारे बिनबुडाचे आरोप, सूचक पण पुरावा नसलेली विधाने आणि परिस्थितीजन्य पुरावा यांचा आधार घेऊन लॉर्ड महाशय कृती करीत आहेत. हे आरोप करताना सयाजीराव महाराजांनी काही गैर बेकायदा वा ब्रिटिश सरकार विरोधी काही कृती वा हालचाली केल्या आहेत याबद्दल लॉर्ड साहेबांकडे काहीही पुरावा नाही. हे सारे ते सांगत होते तरी महत्त्वाच्या राष्ट्रवाद्यांशी आपला परिचय आहे, त्यांच्याशी आपले संबध आहेत, हे वस्तुत: महाराजांनी मान्य केले होते. ते काहीही असो, एकमेकाबद्दल आदरच आहे, असे सांगत **लॉर्ड क्रेवे** यांनी या भेटीची सांगता केली. पण तसे असले तरी **सयाजीराव महाराजांना** त्यांनी इषारा दिला होता हे देखिल अगदी स्पष्ट आहे.

**सर चार्लस क्लेपलँड** हे हिंदुस्थानातील Criminal Intelligence Department (गुन्हेगारी बाबतची सर्व प्रकारची माहिती जमा करणारी गुप्त पोलिसी संघटना) या खात्याचे प्रमुख होते. यांच्या आणि **लॉर्ड हार्डिंग्ज** या दोघांच्या हुकुमावरून महाराजांच्या युरोप सफरीत त्यांच्यावर सदैव सक्त नजर ठेवण्यात आली होती. (प्रत्यक्षात वस्तुस्थिती आणखीनच गमतीदार होती) महाराजांचा 'गनिमी कावा' ब्रिटिश राजवटीने जाणला नव्हता, असे समजणे फारच भोळसटपणाचे ठरेल, महाराजांच्या चतुरतेची, त्यांच्या गनिमी काव्याप्रमाणे या बाबतीतही प्रचिती येते. त्यांनी राज्यकर्त्यांचे मानस व त्यांच्यावर असलेली सामाजिक बंधने ही अगदी यर्थायपणे जोखली होती. भारतातील बहुसंख्य लोकांचे आवडते पंतप्रधान पं. नेहरू अथवा त्यांची सुकन्या **कै. इंदिरा गांधी** यांच्याशीतुलना करता ते 'सभ्य' राज्यकर्ते होते, हा मुद्दा निर्विवाद आहे; हे **कै. इंदिरा गांधीनी** आपल्या पंतप्रधानपदाचा



अनुक्रमणिका

बचाव करण्याकरिता लादलेल्या' आणीबाणीनंतर हे सिद्धच झाले आहे. आपण केलेले कायदे हे आपण राज्यकर्ते असलो तरी पाळले पाहिजेत निदान बाहेरच्या जगाला आणि खास करून ब्रिटनमधील लोकप्रतिनिधीनाही तसे दिसावयास हवे असा त्या ब्रिटिश राज्यकर्त्यांचा आग्रह होता. आपले 'देशी' राज्यकर्ते असला विचार व बंधने ही अप्रस्तुत आहेत असे मानतात. या ब्रिटिश मानसाचा महात्मा गांधी व सयाजीराव महाराजांनी पुरेपूर फायदा घेण्याचे ठरवूनच आपल्या हालचाली केल्या होत्या. कोणाला हे कल्पित वाटेल, एवढ्याचसाठी ही पुढील प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टीविषयीचा किस्सा. दुसऱ्या महायुद्धात अमेरिकेने ब्रिटिशांच्या बाजूने पदापर्ण केल्यानंतर जर्मन जहाजांना जे संदेश पाठविले जात होते, ते टिपून त्यांची उकल करून, त्यानुसार कारवाई करण्यासाठी संघटना उभारण्याचा प्रस्ताव अमेरिकेतील संरक्षण चिटणासानी (मंत्र्यानी) सादर केला. पण प्रशासन मंत्र्यानी त्याला अगदी नि:संदिग्ध-शब्दात नकार दिला; व हा नकार देताना सांगितलेले कारण तर आपणा भारतीयांना फारच गमतीदार वाटेल असे आहे. ते म्हणाले 'Gentelmen do not read somebody elses mail !!' संरक्षण मंत्रालयाने, या प्रशासन मंत्र्याला पत्ता न लागू देता जर्मनांच्या गुप्त लिपीत पाठविल्या जाणाऱ्या संदेशाची उकल करण्याकरिता संघटना निर्माण केली व ती संघटना कार्यरत झाल्याकारणाने अनेक अमेरिकनांची प्राणहानी वाचली. संरक्षण मंत्र्याने असे सांगितले की, देशाचे संरक्षण करणे व त्यासाठी आवश्यक असेल ती कारवाई करणे हे माझे काम आहे हे लक्षात घेऊन मी ही संघटना उभारली. पण कळीचा मुद्दा वेगळाच आहे. अँग्लो सॅक्सन मानसाला आपणास समोर जावयाचे आहे याची पूर्ण कल्पना असल्याकारणाने त्याने ही संघटना उभी करण्यात चापलुसी दाखविली होती. सामान्य भारतीयांना या ब्रिटिश मानसाची जाण असण्याचा प्रश्नच नाही. पण सयाजीराव महाराजांसारख्या चतुर, दूर धोरणी, दुरदृष्टी असलेल्याने 'ब्रिटिश मानस' जाणावे हेच महत्त्वाचे आहे. एवंच महाराजांना आपल्यावर ब्रिटिश राज्यकर्त्यांची फारच सक्त व बारीक नजर आहे हे चांगलेच ठाऊक असले पाहिजे. ब्रिटिश राज्यकर्ते प्रामुख्याने एका कारणाने चिंताग्रस्त होते. बादशहा पाचवे **किंग जॉर्ज** यांच्या हिंदुस्थान भेटीची तारीख जवळ येत असल्याकारणाने, सयाजीराव महाराजांच्या हालचालीवर बारीक नजर ठेऊन त्यांची दखल घेण्याचे ठरविले होते. यालाही एक खास कारण होते, बादशहांच्या आगमनानंतर भरविण्यात येणारा दिल्ली दरबार इ. स. १९०२ साली सातवे **एडवर्ड** यांच्या आगमनानंतर 'दिल्ली दरबार' भरविण्यात आला होता. त्या प्रसंगी महाराजांनी केलेल्या वर्तणुकीमुळे छोटीशी खळबळ उडाली होती. महाराजानी प्रथम त्याप्रसंगी निघालेल्या हत्ती मिरवणुकीमध्ये (elephant processoin) मध्ये सामिल होण्यास प्रथम नकार दिला होता. नंतर बडोदे संस्थानातील त्याकाळातील प्रभारी रेसिडेंटच्या 'शिफारसी'नुसार त्यात सामिल होण्याची तात्पुरती तडजोड केली होती. महाराजांचा 'गनिमी' काव्याचा व त्यात अनुस्युत असलेल्या डावपेचांचा विचार करता महाराजानी नकार दर्शवून

ब्रिटिश सरकारचा प्रतिकार करण्याबाबत आपली कुवत किती आहे व राज्यकर्ते असा नकार दिल्यानंतर काय करतात व हे जाणून घेण्यासाठी ही कृती केली असावी. त्याच्या या प्रसंगानंतरच्या वागणुकीवरून या विधानाची यथार्थता पटावी.

**आनंद बझार पत्रिके**सारख्या राष्ट्रीय विचारांच्या वजनदार वृत्तपत्राने, महाराजांची अशी स्तुती करावी त्यांचा असा उदोउदो करावा हा प्रश्न सहजिकपणे पहिल्या परिपत्रकात जो प्रतिसाद प्रत्यक्षात दिला गेला तो फारसा क्रांतिकारक होता असे नाही. महाराजांनी त्या अगोदर केलेली भाषणे, त्यांचे लिखाण, आणि प्रत्यक्ष कृती या संदर्भात तो प्रतिसाद तसा चांगलाच मवाळ होता, गोम नेमकी याच ठिकाणी आहे. विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात 'गनिमी' काव्याचा आश्रय घेऊन महाराजांनी पारतंत्र्याचा प्रतिकार व विरोध दर्शविण्याकरता अनेक प्रयत्न केले होते. खास करून युक्तिवाद व व्यापक दृष्टिकोन यांचा वापर करून 'भारतीय आधुनिकरणाची निर्मिती करण्याचे प्रयत्न करण्यात आले होते. राष्ट्रवाद्यांचा नजरेतून त्यांचे हे वागणे निसटलेले नव्हते. **नुकत्याच जन्माला आलेल्या राष्ट्रवादी चळवळीत ते अत्यंत लोकप्रिय असे 'हिरो' बनले होते.** त्यांची प्रतिमा या राष्ट्रवाद्यांच्या मनात पक्के स्थान पटकावून होती. अनेक सभा-संमेलने आणि त्याच प्रकारच्या अनेक प्रसंगी त्यांना उद्घाटनासाठी व प्रमुख व्यक्ती म्हणून बोलण्यासाठी जी अनेक आमंत्रणे येत होती, ती 'प्रतिमा' किती यथार्थ होती याचा अत्यंत बोलका पुरावा आहे हे कोणालाही नाकारता येणार नाही. म्हणूनच महाराजांवर राजाद्रोहाचा जो आरोप करण्यात येत होता त्याचे मूळ इ. स. १९०९ ते १९११या दोन वर्षाच्या दरम्यान पडद्याआड घडलेल्या घटनात नव्हते. गेल्या दशकात (१९००-१९१०) महाराजांनी 'गनिमी' काव्याचा अवलंब करून आधुनिकतेचे 'अनुकरण' करण्याची जी खेळी केली होती त्यात ते आहे हे सर्व चतुर राष्ट्रवाद्यांनी मनोमन ओळखले होते. महाराजांच्या इ. स. १९००-१९१० या सालातील त्यांच्या सर्व कृतीमुळे त्यांच्यावर 'राज्यद्रोहा'चा आरोप झाला होता, याचा पुरावा एका मान्यवर ब्रिटिश लेखक **कोपलँड** (copland) यांच्या लिखाणात अगदी स्पष्टपणे नमूद केलेला आहे. **कोपलँड** साहेबानी आपणास असे सांगितले आहे की 'राज्यद्रोहा'चा आरोप पुढे नमूद केलेल्या घटनामुळे केला गेला. १) अरबिंदो घोष हे तत्कालीन प्रख्यात राष्ट्रवादी. हे बडोदे संस्थानातील बरोडा कॉलेजामध्ये इ. स. १९०२ ते १९०६ साली प्राध्यापक होते. या प्राध्यापकाने केलेल्या अनेक चळवळी व कृती २) दुसऱ्याही अनेक संस्थानाच्या कारभारावर देखरेख करण्याकरीता नेमलेला लहान मोठ्या प्रसंगांचा उल्लेख करता येईल. उदा. बडोद्यात त्यावेळी असलेल्या रेसिडेंटला (एक उच्च स्थानावरील ब्रिटिश अधिकारी) टपाल खात्याने घरपोच केलेल्या अनेक पत्रातून धमक्या देण्यात आल्या होत्या. सैन्यातील दोन ब्रिटिश अधिकाऱ्यांना जमावाने दिलेला उपद्रव इत्यादी या घटना विचारात घेऊन आपण एकवेळ मान्य करू या की या घटनामुळे महाराजांवर राज्यद्रोहाचा आरोप करण्यात

आला होता. पण तसेच होते हे एकवेळ मान्य केले तरी मुख्य प्रश्नाचे उत्तर कोपलँड लिखाणातून मिळत नाही. राज्यद्रोह या प्रश्नाच्या दोन बाजू आहेत. १) महाराजावर 'राज्यद्रोहा'चा आरोप का करण्यात येत होता. २) महाराज हे राष्ट्रवाद्यांचे त्या काळातील लोकप्रिय 'हिरो का बनले? कोपलँड साहेबांच्या विवेचनात यातील फक्त पहिल्या भागाचे उत्तर देण्याचा त्यानी प्रयत्न केला आहे. पण **'अमृत बाझार'** पत्रिकेतील लिखाणांचे स्पष्टीकरण व त्याचा प्रतिवाद त्यांच्या विवेचनात नाही. **कोपलँड** आणखी असेही सुचवितात की स्वतंत्र विचारांचा एक मनुष्य आणि बडोदे संस्थानाने 'राज्यद्रोह' या प्रश्नासंबंधी विचारपूर्वक घेतलेली भूमिका या दोन्ही कारणामुळे राजनिष्ठेच्या मुख्य प्रवाहापासून दुरावलेला बंगाल आणि महाराष्ट्रातील जहाल राष्ट्रवादी **एकाद्या लोहचुंबकाकडे जसे लोहकण आकर्षित होतात त्याप्रमाणे महाराजांकडे आकर्षित झाले होते. या कारणामुळे महाराजांना** राष्ट्रवाद्यांकडून सर्वत्र पाठिंबा मिळत गेला. हा युक्तिवाद मान्य केला म्हणजे मग महाराज हे फारच भाषणे, लिखाण करणारे आणि त्याचप्रमाणे त्यांचे प्रशासनही कृतीशून्य होते असा निष्कर्ष काढावा लागतो. परंतु याच काळात अनेक लेखणी बहाद्दर महाराजांवर हल्ले करीत होते व त्याचवेळी त्यांना जो प्रचंड पाठिंबा मिळत होता, त्याचे स्पष्टीकरण त्या करवी मिळत नाही. महाराजांवर होणारी जी कोणी लक्षातही घेत नसे अशी टीका व त्याजबरोबर त्यांना मिळणरा पाठिंबा या दोन परस्पर विरोधी घटनांचे स्पष्टीकरण, महाराज हे कृतीशील लढ्यातील अग्रणीचे सुधारक होते, या वस्तुस्थितीकरवीच मिळते. एवंच विसाव्या शतकातील पहिल्या दशकात हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य लढ्यातील 'गनिमी' काव्याचा एक भाग या स्वरूपात आधुनिकतेचे अनुकरण केले जात होते. याच कारणामुळे महाराजांना राष्ट्रवादी विचारांच्या लोकसमुहात जे मानाचे स्थान प्राप्त होते त्याचा अन्वयार्थ लागतो.

या अशा व्यामिश्र परिस्थितीत इ. स. १९११ च्या १० नोव्हेंबर रोजी महाराज व त्यांचे कुटुंबीय हिंदुस्थानात घरी परत आले. या वेळी बडोदे संस्थानचे दिवाण ब्रिटिश नोकरशाहीत अत्यंत प्रतिष्ठेच्या समजल्या जाणाऱ्या आय. सी. एस. (I. C. S.) या श्रेणीत प्रशासकीय शिक्षण घेऊन आणि भारतातील परिस्थितीचा ज्याना चांगला अंदाज प्राप्त करून घेतला होता असे गृहस्थ होते. ते जन्माने इंग्लिश गौरवर्णीय होते महाराज हिंदुस्थानात परतल्यानंतर थोड्याच दिवसांनी या मि. एन. सी. सेड्डान (Seddon) या दिवाणानी, हिंदुस्थानातील ब्रिटिश राज्यकर्त्यांनी बडोदे संस्थानातील दोन अधिकाऱ्यांविरूद्ध पाठविलेले आरोपपत्र महाराजांना सादर केले. या आरोप पत्रात बडोदे संस्थानाच्या प्रशासनातील **केशवराव देशपांडे** व **केशवराव जाधव** यांचा उल्लेख करण्यात आला होता. महाराजांविरुद्ध करण्यात येणारा 'राजद्रोहा'चा आरोप आणि बडोदे संस्थानातील एकंदर वातावरण यामुळे बडोदे संस्थानात नुकतेच आलेले रेसिडेंट **कर्नल कॉब** चिंताग्रस्त होते. बडोदे प्रशासनातील या दोन अधिकाऱ्यांविरुद्ध आणि दुसऱ्याही अनेक अधिकाऱ्यांविरुद्ध कठोर कृती केली जावी असा



अनुक्रमणिका

आग्रह त्यांनी धरला होता. **कर्नल कॉब** यांच्या दुर्दैवाच्या भाग असा होता की असे काही गुन्हे घडले आहेत याबद्दल त्यांच्याकडे काहीही पुरावा नव्हता. दिवाण **मि. सेड्रॉन** यांनी या आरोपाविरुद्ध प्रतिवाद केला आणि रेसिडेंट साहेबाना सादर केलेल्या आरोपातील जवळ जवळ सर्वच आरोप रद्दबातल ठरविले. यावेळी **कर्नल कॉब** यांनी **मि. सेड्डॉन** यांना धमकी देताना असे निर्देषित केले की "बडोदे संस्थानातील प्रशासनाविरुद्ध सादर करण्यात आलेले आरोप पत्र त्यांनी मान्य केले नाही. तर नोकरीत बढती मिळण्याची त्यांची संधी फारच दुरावेल." या ठिकाणी एक महत्त्वाचा मुद्दा उन्मेखून लक्षात ठेवला पाहिजे. दिवाण **मि. सेड्डॉन** हे जन्माने गौरवर्णीय 'इंग्लिश' गृहस्थ होते. तसेच **आय. सी. एस.** या श्रेणीतील उच्चस्थानावरून निवृत्त झाल्यानंतर ते बडोदे संस्थानातील दिवाण या पदावर दाखल झाले होते. या दोन्ही कारणामुळे हिंदुस्थानातील ब्रिटिश सरकारकडून त्यांची खरमरीत शब्दात कानउघाडणी झाली नाही आणि त्याच कारणामुळे बडोदे प्रशासनातील अनेक पदाधिकाऱ्यांना संरक्षण मिळाले. याचा परिणाम असा झाला की गायकवाडांच्या धूर्त व चकवा देणाऱ्या डावपेचापुढे आपण हतबल झालो आहोत ही भावना हिंदुस्थानातील ब्रिटिश सरकारमध्ये वाढीस लागली होती. हिंदुस्थानची तत्कालीन राजधानी कलकत्ता (कोलकता) या ठिकाणी पाठविलेल्या वार्तापत्रात **कर्नल कॉब** यांनी **मि. सेड्डॉन** विषयीची आपली नाखुषीची भावना व्यक्त करताना असे नमूद केले होते की "**मि. सेड्डॉन** यांचा दृष्टिकोन. यदाकदाचित धोकादायक नसला तरी तो लक्षणीयपणे निरोगी नाही इतकेच नव्हे तर त्याचा पायाही डळमळीत आहे." रेसिडेंट **कर्नल कॉब** यांना **जाधव** व **देशपांडे** यांच्याबद्दल जो पुरावा निर्णायक आहे असे वाटत होते तो त्यानी दिवाण **मि. सेड्डॉन** यांना सादर केला. त्या दोघांविरुद्ध तक्रार करण्यासाठीही पुरेसा पुरावा आहे असे **मि. सेड्डॉन** यांना वाटत नव्हते. परंतु रेसिडेंट **कर्नल कॉब** यांनी या स्वरूपाचे हल्ले करण्याचे सातत्याने चालू ठेवल्याने सरतेशेवटी **मि. सेड्डॉन** यांना 'माघार' घ्यावी लागली. महाराज युरोपहून परतल्यानंतर **मि. सेड्डॉन** यांनी हे आरोपपत्र महाराजांपुढे लगेच सादर केले.

**श्री. जाधव** आणि **श्री. देशपांडे** हे दोघेही संस्थानातील काही जिल्ह्यांचे कमिशनर होते. त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या विभागातून राज्यद्रोही चळवळी निपटून काढण्यासाठी जोरदार व परिणामकारक कृती केली गेली नाही असा आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला होता. बडोदे संस्थानात एकंदर-**अमरेली, बडोदे, कडी, मेहसाना नदसारी** आणि **ओखामंडळ** हे पाच जिल्हे समाविष्ट होते. मुक्ती कोनो पथ (स्वातंत्र्या कोठच्या मार्गाने) या **अरविंदो** यांच्या पुस्तकांचा गुजराथी अनुवाद **मेहसाना** जिल्ह्यात छापण्यात आला होता. हा जिल्हा **श्री. देशपांडे** यांच्या अखत्यारित होता. या पुस्तकाच्या प्रती मुंबईत सापडल्या होत्या. जिल्हा कमिशनराला, जिल्ह्यात काय छापले जात आहे हे माहीत झाल्याविना ही छपाई होणे शक्यच नाही असा निष्कर्ष ब्रिटिश राजसत्तेने काढला. म्हणून हे पुस्तक छापून घेण्याच्या कटात श्री. देशपांडे सामिल होते, असा आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला होता. नवसारी



अनुक्रमणिका

जिल्ह्यात चालू असलेल्या चळवळीबरोबर या **श्री. देशपांडे** यांच्या कृतींची सांगड घालण्यात आली होती. या पथकाला त्या मानाने फारच 'छोट्या कटाचा' शोध लागला. म्हणजे या पुस्तकाच्या पाचशेहून अधिक प्रती या ठिकाणी सापडल्या. या प्रतींना वनस्पती औषधे (Vegetable Medicine) हे नाव असलेले वेष्टन चढविण्यात आलेले होते. या पथकाने ही घटना कमिशनर **जाधव साहेब** यांच्या निदर्शनास आणली. बडोदे सरकारची परवानगी असल्याविना संस्थानी हद्दीत ब्रिटिश पोलिस पथकाला तपास करण्याचा कायदेशीर अधिकार नाही हे कमिशनर **जाधव साहेब** यांनी ठामपणे त्या पथकाच्या निदर्शनास आणले. तत्कालीन बाम्बे (मुंबई) सरकारने हा मुद्दा ताबडतोब मान्य केला आणि आपणाकडून घडलेल्या आगळीकेबद्दल दिलगीर आहोत असे जाहीर केले. कायद्याच्या दृष्टीने पहाता ब्रिटिश सरकारकडे न्यायालयात दावा दाखल करण्याकरिता काहीही अधिकार नव्हता. परंतु एका 'देशी' माणसाकडून आपल्या अधिकाराला सुरुंग लावू देण्यास परवानगी देण्यास राज्यकर्ते अर्थातच तयार नव्हते. म्हणून त्यांनी **कमिशनर जाधव** साहेब हे राजद्रोहास मदत करीत आहेत आणि सरकारी तपासात अडथळा आणीत आहेत असा आरोप त्याच्यावर ठेवला. **सयाजीराव** महाराजांना उद्देशून व्हाईसरॉय **लॉर्ड हार्डियन** यांनी एक चरचरीत पत्र पाठविले या पत्रात त्यांनी महाराजाना अशी शिफारस केली की त्यांनी राष्ट्रवाद्यांच्या जाहीर निषेध करावा; तसेच ब्रिटिश हिंदुस्थानात छापखान्यात जे काही छापले जाते या संबधी जे कायदे आहेत, त्याच्याशी तंतोतंत जुळती असे कायदे आपल्या संस्थानात करावेत, संस्थानाच्या पोलिस खात्याच्या प्रमुखपदी ब्रिटिश अधिकाऱ्याची नेमणूक करावी, गुन्हा केलेल्या दोन कमिशनराला नोकरीतून काढून टाकावे आणि बडोदे संस्थानातून हद्दपार करावे.

या सर्व सूचनांकडे महाराजानी दुर्लक्ष केले व्हाईसरॉय साहेबानी ज्या सूचना व शिफारसी केल्या होत्या, त्या महाराजांनी अमलात आणल्या नाहीत, तर त्यांना फारच गंभीर परिणामास सामोरे जावे लागेल अशी धमकीही व्हाईसरॉयना दिली होती पण हे सारे असूनही त्या सर्व सूचना महाराजांच्या खिजगणितितही नव्हत्या याउलट हे दोन्ही अधिकारी निरपराध आहेत, त्यांच्यावर ठेवण्यात आलेल्या अरोपात तथ्य नाही असा निवाडा त्यांनी दिला. कमिशनरपेक्षा त्या मानाने कमी प्रतिष्ठेच्या जागेवर या अधिकाऱ्यांची फक्त बदली करण्यात आली. या अशा प्रकारची कान-उघाडणी करून घेण्यापेक्षा त्यांनी नोकरीचा राजीनामा देण्याचे पसंत केले. त्या राजीनाम्यांचा स्वीकारही करण्यात आला. परंतु या सर्व प्रकरणात न्याय दिला गेला नाही आहे (miscarriage of Justice) असे महाराजांना वाटत असल्याकारणाने त्यांनी **कमिशनर देशपांडे** निवृत्त होत असताना दहा हजार रुपये सेवानिवृत्ती पुरस्कार या स्वरूपात दिले. महाराजांच्या या सर्व कृती पाहून ब्रिटिश राज्यकर्ते पराकोटीचे रागावणे क्रमप्राप्तच होते पण नजिकच्या काळात होऊ घातलेला **किंग जॉर्ज** यांच्यासाठी भरविण्यात येणाऱ्या दिल्ली दरबाराच्या तयारीत ते व्यस्त असल्याकारणाने त्यांनी त्या कृतीबद्दल प्रतिक्रिया व्यक्त केली नाही.



अनुक्रमणिका

## दिल्ली दरबाराविषयी थोडेसे

'दिल्ली दरबार' या नावाने आता विख्यात ठरलेल्या दरबाराची पूर्वपीठिका समजावून घेण्यासाठी भारतात युरोपीय पद्धतीची संरजामशाही रूढ करण्याच्या प्रक्रियेस ज्या प्रकारे ब्रिटिशांनी आरंभ केला होता ते थोडक्यात समजावून घेतल्यास, या लेखातील प्रतिपादनास सहाय्य होईल. इ. स. १८५७ चे स्वातंत्र्य युद्ध होण्यापूर्वी एक शतकाहून अधिक काळ, ब्रिटिशांनी हिंदुस्थानातील महाजन (aristocratic) वर्गाने आपले ऐश्वर्य दाखविण्यासाठी जे समारंभ आयोजित केलेले असत, त्यात त्यांनी नेहमीच भाग घेतला होता.

आपल्या व्यापारी आणि सैनिकी नियंत्रणाची कक्षा वाढविण्यासाठी या समारंभाचा उपयोग त्यांनी केला होता. इ. स. १८०३ साली मराठ्यांचा पराभव ब्रिटिश फौजांनी केला. या पराक्रमानंतर ते अखेरच्या मोगल सम्राटाचे ते पालक झाल्याकारणाने या अशा समारंभाची उपयुक्तता त्यांच्या दृष्टीने कमी कमी होत गेली. तत्कालीन ब्रिटीश अधिकाऱ्यांना असे वाटत होते की, जी राजवट निकालात निघाली आहे, तिला आपण वरकरणी तरी 'मान' देत आहोत असा देखावा, इतःपर त्यांनी का करावा? म्हणूनच इ. स. १८५८ सालानंतर, ब्रिटीशांनी या अशा प्रकारच्या समारंभात सामील होण्याचे थांबविले. शेवटचा मोगल बादशहा जो वृद्धापकाळामुळे आपली बौद्धिक क्षमता जवळजवळ गमावून बसला होता, त्याच्यावर इ. स. १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात सामिल होऊन सर्व हिंदुस्थानवर आपले सार्वभौमत्व आहे असे अवैधपणे त्याने जाहीर केल्याकारणाने, त्याच्यावर खटला भरण्यात आला होता. त्यादिवसापासून, त्या नव्या प्रकारच्या 'अभिजन' वर्गाची, प्रस्थापितांच्या वर्गाच्या, निर्मितीचा पाया रचण्यास सुरुवात झाली. ब्रिटिश राज्यकर्त्यांचा त्यांना सुपरिचित असलेल्या युरोप खंडातील, इतिहासाची उत्क्रांती व प्रगती याबावत जो अनुभव होता, तोच पायाभूत मानून ब्रिटिशांनी या अभिजन वर्गाच्या निर्मितीला सुरुवात केली होती.

ब्रिटिशांनी हिंदुस्थानात युरोपीय पद्धतीची सरंजामदारी निर्माण करण्याचे ठरविले. राज्यकर्त्या ब्रिटिश वर्गाला हिंदुस्थानातील आपल्या प्रजेची निष्ठा प्राप्त करून घेण्याकरिता, त्या दोघांत अनुबंध निर्माण करण्याकरिता अनेक युरोपीय मार्गाचा अवलंब करण्यात येऊ लागला. यासाठी नोकरशाहीत अनेक अभिजन दर्शक स्थाने, सरकारी समारंभात मानाच्या खुर्च्या देणे, आणि विशेष प्रसंगी बहाल करण्यात येणाऱ्या रावसाहेब, रावबहादूर, खानसाहेब खान बहादूर यांच्या सारखे किताव निर्माण करून हे संकल्पित अनुबंध व बांधिलकी निर्माण करण्यात येणार होती. (भारतीय राज्य घटनेला ही प्रथा मंजूर नसली तरी ती दुर्दैवाने अजून तरी चालू आहे. **फक्त जनता सरकारच्या काळात ही प्रथा रद्दबातल करण्यात आली होती. म्हणजे ही प्रथा आवर्जून पुन्हा एकदा चालू करणे याचा अर्थ आपण त्या सरंजामदारी अवस्थेतच आहोत असा होतो का?) हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी हे जे मार्ग कार्यवाहीत आणण्यात आले होते** त्या मागच्या तर्कशास्त्रात

दोन घटक अंतर्भूत होते. या घटकात काही प्रमाणात सरकारी समारंभ या स्वरूपाची साधने, आणि काही प्रमाणात व्यवहारी मार्गाचा अवलंब करण्यात येत होता. सैन्य, बंदुका आणि त्यातील गोळ्या यांचा वापर करण्यापेक्षा, सामाजिक मानदर्शक किताब बहाल करणे आणि सरकारी समारंभात या अभिजन वर्गाला मानाचे स्थान देणे, हे मार्ग अर्थातच फारच कमी खर्चाचे व फारशी डोकेदुखी निर्माण न करणारे होते. या सर्व प्रक्रियेत अंतर्भूत असलेले तर्कशास्त्र हे काही प्रमाणात राज्यकर्त्यांच्या दृष्टिकोनातून पहाता तसे विज्ञाननिष्ठही होते. त्याचे असे आहे, ब्रिटीश राज्यकर्त्यांच्यामते हिंदुस्थानातील समाज हा एक मागासलेल्या (PRIMITIVE) समाजाचे प्रतिक आहे. संरंजामदारीकरवी या · समाजाला सुसंस्कृत करणे, या प्रकारच्या उत्क्रांतीचा विकास होण्याच्या कामात ब्रिटीश राज्यकर्ते हातभार लावणार होते (white mans burden) गोऱ्या कातडीच्या माणसाने जगातील मागासलेल्या भागाला सुसंस्कृत करण्यासाठी वहावयाचे ओझे) या अशा प्रकारचे मूल्यमापन त्या काळात ब्रिटनमध्ये सदैव केले जात होते. याचे कारण या गृहीतकाला ब्रिटीश समाजात सार्वत्रिक मान्यता होती. उदा. सर चार्लस टप्पर (TUPPER) हे एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या चरणातील एक मान्यवर इतिहासकार. त्यांनी आपल्या ON INDIAN PROTECTORATE (हिंदुस्थानच्या पालकत्वासंबंधी) या ग्रंथात असे विधान केले आहे की "हिंदुस्थानातील बाल्यावस्थेतील सरंजामदारी लक्षात घेऊन, ब्रिटीश राज्यकर्त्यांनी हिंदुस्थानला मदत करावी. असे केल्याने आधुनिकतेत संक्रमण करण्यासाठी त्या देशाला साह्य होईल. **लि-वॉर्नर** हे **सर टप्पर** यांचे समकालीन. त्यांनी हिंदुस्थानविषयीची **सर टप्पर** यांची त्या देशातील सामाजिक उत्क्रांती संबंधी समीक्षा वा निरीक्षण होते, त्याचे स्पष्टीकरण देऊन, विवरण केले होते. त्यांनी आपल्या PROTECTED PRINCES OF INDIA (हिंदुस्थानातील ब्रिटीशांच्या पालकत्वाखाली असलेले संस्थांनी नरेश) या ग्रंथात असे म्हटले आहे की, हिंदुस्थानातील सरंजामदारीत 'उन्मेषी चैतन्याचा ( VITAL SPIRIT) अभाव आहे पण युरोपीय सरंजामदारीत ते चैतन्य आहे. धनी आणि त्याचा मांडलीक या उभयतात त्यामुळे एकमेकांबद्दल आदराची आणि त्या दोघांनीही एकमेकांशी निष्ठावान रहावे अशी भावना निर्माण होते. या अशा प्रकारच्या आदान-प्रदानामुळे विश्वासपूर्ण बंध-अनुबंध स्वरूपाचे संबंध आणि दोघांनीही एकमेकांना मदत करावयाची आहे अशा स्वरूपाचे नातेही निर्माण होते. पण हिंदुस्थनातील सरंजामशाहीत हे वातावरण नाही." **विल्यम लि वॉर्नर** यांचा हा जो दृष्टिकोन होता, त्याचा हिंदुस्थानातील ब्रिटीश सरकारच्या धोरणावर परिणाम जरूर झाला. या दृष्टीकोनाचे त्याकडे वरवर पहाता त्यात अनूस्यूत असलेले गर्भित महत्त्व लक्षात येत नाही. पण जरा खोलात जाऊन त्याची तपासणी केली की त्याची व्याप्ती किती महत्त्वाची आहे हे लक्षात येते. थोडक्यात, हिंदुस्थान या खंड-स्वरूपी देशात ब्रिटिश राज्यकर्त्यांना प्रमुख सरंजामदार व्हावयाचे असले तर अत्यंत, आवश्यक असलेल्या 'उन्मेषी चैतन्याची' भावना समाजात निर्माण करण्यासाठी प्रयत्नपूर्व सुरुवात करणे आवश्यक होते.



अनुक्रमणिका

हा दृष्टिकोन शब्दातून व्यक्त करणे फारच सोपे होते. पण प्रत्यक्षात त्याची कार्यवाही करताना अनंत अडचणी आल्या. पहिली अडचण कोणत्या मानाच्या पदाला काय नांव द्यावे? त्याची व्याख्या म्हणजे त्या पदाचा भाग व त्याची व्याप्ती कोठपर्यंत पोचते याबद्दल खुद्द ब्रिटीश राज्यकर्त्यांच्या मनातच फार गोंधळ होता. या अशा गोंधळाच्या परिस्थितीत हिंदुस्थानात युरोपीय थाटाची सरंजामदारी व्यवस्था निर्माण करण्याच्या दृष्टीने केलेल्या प्रयत्नांना सुरुवात झाली. इ. स. १८५९ साली **लॉर्ड स्टॅनले सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया** यांनी संस्थांनी नरेश आणि ब्रिटिश राजघराणे यांच्याशी त्या नरेश्यांच्या असलेल्या वैयक्तिक संबंधातून बांधिलकी निर्माण व्हावी या हेतूने एक सन्माननीय किताब निर्माण केला, त्या मागची कल्पना अर्थातच युरोपीय होती. इंग्लिश भाषेत CHIVALARY या शब्दाला अर्थ स्त्रियांशी अदबीने व शालिनतेने वागणे, त्यांना अडचण पडेल तेव्हा मदत करणे, त्यांना संकटातून सोडविणे. एवढ्याच पुरता मर्यादीत नाही त्याला त्या भाषेत आणखीही अर्थ आहेत. एक अत्यंत उच्च प्रकारचा व पातळीवरचा धार्मिक स्वरूपाचा नैतिक व सामाजिक व्यवहार व त्यानुसार वर्तन करणाऱ्या व्यक्तींचा समूह. अशा प्रकारचा समूह - HIGH ORDER OF CHIVALRY - निर्माण करण्याचे लॉर्ड साहेबांनी ठरविले, व त्यानुसार कृतीही केली. या नव्या बादशाही किताबाने बहाल केलेल्या सन्मानपदाचे नांव होते 'THE MOST EXALTED ORDER OF THE STAR OF INDIA' या सन्मानाची झूल एकाचवेळी लंडन वं अलाहाबाद या ठिकाणी झालेल्या शाही समारंभात त्या सन्मानास पात्र असलेल्या मान्यवरांच्या पाठीवर चढविण्यात येणार होती. इ. स. १८५८ साली हिंदुस्थानही ब्रिटीश राजसत्तेत समाविष्ट करण्यात आले आहे हे नमूद करणारा जाहीरनामा दिवशी प्रसिद्ध झाला होता. त्या जाहिरनाम्याच्या वाढदिवसाचे निमित्त करून एक नोव्हेंबर १८६१ रोजी हा सन्मान प्रदान करण्याचा समारंभ साजरा झाला. या सन्मानाला पात्र असलेल्या नशिबवानांच्या यादीत ९ गोरे ब्रिटीश व ९ देशी हिंदुस्थानी समाविष्ट होते. या सन्माना निमित्त या किताबाला निदर्शक असे सन्मान चिन्हही तयार करण्यात आले होते.

या नंतरची काही वर्षे हिंदुस्थानात उत्क्रांत होणाऱ्या युरोपीय पद्धतीच्या सरंजामदारीचे संगोपन करण्यसाठी आणि त्यापासून मिळणाऱ्या फायद्यांचा पुरेपूर फायदा उठविण्यासाठी नव्या कल्पना व मार्ग शोधण्यात घालविले गेले. इ. स. १८७६ साली हिंदुस्थानचे व्हाईसरॉय म्हणून नुकतीच नियुक्ती होऊन आलेल्या **लॉर्ड लिटन** यांनी हिंदुस्थानात पहिला **दिल्ली दरबार भरवावा** यासाठी विचार करण्यास सुरुवात केली. ब्रिटनच्या पंतप्रधानांना त्यांनी आपल्या संकल्पित व्यूहरचनेबद्दल येणे प्रमाणे लिहिले होते.

*"हिंदुस्थानातील राजे आणि महाराजे यांच्याबरोबर माझे जे सामाजिक स्वरूपाचे आदान प्रदान आहे त्यात दुसऱ्या कोणत्याही गोष्टीपेक्षा ते एका विशिष्ट गोष्टीला अत्यंत महत्त्व देतात हे माझ्या लक्षात आले आहे. ती गोष्ट म्हणजे या नरेशांचा कौटुंबिक वारसा (PEDIGREE) आणि तो वारसा सिद्ध करणारा ऐतिहासिक दस्तऐवज.*

*या ठिकाणी (हिंदुस्थानात) एक महत्त्वाची सरंजामदारी उमरावशाही आहे. आपणास ती बाजूस सारता येत नाहीच. इतकेच नव्हे तर या सरंजामदारीला चुचकारून तिच्यावर प्रभुत्व मिळविण्यासाठी आपण उत्सुक आहोत. परंतु त्या सरंजामदारांचा प्रमुख सरंजामदार (ब्रिटीश राजघराणे) या स्वरूपात या प्रमुखाला सन्मान प्राप्त होईल, वा एखाद्या कठीण प्रसंगी ते एकदिलाने त्यांची निष्ठा ब्रिटीश राजघराण्याला प्राप्त होईल, वा एखाद्या प्रसंगी जे एकदिलाने सहाय्य करतील यासाठी आपण आजवर काहीही केलेले नाही अथवा त्याच्या जवळपास पोचेल असे काहीही केलेले नाही. मी आजवर ज्या ज्या संस्थानिकाबरोबर संभाषण केले, त्याबाबत मी जे लिहणार आहे, ते सारे एकीकडे करमणूक करणारे पण त्याजबरोबर कुतुहलजन्य वाटेल. या संभाषणात ते सारे संस्थानिक आपले कुटुंब हे किती पुरातन आहे, याची मला खात्री पटावी यासाठी उत्सुक होते. यातल्या अनेक संस्थानिकांनी आपण स्वतः प्रेमभावनेने संपादित केलेल्या, आपल्या स्वतःच्या खर्चाने छापून प्रसिद्ध केलेल्या कौटुंबिक वंशावली आणि कौटुंबिक दस्तऐवज मला सादर केले आहेत. या (धार्मिक स्वरूपाच्या) साहित्यापैकी बहुतांश साहित्य इंग्रजी भाषेत रचलेले आहे, आणि छापलेले आहे. परंतु या ठिकाणी आवर्जून लक्षात येण्याजोगा मुद्दा एकच आहे तो म्हणजे मला सादर केलेल्या पुराव्यातून एकच मुद्दा मी टिपला. या संस्थानिकांच्या कुटुंब प्रमुखांला ब्रिटीश सरकारने जो काही मानाचा किताब दिला आणि ज्या काही सवलती दिल्या (उदा. संस्थानिकाच्या आगमना प्रित्यर्थ देण्यात येणाऱ्या बंदुकांच्यां फैरीची संख्या, व त्यात झालेली वाढ, संस्थानिकाने व्हॉईसरॉयला भेट दिल्यानंतर, त्यांनी आपल्या संस्थानाला भेट देणे हा आपला अधिकार आहे, आणि ब्रिटीश बादशहाने भरविलेल्या दरबारात मिळणारे स्थान) हे सारे अधिकार त्या संस्थानिकांना अत्यंत महत्वाचे वाटत होते. इतकेच नव्हे, तर या साऱ्या गोष्टी त्यांना इतक्या महत्त्वाच्या वाटत होत्या की त्यांची तुलना (उदा. औरंगजेब अगर अकबर या पूर्वीच्या काळातील मोगल बादशहांनी त्यांना बहाल केलेली जमीन अगर त्या जमिनीवरचा महसूल) या सारख्या कितीतरी लाभदायी ठरतील अशा सवलतीशी करता येते.*

आपण बादशाही थाटाचा दरबार भरवावा अशी कल्पना **व्हाईसराय लिटन** यांना सुचली. हा दरबार दिल्लीत भरविण्यात येणार होता. त्याचे उद्दिष्टही साधे होते. ब्रिटीश साम्राज्याच्या हिंदुस्थानातील 'मांडलिकांना' एकत्र आणावयाचे आणि त्या सर्वांची एकत्रित निष्ठा व चैतन्य हे सर्वशक्तिनिशी ब्रिटीश सिंहासनावर केंद्रित करतील याकडे खास करून लक्ष द्यावयाचे. हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी **व्हॉईसरॉय लिटन** यांनी अनेक कल्पक डावपेचाची आखणी केली होती. यासाठी त्यांनी युरोपीय परंपरातून फार मोठ्या प्रमाणात उसनवारी केली होती. यात आश्चर्य वाटावे असे काहीही नाही. उदा. हिंदुस्थानातील राज्यकारभारविषयक बाबतीत **व्हाईसरॉय** बरोबर सल्लामसलत करण्यासाठी त्यांनी **इंडियन प्रिव्ही कॉन्सिल** निर्माण करण्याचा प्रस्ताव मांडला होता. या शिवाय कलकत्ता शहरात (त्यावेळची राजधानी) एक 'College of Arms' (मानचिन्हे) ही संस्था निर्माण करावी असेही

करावी असेही त्यांनी सुचविले होते. ब्रिटीश राज्यकर्त्यांकडून हिंदुस्थानात ज्या बहुमान दर्शक पदव्या वहाल केल्या जात होत्या त्यात व्यवस्था निर्माण करणे आणि हिंदुस्थानातील उमराव वर्गाने प्रवेश देण्यासाठी नियमावली वा पद्धती प्रस्थापित करणे हा त्या प्रस्ताव सूचनेमागचा हेतू होता, परंतु व्हॉईसरॉय साहेबांच्या या दोन्हीही कल्पनास लंडनमधील ब्रिटिश राज्यकर्त्यांनी मान्यता दिली नाही. पण एका बाबतीत व्हॉईसरॉय लिटन हे यशस्वी झाले होते. प्रत्येक संस्थानाचे वैशिष्ट्य दर्शक मानचिन्ह निर्माण करण्याच्या प्रस्तवाला मंजूरी मिळविण्यात ते यशस्वी झाले होते. या मानचिन्हात प्रत्येक संस्थानाकरता निर्माण केलेले निशाणही समाविष्ट होते. दिल्ली दरबाराच्या समयी या निशाणावर त्या त्या संस्थानांची मानचिन्ह असलेली ढाल (coat of arms) मोठ्या डौलाने फडकणार होती.

दिल्ली दरबार कोठे भरवावा-ती जागा, दरबारची एकंदर रचना कशी असावी, याबद्दलची संकल्पना आणि त्या दरबारात करण्यात येणारी सजावट, या सर्व बाबतीत युरोपीय संस्कृतीतील 'प्रतिमा' (motif) या घटकाचा शक्य होईल त्या ठिकाणी भर देऊन त्यांचा वापर करण्याकडे **व्हॉईसरॉय लिटन** यांनी खास करून लक्ष पुरविले होते. हा बादशाही समारंभासाठी ridge (नदीकाठ) ही जागा निवडण्यात आली. याचे कारण ब्रिटीश इतिहासातील एका अत्यंत महत्त्वाच्या घटनेची स्मृती जागृत करण्याचा तो प्रयत्न होता. इ. स. १८५७च्या पहिल्या भारतीय स्वातंत्र्य युद्धाच्या अखेरीला याच ठिकाणावरून दिल्लीचा ताबा परत आपल्याकडे यावा यासाठी यशस्वी ठरलेली चढाई केली गेली होती. व्हॉईसरॉय ज्या मंचावर बसणार होते त्याची जी सजावट होती त्यावर VICTORIA IMPERATIX (सम्राज्ञी महाराणी व्हिक्टोरीया) ही अक्षरे छापलेल्या पताकांची तोरणे टांगलेली होती. या शामियान्याचे जे छत होते, त्याला आधार देणारे जे खांब होते, त्यांच्यावर ब्रिटीश राजमुकुट, ब्रिटिशांचा राष्ट्रध्वज-युनियन जॅक- आणि क्रॉस ऑफ दी सेंट जॉर्ज या सर्वांच्या मुद्रा दिमाखाने मिरविणारी आवरणे लपेटण्यात आली होती. व्हॉईसरॉय ज्या सिंहासनावर बसणार होते, त्याच्या बाजूला महाराणी व्हिक्टोरिया यांचे सोनेरी चौकटीतील हे भले मोठे तैलचित्र टांगण्यात आले होते.

सरंजामी दर्शक युरोपीय प्रतिमा आविष्कृत करणाऱ्या या सर्व गोष्टींचा उपयोग हा डावपेचाचा एक भाग आहे, अशा स्वरूपात ब्रिटिश अधिकारी त्याकडे पहात होते याबद्दल काहीही शंका नाही. हिंदुस्थानातील सरंजामदारी व्यवस्था व त्यातील चैतन्य ही तोवर काहीशी अपरिपक्व होती, तसेच अविकसितही राहिली होती. म्हणूनच ब्रिटिशांच्या राजघराण्याच्या अधिकाराला ती अधिक त्रासदायक ठरणारी व राजघराण्याशी कसलीही जवळीक व बांधिलकी राहिली असती. एवंच **व्हॉईसरॉय लिटन** साहेबांनी सुचविलेला मार्ग तसा सोपा व सरळसोट होता. हिंदुस्थानातील संस्थांनी नरेश-राजे आणि महाराजे इत्यादी माल-मसाला वापरून ब्रिटिश राज्यकर्ते एका कार्यक्षम सरंजामदारी समाजाला आकार देण्याचा प्रयत्न करणार होते. हे केल्याने हिंदुस्थानला मदतच होईल असे त्यांचे मत होते.

एका खऱ्याखुऱ्या व वास्तव अशा सामाजिक क्रांतीच्या मार्गावर आगेकूच करण्याकरिता हिंदुस्थानने प्रवेश केल्याकारणाने त्या देशाची ही कृती त्याला सहाय्यभूत ठरणार होती, असा ब्रिटिश अधिकाऱ्यांना विश्वास वाटत होता. याचे कारण हिंदुस्थानात उत्क्रांत होत असलेल्या सामाजिक संरचनेत, सामाजिक स्वरूपाची अभियांत्रिकी (Social Engineering) वैज्ञानिक पद्धती प्रत्यक्ष उपयोगात आणून, तिचा वापर केला जाणार होता.

याचा अर्थ असा नव्हे की सर्वच ब्रिटिश अधिकाऱ्यांना नेहमीच हे धोरण मान्य होते. वेळप्रसंगी हिंदुस्थानातील समाज व्यवस्थेची ही अशा प्रकारे डागडुजी करण्याचे प्रयत्न या अधिकाऱ्यांना मूर्खपणाचे वाटत होते. यातले अनेक अधिकारी हे समाजाची जडण घडण कशा प्रकारे होते, त्याला नवे वळण कसे व केव्हा द्यावे या विषयाबाबतचे चांगलेच जाणकार होते. दिल्ली दरबारातील ही संकल्पित दाखवेगिरी झगमगाट, आणि त्यात करण्यासाठी योजलेले कर्मकांड याबद्दल ऐकून ते काहीवेळा चांगलेच गोंधळून जात. या जाणिवेमुळे या समारंभापासून आपणा सर्वांना काही अंतरावर कसे रहाता येईल याची काळजी ते घेत होते. ती ही अशा प्रकारे, की आपण जी 'आयुधे' निर्माण करण्याकरिता आपली कल्पकता वापरली, तीच किती चुकीची आहे हे ते सांगत असत. दिल्ली दरबाराची योजना, त्याचे संकल्पचित्र, ते यशस्वीपणे सिद्धिस जावे यासाठी करावी लागणारी सर्व व्यवस्था या कामात व्यस्त असताना **व्हॉईसरॉय लिटन** यांनी ब्रिटनचे पंतप्रधान **डिझरेली** यांना अगदी नम्र शब्दात असे लिहिले होते की

*"दिल्ली दरबारात उभारलेल्या मंडपाच्या सुशोभिकरणातील तपशिलाबद्दल लिहिताना मी त्यात फार खोलात न जाता, ते फारच हळवेपणाने, भावुकतेने लिहित आहे असे भासेल, अशी चिंता मला वाटत आहे. .................... हिंदुस्थानात समारंभाच्या वेळी करण्यात सुशोभिकरणाचा तपशील एखाद्या जनावराच्या शरिराच्या भागासारखा आहे. म्हणजे त्याचे असे आहे. खाटकाला मांस काढून घेण्याकरिता ज्यांचा काहीही उपयोग नाही असे ते भाग असतात अगर ज्यांचा वैज्ञानिक क्षेत्रातही उपयोगी ठरेल, असे शवच्छेदन करण्याच्या दृष्टीने ते उपयोगाचे नसतात. परंतु ज्योतिषी त्यातून भविष्यसूचक निष्कर्ष काढतात. हे निष्कर्ष हिंदुस्थानातील सैन्याला आगेकूच करण्यासाठी प्रोत्साहित करतात आणि त्याच निष्कर्षांचा प्रभावही वेळप्रसंगी राजपुत्रावरही पडतो."*

एवंच निदान इ. स. १८७७ साली हिंदुस्थानचे सरंजामदारीकरण व्हावे यासाठी आपण अत्यंत काळजीपूर्वक तयार केलेल्या कार्यक्रमाबद्दल ब्रिटिश राज्यकर्ते त्यात भावनात्मक स्वरूपाची गुंतवणूक करून घेण्यासाठी तयारच नव्हते.

इ. स. १८५७ च्या हिंदुस्थानी पहिल्या स्वातंत्र्ययुद्धानंतरच्या पहिल्या काही दशकात हिंदुस्थानात जी ऑंग्लानुकूल मनोवृत्ती तयार होत होती, तिला या साम्राज्यवादांच्या डावपेचा व्यतिरिक्त दुसऱ्याही प्रकारचा अर्थ होता. अर्थातच तो महत्त्वाचा होता. ब्रिटिशांना राज्य चालविणे सुलभ व्हावे या कामातील ते तसे म्हटले तर अत्यंत महत्त्वाचे हत्यार होते. या

शिवाय ब्रिटनने पाश्चिमात्य समाजाचे नेतृत्व प्राप्त करून घेण्याची जी कर्तबगारी दाखविली होती तीही त्या मनोवृत्तीच्या द्वारा आविष्कृत होत होती. ब्रिटन, ग्रीक व रोमन संस्कृतीचे आपणच वारस आहोत हे बिरूद अगदी उघडपणे व स्पष्टपणे धारण करून, **व्हॉईसरॉय लिटन** प्रणित दरबार हा त्या कर्तबगारीचा विजयोत्सव साजरा करणार होता. या विधानाच्या पुष्ट्यर्थ **लंडन टाईम्सच्या** १ जानेवारी इ. स. १८७७ मधील उताऱ्याचा संदर्भ पुरेसा उद्बोधक ठरावा. **टाईम्सच्या** १ जानेवारीच्या बातमीपत्रात या पहिल्या दिल्ली दरबाराचे महत्त्व व त्याचा संदर्भ पुढील शब्दाकरवी आविष्कृत केला आहे.

*"हिंदुस्थान .......... हा सदासर्वकाळ मानवी इच्छेचे अत्यंत उच्च असे उद्दिष्ट होते. या गतकालाबद्दल आपणाला (ब्रिटनच्या नागरिकांना) अगदी कमीत कमी ज्ञान आहे. सिंधू नदीपलिकडून स्वारी करून आलेले लोक पुरेसे यशस्वी ठरले आहेत. पुरेसे हा शब्द एका विशिष्ट अर्थाने वापरलेला आहे. पुरेसे या अर्थाने त्यांच्या वारसदारांना (ब्रिटिशांना) पुन्हा एकदा स्वारी करून 'देव-देवता', 'अर्धदेवता' आणि हिरोज (Heross) यांना जी कर्तबगारी सर्वोच्च आहे असे वाटेल ती करणे शक्य झाले. जगज्जेत्या* ***अलेक्झांडरला*** *या त्याला हवाहव्याश्या वाटणाऱ्या देशाच्या सीमेवरच थांबावे लागले. आपल्या सैनिकांचा जीव आपण तोवर जी कीर्ती व नांव मिळविले होते त्याचा बचाव करणे हे त्याच्या त्या थांबण्यामागचे उद्दिष्ट होते. त्याच्या पाठोपाठ आलेल्या वारसदारांनी सिंधु नदी आणि तिला मिळणाऱ्या उपनद्या यांच्या तीराजवळचा प्रदेश काबिज केला व तेथेच ते थांबले. इ. स. ला सुरुवात होण्यापूर्वीच ते नाहीसे झाले. हिंदुस्थानच्या सीमेवर जी राज्ये होती, त्यांच्याशी सीमाबाबत मैत्रीचे संबंध ठेवण्यात 'रोमन' समाधानी होते. तथापि त्या 'रोमन' कालखंडानंतर, या दिवसापर्यंत कोणत्याही सत्तेला (ब्रिटन सोडून) या महा द्विपकल्पातील बहुतेक प्रदेशावर सत्ता प्रस्थापित करणे आणि शस्त्र बळाच्या जोरावर तो आपल्या काबूत ठेवणे, जमलेले नाही. मग त्या इतर सत्ता संख्याबलाने कितीही मोठ्या असोत, कितीही उपक्रमशील असोत, कितीही सामर्थ्यवान असोत आणि कितीही बदमाश असोत त्यांना ब्रिटनची कर्तबगारी साध्य करून दाखविता आलेली नाही."*

हिंदुस्थानवर संयगतीने, शांतपणे आणि हिंदुस्थानला 'उत्पादक' (?) ठरेल अशा पद्धतीने ताबा मिळविण्याची महत्त्वाकांक्षा पाश्चिममात्यांच्या मनात अनेक वर्षे घर करून होती. दिल्ली दरबार भरविण्यात ब्रिटिशांना आलेले यश ही ती महत्त्वाकांक्षा पुरी झाल्याचे द्योतक होते. पाश्चिमात्यात अत्यंत आदरणीय समजल्या जाणाऱ्या 'ग्रीक व रोमन या प्राचीन अभिजात सभ्यताना ब्रिटिशांच्या या कर्तबगारीने आणि शोधाने (दिल्ली दरबार) मागे टाकले होते. पाश्चिमात्य जगतात, अभिजात सभ्यता हा युरोपीय मध्ययुगापासून प्रगतीच्या बाबतीत परमोच्च बिंदू समजला जात असे. ब्रिटिशांना हिंदुस्थानात आलेल्या यशामुळे असे स्पष्टपणे दाखवून दिले गेले होते की त्यांनी हिंदुस्थानात पत्करलेले मार्ग (mission) ही परमेश्वरी दूरदृष्टी होती. इतिहासाच्या चाटचालीला त्यामुळे सत्यता (validate) प्राप्त झाली.

इ. स. १९११ च्या १२ डिसेंबर रोजी 'दिल्ली दरबार' हा आमूलाग्रपणे बदललेल्या परिस्थितीत भरला होता. या परिस्थितीला संदर्भ वेगळा होता. ब्रिटिशांच्या इतिहासविषयक जाणिवेतच परिवर्तन झाले होते याचे ते सूचन होते. हे सुचन पहिल्या प्रथम हा दिल्ली दरबार ज्या ठिकाणी भरवला जाणार होता त्यात झालेल्या बदलातून दिसून येते. भौगोलिक दृष्ट्या हा दरबार त्याच शहरात म्हणजे दिल्लीतच भरणार होता हे खरे. परंतु त्या शहरातील त्याचे स्थान नाट्यपूर्णपणे बदलले होते. लंडन टाईम्समधील खाली दिलेल्या उताऱ्यावरून या स्थान बदलाचे जे वैशिष्ट्य होते (हा दरबार नदी काठापासून फार दूरवर असलेल्या उत्तरेच्या मैदानात भरणार होता) इ. स. १९११ सालच्या ८ डिसेंबरच्या अंकात लंडन टाईम्सने लिहले होते.

*"दिल्ली ही कदाचित युरोपीय मनात प्रामुख्याने मोगल साम्राज्यातील दिवसांशी संलग्न असेलही परंतु तसे असले तरी हिंदुस्थानच्या इतिहासातील असंख्य स्मरणे ज्या स्थानावर एकवटली आहेत असे या स्थानाइतके दुसरे कोठचेही स्थान नाही. प्राचीन काळातील आर्य वंशाच्या (Race) लोकांनी याच मैदानावर घनघोर संघर्ष केले. त्यातील लढाया याच दिल्ली मैदानावर झाल्या होत्या. या लढायांच्या विषयी हिंदुधर्मात जिनिएस (महाप्रतिभावान) ठरेल अशा कविराजांनी अत्यंत वाचनीय, विचारांना प्रवृत्त करणारे, आश्चर्यचकित करणारे महाकाव्य, महाभारत रचले. पांडवांचे पिताजी राजे पंडू हे ज्या ठिकाणी दरबार भरवीत असत, त्या **हस्तिनापुरांचे** अवशेष याच दिल्ली मैदानात आहेत. विद्यमान काळातील दिल्ली या आधुनिक शहरापासून त्याच्या दक्षिणेला काही मैलांवर असलेल्या पुराण किल्ल्याच्या भिंती. हा किल्ला, हुमायुन बादशहाने बांधला. हा किल्ला हे संकल्पित दिल्ली दरबाराचे स्थान व्यापित असला तरी ते मैदान खुद्द पांडवांनी संस्थापित केलेल्या त्या प्राचीन **इंद्रप्रस्थ** या शहराचे नाव पुसून टाकीत नाही.*

लंडन टाईम्सने पुढे जाऊन असेही म्हटले आहे की, दरबार भरविण्यासाठी दिल्ली हे अत्युत्तम स्थान आहे. याचे कारण 'हिंदुस्थान या देशाचे ते प्रतिक आहे' आणि म्हणूनच जेव्हा जेव्हा हिंदुस्थानातील आपल्या साम्राज्याची सत्ता आणि वैभव याचे प्रदर्शन करण्यासाठी एखाद्या महान, गंभीर आणि दिमाखदार अशा समारंभाची आवश्यकता असते. त्यावेळी दिल्ली हे ताबडतोब, कोठचाही व कसलाही विकल्प उपस्थित न होता आपल्याकडे वारसा हक्काने आलेल्या 'सम्राटांचे वसतीस्थान' या स्थानावर पुन्हा एकदा स्थानापन्न होते. इ. स. १८७७ साली दिल्ली दरबार नदी 'काठ'च्या जवळ भरविला गेला होता. अनेक भारतीय संस्कृतीच्या द्योतक इमारती त्या स्थानाजवळ होत्या हे खरे. पण त्या स्थानाला भौगोलिक दृष्ट्या प्रतिमात्क असे जे स्थान होते, ते विचारात घेता, त्या इमारती संदर्भहीन होत्या. तत्कालिन एका ब्रिटिश अधिकाऱ्याला असेही सुचविण्याचे धारिष्ट्य झाले होते की 'लाल किल्ला' हा टप्प्याटप्प्यानी जमिनदोस्त करावा आणि त्यातील प्रत्येक 'टप्पा' ब्रिटिश म्युझियममध्ये प्रदर्शित करण्यासाठी पाठवून द्यावा. हा विचार इ. स. १८७७ सालच्या

आसपासचा परंतु इ. स. १९११ सालच्या सुमारास या दृष्टिकोनात आमूलाग्र बदल झाला होता.

इ. स. १९११ च्या दिल्ली दरबारचे नेतृत्व होते **सर जॉन हेवेट्ट** (Hewett) यांच्याकडे दरबाराच्या स्थानात हा जो बदल करण्यात आला होता, त्याला त्यांनी परिपूर्णता प्राप्त करून दिली. हे साध्य व्हावे यासाठी अनेक दक्षिण आशियाई प्रतिमा व प्रतिके (motif) दरबाराबद्दल आपली जी संकल्पचित्रे होती त्यात सर्व ठिकाणी सामिल करून घेतली गेली होती. या दरबाराचा जो परिसर होता त्याचे शिल्पी (architect) होते **सर सॅम्युअल स्विनटन जेकब.** त्यांनी या प्रतिमा व प्रतिके विकसित करण्यासाठी हिंदुस्थानातील महत्त्वाच्या ठिकाणी जे ऐतिहासिक अवशेष तगून राहिले होते त्याची पहाणी केली. फत्तेपूर सिक्री, आग्रा आणि दिल्ली यांचाही त्या पहाणीत अर्थातच अंतर्भाव होता. या सर्व संशोधनातून त्यांनी एक 'मिश्रण' निर्माण केले. त्यांच्या मतानुसार हिंदु व मुसलमान यांच्या काळातील जे जे काही उत्तम होते, ते या 'मिश्रणात' समाविष्ट करण्यात आले होते. या मिश्रणाला त्यांनी Indo-saracenic इन्डो सारासेनिक हे बिरुदही बहाल करून टाकले. (Indo-हिंदुस्थानी sarcenic - ख्रिश्चन-मुसलमान धर्मयुद्धाच्या काळातील अरब-मुसलमान).

हिंदुस्थानात तोवर झालेले 'देशी' दरबार ज्यावेळी भरविण्यात येत असत तेव्हा ते काही परंपरागत सोहळे करूनच भरविण्यात येत असत. या परंपरात अनस्यूत असलेले जास्तीत जास्त घटक या संकल्पित दिल्ली दरबारच्या सोहळ्यात एकत्र करून नियोजकांनी ते अंतर्भूत करण्याचा प्रयत्न केला होता, अर्थात त्यांना शक्य होते तेवढेच घटक सामिल करून घेण्यात आले होते. उदा. बादशहा या दरबाराच्या ठिकाणी मिरवणुकीतून जाणार होते. ही मिरवणूक दिल्ली दरवाजा, त्यानंतर दक्षिण आशियातील सर्वात मोठी मशिद-जामा मशिदेकडे जाऊन मिरवणूक दरबाराच्या ठिकाणी येणार होती. शुक्रवारी होणाऱ्या इस्लामी प्रार्थनेच्या वेळी हजर राहण्यास मोगल सम्राट याच मार्गाने जात असत. "मार्गाच्या एका बाजूला दिमाखाने उभा असलेला राजेशाही लाल किल्ला आणि दुसऱ्या बाजूला सूर्य प्रकाशात चमकणारे मशिदेचे घुमट होते. महान साम्राज्याच्या प्रगतीचे प्रदर्शन करण्यासाठी हा मार्ग आणि त्याच्या अवती भोवतीचा परिसर यापेक्षा अधिक चांगली पार्श्वभूमी दुसरी कोठचीही नव्हती." हिंदुस्थानातील ब्रिटिश साम्राज्याच्या वैभवाचे प्रदर्शन आणि ब्रिटनचे राजेसाहेब यांच्यात दुवा प्रस्थापित करण्याचे सर्व प्रयत्न दुर्दैवाने सफल झाले नाहीत. याचे कारण बादशहा जॉर्ज अंबारीत जाऊन बसले नाहीत. अंबारीत जाऊन बसण्यासाठी जी 'कसरत' (चढणे व उतरणे) करावी लागणार होती ती करण्यास राजेसाहेब तयार नव्हते. राजेसाहेब एका सामान्य अशा उमद्या घोड्यावर स्वार होऊन मिरवणुकीत सामिल झाले होते. त्यामुळे मिरवणुकीत सामिल झालेले ब्रिटिश अधिकारी आणि राजेसाहेब यांतले राजेसाहेब नेमके कोठचे हे मिरवणुक पहावयास आलेल्या सामान्य जनांना नक्कीच ओळखता आले नसते.

इ. स. १८५७ सालच्या दिल्ली दरबारची तारीख १ जानेवारी होती. याच तारखेला महाराणी व्हिक्टोरियाने आपल्या साम्राज्यात हिंदुस्थानला सामिल करून घेण्यात आले आहे ही घोषणा या राजदरबारी जाहीर करण्यात आली होती. ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या मागाहून असे लक्षात आले की याच तारखेला मुसलमानांचा 'मोहरम' हा दिवस येत आहे. म्हणून आपल्या मुसलमान प्रजाजनांच्या भावना लक्षात घेऊन बादशहांनी '१ जानेवारीच्या अगोदरची १२ डिसेंबर ही तारीख इ. स. १९११ च्या दरबारासाठी नक्की करण्याचा निर्णय घेतला' हा तारखेतील 'बदल' तसा अगदी 'क्षुल्लक' होता असे वाटेल, परंतु एका वेगळ्या दृष्टिकोनातून विचार करता हा 'बदल' लक्षणीय होता, १ जानेवारी ही तारीख हा 'देशी' धार्मिक स्वरूपाचा दिवस आहे, म्हणून संकल्पित दिल्ली दरबारची तारीख बदलणे, या कृतीमुळे या समारंभाला नवे रूप प्राप्त झाले आहे असे दाखविण्यात आले. 'दिल्ली दरबारने' आता एका 'देशी' सामाजिक 'संस्थेचे' रूप घेतले होते. थोडक्यात हिंदुस्थानातील सर्व प्रजाजनांना सामिल करून घेणारी, सर्वांना सामावून घेणारी 'संस्था' यापुढे ती बनणार होती. इत:पर ती 'देशी' लोकांवर बादशाही हुकुमाने लाभलेल्या एका कृत्रिम कर्मकांड स्वरूपातील घटना, या स्वरूपात पाश्चिमात्य इतिहासातील फक्त एक घटना आहे हे स्वरूप त्या दरबाराला तितकेसे राहणार नव्हते.

हिंदुस्थानातील प्रजाजन आणि ब्रिटिश राज्यकर्ते यांच्यात वैचारिक व सामाजिक स्वरूपाचे जे आदान-प्रदान होण्यास सुरुवात होत होती याचे हे तारखेतील आणि इतर बदलही सूचक व द्योतक होते. या संकल्पित दिल्ली दरबारात फक्त दोन गटांना वैधपणे सामिल होण्याचा अधिकार होता. **एक** ब्रिटिश अधिकारी. **दोन** हिंदुस्थानातील संस्थानांचे नरेश या दोन गटांच्या अंतर्गत सीमा. याचा अर्थ त्यात कोणाचा अंतर्भाव आहे वा नाही या अगदी आखिव-रेखिव होत्या. काही वर्षांच्या अंतराने भरणाऱ्या महान दिल्ली दरबारानी, या समारंभात सामिल होणाऱ्या मानकऱ्यांची उतरंड शास्त्रपूत केली होती. एवंच सरंजामदारी निष्ठेचा मोबदला म्हणून, या निष्ठावान लोकांना सत्ता व खास हक्क बहाल करून साम्राज्यशाही दर्शक अशी अत्यंत महत्त्वाची राजकीय परिभाषा तोवर तयार झाली होती. परंतु याचवेळी दुसरीही तितकीच महत्त्वाची राजकीय परिभाषा आपल्याकडे हिंदुस्थानातील जनतेचे लक्ष जावे आणि आपल्याला तिची निष्ठा प्राप्त व्हावी यासाठी ब्रिटिश राज्यकर्त्यांबरोबर चढाओढ करीत होती. ही दुसरी परिभाषा - म्हणजे राष्ट्रवादी-विचारसरणी स्वयंनिर्णय आणि भारतीय काँग्रेसने पुरस्कारलेली स्वातंत्र्याची चळवळ. या दोनांपैकी कोणती परिभाषा कोण बोलतो, व केव्हा बोलतो, हे त्या बोलणाऱ्याचे शब्द व कृती यांवर अत्यंत महत्त्वाचे भाष्य करण्याबाबत इ. स. १९११ साल उजाडण्याच्या आसपास होऊ लागले होते. सयाजीराव महाराज यांच्या इ. स. १९११ च्या दिल्ली दरबारातील वागणुकीला या दोन 'परिभाषामुळे' वेगळेच महत्त्व प्राप्त झाले होते. महाराजांच्या वागणुकीचा दोन्ही प्रकारे अर्थ लावता आला असता, एकीकडे त्यांची वागणूक ही एखाद्या सरंजामदाराने आपल्या सम्राटासमोर केलेले



अनुक्रमणिका

'गैर' वर्तन असा झाला असता. (पण त्याजबरोबर उगवत्या हिंदुस्थानी राष्ट्रवादाला परिभाषेने ब्रिटिश साम्राज्यशाही जुन्या परिभाषेची जागा घ्यावी. या इच्छेचे महाराजांची वागणूक हे द्योतक होते असेही म्हणता आले असते. **एवंच महाराजांचा गनिमी कावा यशस्वी ठरल्याची ती पावती होती.**

**दिल्ली दरबारातील 'तो प्रसंग'**

इ. स. १९११ सालातील १२ डिसेंबर रोजी दुपारी दीड वाजता बादशहा आणि राणीसाहेब दरबारासाठी उभारलेल्या शामियान्यात मध्यभागी आपल्या सिंहासनावर विराजमान झाले. राज्यपालांकडून, प्रमुख ब्रिटीश अधिकाऱ्यांकडून आणि संस्थांनी नरेशांकडून मानवंदना स्वीकारण्याच्या ते तयारीत होते. तुताऱ्या आणि ढोल यांच्या आवाजात दिल्ली दरबारास सुरवात झाली आहे असे जाहीर करण्यात आले. बादशहानी उभे राहून जमलेल्या मान्यवर पाहुण्यांना उद्देशून भाषणही केले. त्यांनी आपल्या भाषणात असे सांगितले की "ब्रिटिश सरकारशी एकनिष्ठ असलेले संस्थांनी नरेश आणि हिंदुस्थानातील स्वामिनिष्ठ जनता यांच्याबद्दल आपल्याला आपुलकी प्रकट करण्याची माझी इच्छा आहे." परंतु त्याजबरोबर या दोघांनीही त्यांना अगदी मनापासून हृदयातून भावणारी संतुष्टता व सरंजामदारी निष्ठा ज्या बादशहांना अर्पण केले होती ती स्वीकारण्याची 'माझी (बादशहांची) इच्छा आहे. 'सरंजामदारी निष्ठा', प्रत्यक्ष प्रकट करण्याच्या समारंभाला सुरवात झाली. 'दरबारी मान्यवर' बादशहांना कुर्निसात करण्यासाठी खाली दिलेल्या यादीत दर्शविलेल्या क्रमाने येऊ लागते.

**प्रथम** - सर्व जुने ब्रिटीश अधिकारी, यांच्यानंतर संस्थांनी नरेश त्यांच्या 'स्थाना'नुसार बादशहानां 'सलाम' करण्यासाठी जाणार होते. प्रत्येक संस्थानाचे क्षेत्रफळ लक्षात घेऊन त्याचे स्थान त्यानुसार ते त्याचे 'स्थान' नक्की करण्यात आलेले होते.

**ब्रिटीश अधिकारी खालील क्रमाने**

(१) गव्हर्नर जनरल - लॉर्ड हार्डिंग्ज

(२) सेना प्रमुख लॉर्ड क्रेअघ (Creagh)

(३) गव्हर्नर जनरलांच्या कार्यकारी समितीचे सदस्य

**संस्थानांचे नरेश**

(अ) हैद्राबाद (ब) बडोदे (क) म्हैसूर (ड) काश्मिर (इ) राजपुताना (फ) मध्य हिंदुस्थान (ग) बलुचिस्तान (ह) सिक्कीम व भुतान

बादशहा जॉर्ज आणि महाराणी मेरी साहेबा ही दोघे नोव्हेंबरच्या अखेरीला हिंदुस्थानच्या भूमीवर पाऊल ठेवल्याबरोबर लगेच दिल्लीत ५ डिसेंबरला जाऊन पोचले. म्हणजे त्यांचा या देशाशी परिचय फक्त जेमतेम एक आठवड्याचा. दिल्ली दरबाराला वरील छेदकात वर्णन केल्याप्रमाणे सुरवात झाली. यादीत नमूद केलेल्या क्रमांकानुसार अगदी अलिकडेच सम्राटपद प्राप्त झालेल्या सम्राटाला असलेली आपापली निष्ठा जाहीर करण्याचा जो कार्यक्रम होता त्यालाही सुरवात झाली. मग तेथे असे प्रत्यक्षात काय घडले त्याबद्दल एवढे वादंग निर्माण



अनुक्रमणिका

झाले. त्याची कथा अशी आहे. प्रथम **व्हॉईसरॉय हार्डिंग्ज** आले, त्यांनी मुजरा केला, आपली निष्ठा व्यक्त केली. त्याच्या पाठोपाठ दुसरे उच्च पदस्थ ब्रिटिश अधिकारी मग हिंदुस्थानातील नरेशांनी यावयाचे होते. त्यानुसार हिंदुस्थानातील संस्थांनी नरेशात सर्वश्रेष्ठ पदावर (संस्थानाचे क्षेत्रफळ लक्षात घेता) असलेल्या हैद्राबादच्या निझामांचा क्रमांक पहिला होता. त्यांनीही आपल्याकडून अपेक्षित असलेली निष्ठा जॉर्ज बादशहास सलाम ठोकून आविष्कृत केली. त्याच्याच पाठोपाठ **सयाजीराव गायकवाड** आले. ब्रिटीश राजवटीबद्दल आपल्याला असलेली घृणा त्यांनी अत्यंत छातीठोकपणे कोणत्याही स्वरूपाचा कोणाचाही मुलाहिजा न ठेवता प्रदर्शित केली. हे सारे काही सेकंदांच्या अवधीतच घडले.

ब्रिटिशांचे वैभव, आपली जगातील कीर्ती आणि प्रतिष्ठा याचे झगमगाटी प्रदर्शन व्हावे हा दिल्ली दरबार भरविण्यामागचा हेतू होता. असे केल्याने हिंदुस्थानाबद्दल गोऱ्या ब्रिटीश नागरिकांच्या ज्या फॅन्टसीज (कल्पनाविलास) होत्या आणि या उपखंडात राजेशाहीबद्दल ज्या परंपरा होत्या त्यांना खतपणी मिळणार होते. संस्थांनी नरेशाने आपले सर्व दागदागिने, जडजवाहिर घालून, त्याचे प्रदर्शन, त्यांनी आपल्या सम्राटासमोर नतमस्तक झाल्याने ब्रिटीश साम्राज्याचे जे वैभव आहे प्रतिष्ठा, त्या साम्राज्याविषयीचा गूढ (मिस्टीक) असा भाव, तसेच त्या साम्राज्याचा जो दिमाख आहे त्याला त्यामुळे अर्थ प्राप्त होणार होता. इ. स. १८७७ आणि इ. स. १९०२ साली भरलेल्या अशाच प्रकारच्या दोन दिल्ली दरबारात **सयाजीराव महाराज** हजर होते. म्हणजे आपल्याकडून काय आवश्यक अशी अपेक्षा आहे याची त्यांना परिपूर्णपणे जाणीव होती.

**सयाजीराव महाराजांनी** साधा शुभ्र पांढरा पोशाख घातला होता. कोणत्याही प्रकारचे अलंकार त्यांच्या अंगावर नव्हते. आचरटपणे ऐश्वर्याचे व संपत्तीचे प्रदर्शन करणाऱ्या जगातील पूर्वदिशेकडील संस्थांनी नरेशांच्या प्रतिमा या अशा पेहरावातून निर्माण होणे शक्य नव्हते. संस्थांनी नरेशाने कमरेला म्यान केलेल्या तरवारीचे प्रदर्शन केले पाहिजे अशी परंपरा रूढ करणारा दंडक ब्रिटिश सरकारने घालून दिला होता, त्या ऐवजी 'सोन्याचे टोक असलेली काठी महाराजांच्या हाती होती.' या सर्वावर मात करणारे व महत्त्वाचे म्हणजे ब्रिटिश सरकार हिंदुस्थानातील संस्थांनी नरेशाला देत असलेला **सर्वश्रेष्ठ किताब ऑर्डर ऑफ स्टार ऑफ इंडिया** हा किताब धारण करणारा पट्टा त्यांनी अंगावर चढविला नव्हता. एवंच या अशा प्रकारे आपणास दरबारात हजर करून हा दरबार संघटित करणाऱ्या ब्रिटिश राज्यकर्त्यांनी त्यांच्याबद्दल जे काही गृहीत धरले होते, त्यातील प्रत्येक गोष्ट व प्रत्येक अपेक्षा **महाराजांनी** अत्यंत कौशल्याने धुडकावून लावली होती.

बादशहा जॉर्ज यांच्यासमोर जाऊन उभे राहिल्यानंतर बादशहा व महाराणी या प्रत्येकास स्वतंत्र मुजरा न करता, त्या ऐवजी एकच मुजरा करून महाराज मागे सरकले. परंपरागत सात पावले मागे न सरकता, ते फक्त काहीच पावले मागे गेले. थोडावेळ बादशहा जॉर्ज यांच्यासमोर थबकले. यानंतर त्यांना पाठ दाखवीत ते दरबारातून बाहेर पडले. आपण जे काही वर्तन केले, त्यात आपले काही चुकले आहे किंवा त्यात काही कमतरता आहे याची

गंधवार्ताही महाराजांना नव्हती - किंवा तसे ते भासवीत होते. दुसऱ्या दिवशी त्यांच्या वागणुकीसंबंधात जो गदारोळ झाला त्याने महाराजांना त्याबाबत ज्ञान झाले.

या प्रसंगाच्या साक्षीदारांचे जे पूर्वग्रह होते त्यानुसार दरबारातील या इतिहास प्रसिद्ध घटनेच्या वृत्तांतात बदल होतो. महाराजांचे आपण मित्र आहोत अगर त्यांच्या पक्षाचे आहोत असे मानणारे जे कोणी होते त्यांनी पुढील प्रमाणे युक्तिवाद केला. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे या समारंभाच्या वेळी महाराज मनातून फार अस्वस्थ होते. त्याचे कारण त्यांच्या कन्येचा साखरपुडा ग्वाल्हेर महाराज यांच्याबरोबर विवाह करावयाचा या हेतूने झाला होता. परंतु प्रत्यक्षात ती राजकन्या कुच बिहारच्या महाराजांच्या बंधूंच्या प्रेमात होती. तसेच **एन्सर्ट स्टाथम** या इंग्लिश माणसाने आपल्या पत्नीपासून घटस्फोट मिळावा या हेतूने न्यायालयात खटला दाखल केला होता. त्यात पुराव्यादाखल आपल्या पत्नीचा प्रियकर म्हणून महाराजांचे नाव अंतर्भूत केले होते. याच युक्तिवादाचा पुढचा भाग असा होता की, या मानसिक ताणामुळे महाराजांनी योग्य ती पाऊले मागे गेले नाहीत अगर ते गोंधळले होते. म्हणजेच त्यांनी अजाणता, कोणताही हेतू मनात न ठेवता, अथवा निष्काळजीपणाने ते चुकीचे वर्तन केले असावे. याचे आणखी एक कारण असे असावे की या दरबाराच्या प्रसंगी कोणी केव्हा कसे वागायचे या संबंधात जी रंगीत तालीम झाली होती त्याला महाराज गैरहजर होते. अशा प्रकारची कारणे महाराजांच्या मित्रांनी आपल्या युक्तिवादात नमूद केली होती.

ब्रिटिश सरकारचे असल्या शंका-कुशंकांनी समाधान होण्यासारखे नव्हते. सरकारने अधिक खोलात जाऊन विचार केला होता. राजद्रोहाच्या चळवळीचा एक धगधगता विभाग बडोदे हे संस्थान आहे याबद्दल त्या संस्थानच्या रेसिडेंटची केव्हाच खात्री पटलेली होती. **व्हॉईसराय हार्डिंग्ज** यांनी एका चरचरीत पत्राद्वारे बडोदा नरेशांनी त्या पत्रात नमूद केलेल्या गोष्टीविरुद्ध कारवाई केली नाही आणि त्यातील सूचना अंमलात आणल्या नाहीत, तर त्याचे परिणाम गंभीर होतील अशी धमकी त्या पत्रातच अंतर्भूत होती. या पत्राचा उल्लेख या पूर्वीच येऊन गेला आहे. ही धमकी प्रत्यक्ष कार्यवाहीत उतरविण्याकरीता संधी केव्हा मिळते याची वाटच ते बघत होते. महाराजांनी आपल्या विरुद्ध उठलेल्या या सर्व गदारोळानंतर एक दिवस थांबून दुसऱ्याच दिवशी उत्तर दिले होते. महाराजांविरुद्ध उठलेले वादळ किती प्रचंड आहे याबद्दल या मध्यंतरीच्या काळात **नेक नामदार गोपाळ कृष्ण गोखले** यांनी महाराजांना इशारा दिला होता. तो लक्षात घेऊन महाराजांनी व्हॉईसरॉय साहेबांना एक पत्र ताबडतोब रवाना केले. महाराजांचा या पत्रातील पवित्रा बचावाचा होता. **आपणास पदच्युत करण्यासाठी ब्रिटिश सरकार टपलेले आहे. हे महाराजांच्या मनात सदैव असे.** या पत्रात आपण सर्वस्वी निष्पाप आहोत, व कोणत्याही स्वरूपाची आगळीक करण्याचा विचार आपल्या मनाला शिवलाही नव्हता हे महाराजांनी नमूद केले होते. याहीपुढे जाऊन आपण **बादशहा जॉर्ज** यांच्याशी एकनिष्ठ आहोत आणि त्यांच्याबद्दल आपल्या मनात सदैव प्रेमभावनाच आहे असे जाहीर केले. परंतु हा प्रसंग घडल्यानंतर थोड्याच दिवसांनी आंतरराष्ट्रीय वृत्तपत्रानी या प्रसंगाची दखल घेण्यास सुरुवात केली.

महाराजांच्या चरित्रावर, त्यांच्या नेतृत्वावर आणि त्यांच्या राजनिष्ठेवर खुलेआम हल्ला चढविणाऱ्या अनेक द्वेषमूलक आणि त्यांना इजा पोचविण्यासाठी अत्यंत उत्सुक असणाऱ्या अनेक लेखांना महाराजांना सामोरे जावे लागले होते. राजाहून राजनिष्ठ असणाऱ्या तत्कालिन 'टाईम्सने' आणखी एका प्रकारे महाराजांच्या राजनिष्ठेची तपशिलात जाऊन तपासणी केली होती. यात महाराजांच्या सर्व सामान्यपणे दृष्टोत्पत्तीस न येणाऱ्या हालचालींचा व वागणूकीचा त्यात अंतर्भाव होता. उदा. प्रख्यात 'राजद्रोही' **मादाम कामा** यांच्याबरोबर त्यांचा असलेला संपर्क आणि राष्ट्रवादी वृत्तपत्रातून महाराजांवर झालेला स्तुतीचा वर्षाव. महाराजांनी बादशहाचा अपमान किती प्रमाणात व कशा प्रकारे केला हे आमजनतेच्या लक्षात यावे अथवा तिचे लक्ष वेधावे या हेतूने 'त्या दरबार' घटनेचा माहितीपट सर्व सिनेमागृहातून वारंवार प्रदर्शित केला जात होता.

ब्रिटिश सरकारला जी अपेक्षा होती, त्याच्या अगदी नेमका उलट परिणाम या महाराजांवर त्यांची बदनामी व्हावी या हेतूने करण्यात येणाऱ्या टिकेचा झाला होता. काही लोकांच्या मनात तरी 'राष्ट्रवादाचे प्रतिक म्हणून महाराजांची असलेली प्रतिमा अधिक पक्की झाली. इ. स. १९१२ जानेवारीच्या सुरुवातीला प्रख्यात स्कॉटीश मजूर पुढारी आणि ब्रिटिश पार्लमेंटचे सदस्य कॉमरेड **केर हार्डी** यांनी महाराज दिल्ली दरबारात ज्या प्रकारे वागले त्याची स्तुती करणारा लेख लिहिला. त्याजबरोबर 'सिंहासनासमारे लोटांगण घालून लाळघोटेपणा करावा तसेच मूर्खपणाचे प्रतिक व प्रतिमा या (बादशहा) यांच्याजवळ जावे याचे शिक्षण ज्यांना देण्यात आले होते त्यांचीही **कॉ. केर हार्डी** यांनी या लेखात टर उडविली होती.

संधी मिळेल त्यावेळी, शक्य असेल तेव्हा आपला बचाव करण्याची मोहीम महाराजांनी चालू ठेवली होती. या मोहिमेचा एक भाग म्हणून त्यांनी अनेक उच्च पदस्थ ब्रिटिश अधिकाऱ्यांना पत्र पाठविले. (उदा. मुंबई इलाख्याचे गतकालीन **गव्हर्नर लॉर्ड लॅमिंग्टन** यास इ. स. १९१२ च्या ५ जानेवारीला लिहलेले पत्र तसेच अनेक जनताप्रिय वृत्तपत्रातून आपण किती निर्दोष व निष्पाप आहोत असे जाहीर केले. आपल्याकडून ही सारी वागणूक 'आपण ज्याची कल्पना केली नव्हती असा 'गोंधळ आणि मानसिक अस्वस्थता' या कारणामुळे झाली असावी हे त्यांनी सांगितले होते. ब्रिटिश कलासमीक्षक **एम. एच. स्पिलमन** यांनी इ. स. १९१२ च्या जानेवारीत लिहलेल्या पत्रात त्यांनी असे लिहले होते की "रेसिडेंट साहेबांनी फक्त एकदाच मुजरा करावयाचा असेच सांगितले होते. या सारखेच बादशहासमोर मुजरा करावयास जाणारे जे काही माझ्या अगोदर जाणारे नरेश होते त्यांनाही सांगण्यात आले होते हे मला ज्ञात झाले आहे. एका अत्यंत खानदानी स्त्रीला मुजरा करण्यास माझ्या मनात कोठल्याही प्रकारचा संदेह निर्माण न होण्याइतपत स्त्री दाक्षिण्याची पुरेशी बुज ठेवणारा मी नक्की आहे. परंतु एकदाच मुजरा केल्याने त्या अत्यंत खानदानी स्त्रीचा मी अवमान करतो आहे, हे माझ्या लक्षातच आले नाही. परंतु आम्हास ज्यात कोणत्याही प्रकारची निवड करण्याचे स्वातंत्र्य नाही अशा समारंभात जे काही सोहळे हातात, त्या प्रसंगी कसे वर्तन

करावे याबद्दल प्रश्न उपस्थित करण्याचे धाडस कोणालाही होत नाही.'' महाराजांची ही मल्लीनाथी केवळ आपल्या निर्दोषी निष्पाप असण्याबाबत आपल्या भूमिकेचा पुनरुच्चार करीत आहे हे खरे. परंतु या पत्रातही एक गोम आहे. ती त्या पत्राच्या अखेरच्या वाक्यात ब्रिटिश सरकारवरची टीका व सरकारी धोरणाबद्दलचा उपहास त्यातून व्यक्त होतो इ. स. १९०२ साली जो दिल्ली दरबार झाला, त्या प्रसंगी जी हत्तींची मिरवणुक काढण्यात आली होती, तिला काही संदर्भ होता का आणि त्या मिरवणुकीची आवश्यकता काय? असे त्या दरबारासंबंधात महाराजांनी जे गैर (improper) प्रश्न निर्माण केले होते, त्यामुळे ब्रिटिश सरकारचा राग त्यांनी आपल्यावर ओढवून घेतला होता. इ. स. १९११ च्या दिल्ली दरबारात त्यांनी जी वर्तणूक केली, तिचा समर्थनार्थ त्यांनी त्या ब्रिटिश सरकारच्या रागाचा संरक्षणात्मक ढाल म्हणून उपयोग केला होता.

महाराजांनी केलेल्या या भरघोस क्षमायाचनेचा थोडासा अनुकूल परिणाम झाला. इ. स. १९१२च्या ८ ऑक्टोबर रोजी, हे सारेच प्रकरण अतिरंजितपणे शब्दांकित झाले आहे असे **लॉर्ड हार्डिंग्ज** यांच्या बंधूंनी जाहीर केले. हा प्रसंग महाराज मानसिक ताण-तणावाखाली असल्याने घडला असला पाहिजे अशी पुस्तीही या बंधूंनी **व्हायकाऊंट हार्डिंग्ज** यांनी आपल्या निवेदनास जोडली होती. त्याही पुढे जाऊन ते असेही म्हणाले की ''महाराजांनी बुद्धिपुरस्सरपणे **बादशहा जॉर्ज** यांचा जाहीर अपमान केला असता तर मग महाराज हे हिंदुस्थानातील संस्थानिकातील अत्यंत धाडसी नरेश ठरले असते. व्हायकाऊंट यांचे हे उद्गार हिंदुस्थानातील वृत्तपत्रांच्या वाटेने खालपर्यंत झिरपत गेले होते. हिंदुस्थानातील वृत्तपत्रांनी महाराजांची 'साम्राज्य निष्ठा' आणि त्यांची प्रगतिशील राजवट यांची स्तुती करणारे लेख लिहिले. **पॉल माल गॅझेट** या प्रख्यात लंडन येथील वृत्तपत्रात one who knows better (अधिक चांगले ज्ञान असणारा) या टोपणनावाखाली इ. स. १९१३च्या २० जानेवारीच्या अंकात लिहलेल्या लेखात महाराजांवर पुन्हा एकदा टीकेचा भडिमार करण्यात आला होता. या सर्व कालखंडात महाराजांविरुद्ध जाहिरपणे टीका करणाऱ्या लेखात प्रत्यक्ष प्रसिद्ध झालेला तो शेवटचा लेख.

ब्रिटिश सरकारची - **व्हायकाऊंट हार्डिंग्ज** यांच्या करवी जाहीर झालेली प्रतिक्रिया ही वरवरची होती, वस्तुस्थिती अशी होती की 'दिल्ली दरबारातील' तो प्रसंग घडल्यापासून ब्रिटिश राज्यकर्ते अंतर्यामी संतापाने खदखदत होते. महाराजांबरोबर झालेल्या गोपनीय पत्रव्यवहार आणि त्यांच्या बरोबर झालेली संभाषणे यातून राज्यकर्त्यांची ही प्रवृत्ती स्पष्टपणे दिसून येते. या सर्व गोपनीय आदान-प्रदानात ब्रिटिश राज्यकर्त्यांनी असे स्पष्ट केले होते की महाराजांच्या एकंदर वागणुकीबद्दल ते नाराज आहेत आणि त्याकारणाने नरेश पदावरून पदच्युत केले जावे अशा बिंदूपर्यंत ते पोचले आहेत, लंडनमधील ब्रिटिश सरकारच्या 'परराष्ट्र खात्यामध्ये' महाराजासंबंधात इ. स. १९१२ साली अनेक हालचाली अगदी लगबगीने केल्या जात होत्या. राज्यद्रोहाचा किमान संशय का होईना असे सूचन देणारी महाराजांची कोणतीही हालचाल 'दुर्बिणीखाली' घेऊन तपासण्यात येत होती, या पूर्वी



अनुक्रमणिका

महाराजांना जी मानसन्मानाची वागणूक देण्यात येत होती ती थांबविण्यात आली होती. त्याजबरोबर इ. स. १९११ नंतर हिंदुस्थानातील राज्यद्रोहीशी उलाढाली करून तो निपटून काढण्याच्या कामात बडोदे संस्थानात जी काही ठोस पाऊले प्रत्यक्षात उचलली गेली होती

वा नव्हती, त्याबद्दलही अगदी तपशिलात जाऊन विश्लेषण व पृथक्करण करण्यात येत होते. परराष्ट्र खात्याच्या कारवाईला, गुन्हा अन्वेषण खात्याच्या (C. I. D.) कडून होणाऱ्या तपासाची जोड मिळाली होती. महाराज आणि त्यांच्याबरोबर असलेला परिवार यांच्यावर स्कॉटलड यार्ड या विश्वविख्यात गुप्त पोलिसी संघटनेने बारीक नजर ठेवावी असे गुन्हा अन्वेषण खात्याने सुचविले होते. महाराजांनाही आपल्या माहितगारांकडून असे समजले होते की आपणावर आणि आपल्या परिवारावर ब्रिटिश राज्यकर्त्यांची बारीक नजर व लक्ष आहे. ही माहिती लक्षात घेऊन, ब्रिटीश साम्राज्याचे घोरण म्हणून जे समजले जात होते; ते आपण कमालीच्या श्रद्धेने अंमलात आणीत आहोत असा त्यांनी देखावा निर्माण केला, तथापि या एवढ्यावरच हे प्रकरण संपले असे म्हणण्यास ब्रिटिश राज्यकर्त्यांची अनिच्छा होती. म्हणूनच इ. स. १९१३ या वर्षात सदा-सर्वकाळ महाराज हे हिंदुस्थानातील राष्ट्रवादी चळवळींना पाठिंबा देत आहेत, असे आरोप करण्याचे ब्रिटिश राज्यकर्त्यांनी सातत्याने चालूच ठेवले होते. राज्यकर्त्यांचा हा विरोध काही वेळेला फारच विनोदी थराला पोचत असे. उदा. 'पाश्चिमात्य सांस्कृतीतीत उणिवा' या विषयावर झालेल्या वादविवाद सभेत महाराजांच्या मुलाने भाग घेतल्याबद्दल त्यांच्यावर ठपका ठेवण्यात आला होता !

राजद्रोह वा अन्य कटकारस्थानात (TREASON) महाराज सामिल झाले आहेत हे आरोप करून **सयाजीराव महाराजांवर** कारवाई करायची नाही असे सरते शेवटी ब्रिटिश सरकारने ठरविले. याला काही आंतरराष्ट्रीय कारणे होती. उदा. इ. स. १९१४ साली २८ जून रोजी **आर्चड्यूक फर्डिनंड** यांचा खून झाला. आणि त्या पाठोपाठ पहिल्या महायुद्धाला (इ. स. १९१४-१९१८) तोंड फुटण्याची शक्यता निर्माण झाली. या घटना ब्रिटिश राज्यकर्त्यांना नरमाईचे घोरण पत्करण्यास कारणीभूत झाल्या असाव्यात. याशिवाय आणखीही दोन संभाव्य कारणे असावीत. एकतर **सयाजीराव गायकवाड** यांच्यासारख्या अत्यंत लोकप्रिय संस्थानी राजास पदच्युत केल्यास, बडोद्यातील प्रजा बंड करून उठण्याची शक्यता होती ही ठिणगी पडल्यामुळे यदाकदाचित अखिल हिंदुस्थान बंड करून उठेल ही भिती देखील राज्यकर्त्यांच्या मनात होती. म्हणूनच क्षितिजावर स्पष्टपणे दिसणारी संभाव्य जर्मन स्वारीची शक्यता लक्षात घेता, महाराजांवर राजद्रोहाचा आरोप करणे, राज्यनीतीच्या व व्यवस्थापनाच्या दृष्टीने तसे वर्तन करणे त्या राजवटीला आत्मघातक ठरणार होते. एवंच ब्रिटिश सरकारने राजद्रोह्याच्या आरोपाचा पुनरुच्चार केला नाही आणि **सयाजीराव महाराजांनी** या आरोपाचा स्पष्ट शब्दात इन्कार केला. परंतु ब्रिटिशांचे हे नरमाईचे धोरण नजिक येऊन ठेपणाऱ्या पहिल्या महायुद्धाचा परिणाम नव्हता. भारतातील सरंजामशाहीची जी समाज संरचना होती तिला धक्का लागू नये हा विचार त्या धोरणामागे होता. असा युक्तिवाद **चार्लस निकोलस** या पंडिताने केला आहे. दिल्ली दरबारातील महाराजांचे ते वागणेही त्या

मानाने इतर कोठल्याही घटनांशी संबंधित नसलेली घटना होती. हा युक्तिवाद किती चुकीचा आहे हे येथवरच्या विवेचनातून स्पष्ट झाले असावे. पंडित **चार्लस निकोलस** हे दिल्ली घटनेच्या अगोदरच्या दशकातील घटनाच लक्षात घेत नाहीत या कारणाने त्यांनी तो निष्कर्ष काढला आहे.

दिल्ली दरबार या घटनेच्या अगोदर घडलेल्या घटना एकवेळ बाजूस ठेऊ या **आगाखानांबरोबर** महाराजांचे जे संभाषण झाले होते, त्यात महाराजांनी सरंजामशाही संरचनेला धक्का लागू नये असे आपल्याला वाटत नाही असे स्पष्टपणे सांगितले होते. हे संभाषण जमेस धरल्यानंतर इ. स. १९११ सालच्या दिल्ली दरबारात घडलेल्या घटनेचा अन्वयार्थ कसा लावावयाचा व त्यावर भाष्य काय करावयाचे? हा प्रश्न आहे. या प्रश्नाला सामोरे जाण्यापूर्वी दिल्ली दरबार या घटनेसंबंधी जो नवा पुरावा सादर करण्यात आला आहे तो विचारात घावयास हवा. चलत्- चित्रपटांचे (films) इतिहासकार **स्टेफन बॉटमोर** यांनी हा पुरावा सादर केलेला आहे.

'दिल्ली दरबार प्रसंग' या संबंधी उपलब्ध असलेल्या अनेक चलत् चित्रपटांचे **स्टेफन बॉटमोर** यांनी पृथक्करण केले आहे. त्यात त्यांनी अत्यंत लक्षणीय अशा त्या प्रसंगी घडलेल्या दोन घटनांचा शोध लागला. **(एक) इतर संस्थानिकांशी तुलना करता सर्वसाधारणपणे सयाजीरावांच्या कृतीत तसे काहीसे आगळे-वेगळे नव्हते. (दोन)** अनेक चलत्-चित्रपटात, एका संस्थानिकास जो **सयाजीराव गायकवाड** नव्हता, त्यास **सयाजीराव गायकवाड** म्हणून 'ओळखले गेले आहे !' **बॉटमोर** यांनी आपल्या लेखाच्या राहिलेल्या भागात चलत-चित्रपटांच्या इतिहासाच्या दृष्टीने त्या चित्रपटांची निर्मिती विकास आणि त्यांची वैशिष्टे यावरच लक्ष केंद्रीत केले आहे. असे असले तरी **बॉटमोर** यांच्या संशोधनातून निर्माण झालेले हे सूचक विचार फारच दूरगामी परिणाम करणारे आहेत. विशेष करून आपण ज्या विषयासंबंधी विचार करीत आहोत, त्या संदर्भात खास करून लक्षणीय आहेत.

या प्रसंगाच्या चलत्- चित्रपटापैकी दोन महत्वाच्या चलत्-चित्रपटांचा विचार करूया. GAUMONT COMPANY **गोमॉन्ट कंपनी.** या कंपनीने निर्माण केलेला चलत्- चित्रपट हा अधिक महत्त्वाचा आहे. यांच्याबद्दल यात - पहिल्या दृश्यात दाखविलेले नरेश हे सयाजीराव गायकवाड असे सांगितले आहे. परंतु या **दृश्यात दाखविलेले नरेश त्यांचा पोशाख त्यांच्या शरिराची ठेवण** आणि त्यांनी धारण केलेली पगडी वा पागोटे या साऱ्या लक्षणावरून ते **म्हैसूर संस्थानचे महाराज** आहेत हे सहजपणे ओळखता येते. (**गोमाँट** चलत चित्रपटाला बादशहा जॉर्ज यांच्याबद्दल बडोद्याच्या गायकवाडांनी कशा प्रकारे सादर भावना व्यक्त केली असे शीर्षक आहे) **जॉर्ज बॉटमोर यांनी देखील हाच** निष्कर्ष काढलेला आहे.

या ठिकाणी आपण **बारकर** या कंपनीने निर्माण केलेल्या खास प्रसंगासंबंधीच्या चलत्- चित्रपटाकडे वळूया. या महत्त्वाच्या चलत्-चित्रपटातील एक **'छायाचित्र'** तत्कालिन ब्रिटिश



अनुक्रमणिका

वृत्तपत्रांपैकी अनेकानी ते प्रसिद्ध केले होते. गंमत अशी आहे की या 'छायाचित्रा'संबंधी कोणाच्या 'सर्व हक्क स्वाधीन' आहेत, या संबंधात **बारकर** विरुद्ध **'डेमीस्केच'** हा खटला ब्रिटिश कोर्टात दाखल करण्यात आला. या खटल्यात अंतर्भूत असलेल्या कायदेपंडितांच्या समुहाने असे नमूद केले होते की ब्रिटनमधील **इंडिया ऑफिसच्या** मदतीने **'बडोदे नरेशांची'** ओळख पटविण्याचा प्रयत्न केला गेला होता. पण **इंडिया ऑफिसने तसे करण्यास** स्पष्टपणे **नकार दिला होता. बारकर** आणि **डेमीस्केच** यापैकी कोठच्या बाजूने ही विनंती केली होती याबद्दल **डॉ. बॉटमोर** यांना खात्री नाही, त्यांनी खालील गोष्टी नमूद केल्या आहेत. इंडिया ऑफिसच्या कायदेविषयक सल्लागारांनी असा युक्तिवाद केला की हा दोन प्रसार माध्यमातील (मिडीया) संघटनातील हा खाजगी स्वरूपाचा वाद असल्याकारणाने, अशा प्रकारे कोणत्याही बाजूला मदत करणे हे अजिबात इष्ट नाही. हा जो कायदेविषयक सल्ला देण्यात आला होता त्याचा अर्थातच कोणालाही प्रतिवाद करता येणार नाही. पण त्याजबरोबर हेही तितकेच सत्य आहे की अत्यंत स्फोटक असा जो राजकीय प्रश्न होता त्या संबंधी कसल्याही प्रकारची वादग्रस्त ठरेल अशी कृती न करण्याबाबत हा सल्ला **इंडिया ऑफिसला** आपले संरक्षण करण्याच्या दृष्टीने फारच चांगला व उपयुक्त ठरला होता.

या चलत्-चित्रपटातून घेतलेल्या छायाचित्रात अगदी स्पष्टपणे असे दिसून येते की या तथाकथित **सयाजीराव महाराजांनी** आपला ऑर्डर ऑफ स्टार ऑफ इंडिया हा महासन्मान दर्शन पट्टा किंवा कोणत्याही प्रकारे नजरेत भरतील असे अलंकार परिधान केलेले नाहीत. या पूर्वीच आपण अशी नोंद घेतली आहे की महाराजांनी, बादशहा व राणीसाहेब या दोघांनाही एकाच वेळा कुर्निसात केला. एवंच 'दिल्ली दरबार' सारख्या प्रसंगी ज्या प्रकारच्या वागणुकीची अपेक्षा होती, तिच्या मुलभूत प्रकृती विरुद्ध महाराजांनी वागणूक केली होती. या ठिकाणी एक मुद्दा उन्मेखून लक्षात ठेवला पाहिजे. या दरबाराला हजर राहण्यास आले त्यावेळी दिल्ली दरबारात कोणत्या प्रकारच्या वर्तनाची अपेक्षा असते हे त्यांना माहीत नव्हते असे नाही. यापूर्वी ते अशाच प्रकारच्या दोन दिल्ली दरबारात हजर होते व सहभागीही झाले होते. थोडक्यात अशा प्रकारच्या दरबारात सर्वसामान्यपणे कोणत्या पद्धतीची वागणूक करावयाची याबाबत महाराज अज्ञानी होते, या प्रकारच्या युक्तिवादावर म्हणूनच कोणाचाही विश्वास बसणे कठीण होते. त्याजबरोबर ब्रिटिश साम्राज्याचे बादशहा यांचा महाराजांनी अत्यंत नाट्यपूर्णपणे आणि जोरदारपणे अपमान केला असे जे चित्र रंगविले जाते त्यातही काही अर्थ नाही. या संबंधी **डॉ. बॉटमोर** यांनी असे मत व्यक्त केले आहे की हिंदुस्थानातील इतर संस्थानी नरेशांच्या त्या दिल्ली दरबारातील वागणुकीशी तुलना करता महाराजांच्या कृतीमध्ये लक्षणीय असे काहीच नव्हते. उदा. **डॉ. बॉटमोर** यांनी दोन्ही चलत्-चित्रपटांचा अभ्यास केल्यानंतर ते असे नोंदवितात की म्हैसूरचे महाराज (हेच सयाजीराव महाराज आहेत असे समजले जात होते) आणि भोपाळच्या बेगम साहेबा **या दोघांनीही बादशहाना कुर्निसात करून परतताना महाराजांप्रमाणेच वर्तन केले होते.** याचा अर्थ

असा आहे की महाराजांनी केलेली कृती ही अत्यंत धाडसी विरोध व उद्दामपणा दर्शविणारी नव्हती असा होतो. असे जर होते तर त्यांच्या त्या दरबारातील वर्तनातून जे प्रचंड राजकीय वादळ निर्माण झाले त्याचे स्पष्टीकरण आपणास मग कोठच्या सूत्राच्या आधारे देता येईल.

विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात, ज्या घटना घडल्या त्यातच या प्रश्नाचे उत्तर सापडण्याची शक्यता आहे असे वाटते. 'आधुनिकतेचा अवलंब करून, तत्कालीन ज्ञात असे जे राष्ट्रवादी होते त्यांच्याबरोबर सहकार करून, वेळप्रसंगी त्यांना 'आसरा' देऊन महाराजांनी तोवर अगदी पद्धतशीरपणे ब्रिटीश राजवटीचा प्रतिकार केला होता. महाराजांच्या या दोन वेगवेगळ्या सामाजिक व राजकीय क्षेत्रातील कृतीमुळे एक **सर्वमान्य** अशी 'गायकवाड प्रतिमा' निर्माण होण्यास एक प्रकारे मदतच झाली होती. एकीकडे ते 'हिंदुस्थानी' 'आदर्श व प्रगती' यांचे ते प्रतिक होते. पण त्याजबरोबर ते 'हिंदुस्थानच्या प्रतिकाराचेही' प्रतिक होते - असे असले तरी बोलणे आणि प्रत्यक्ष कृती या दोघांनाही अलग ठेवणारी जी सूक्ष्म रेषा आहे, त्या रेषेच्या दरम्यान जो पैस असतो, त्यातच आपण सदैव वावरत आहोत याची महाराजांना चांगलीच जाणीव होती. या सीमारेषेच्या दरम्यान वावरण्याची कसरत, त्यांनी अत्यंत काळजीपूर्वक जोपासली होती. त्यांच्या हातून यदाकदाचित काही चुकीची कृती घडली असल्यास ती 'प्रत्यक्ष कृतींच्याच बाजूसच नेहमी झुकणारी होती.' हे त्या काळातील त्यांच्या वागणुकीवरून स्पष्टपणे दिसून येते. या विधानाबद्दलचा पुरावा महाराजांच्या एकंदर 'खाजगी व जाहीर' वागणुकीतून उपलब्ध आहे. एकीकडे त्यांना या 'दिल्ली दरबारात' कशा प्रकारे वर्तन करावे या संबंधी ज्या परंपरा नव्याने तयार करण्यात आल्या होत्या त्यांचा प्रतिकार करण्यासाठी, आपल्या दरबारातील वागणुकीकरवी जाहीर निवेदन करणे, पण त्याजबरोबर ब्रिटीश राजवटीला आपला जो विरोध आहे तो दर्शविणे, व त्यामुळे निर्माण होणाऱ्या पेचप्रसंगातून सुटका करून घेण्यासाठी मार्ग मोकळा ठेवणे, ही सारी उद्दिष्टे साध्य करण्याचा मार्ग महाराजांनी अगदी विचारपूर्वक निवडला होता. आपले हे इप्सित साध्य व्हावे यासाठी आपल्या पोशाखात, अत्यंत सूक्ष्म पण त्याजबरोबर लक्षणीय असा फरक करून आणि ब्रिटीश सत्तेसमोर नतमस्तक होण्याचा देखावा करत नाही; आपण हे सारे अगदी मनापासून करीत आहोत हेही दाखवून द्यावयाचे, या मार्गाचा अवलंब त्यांनी केला होता.

**सयाजीराव महाराजांच्या** विरुद्ध ब्रिटिश राज्यकर्त्यांची प्रतिक्रिया ही इतकी तीव्र का झाली या कोड्याचे उत्तर महाराजांची उद्दिष्टे विचारात घेतली म्हणजे मिळते. **(एक)** महाराजांनी राज्यद्रोही कृत्य केले आहे अशी ब्रिटिश सरकारची खात्री होती व त्यानुसार त्यांची सर्वसाधारण प्रतिक्रिया व्यक्त झाली होती. **दोन** सयाजीराव महाराज हे ज्या चलत्-चित्रपटात नव्हतेच त्या चलत्-चित्रपटाची रचना आणि त्यानंतरचे त्याचे सार्वजनिक प्रक्षेपण. हे दोन मुद्दे लक्षात विचारात घेतले की तत्कालीन ब्रिटीश राज्यकर्त्यांच्या प्रतिक्रियेबद्दल जे कोडे होते, त्याची उकल होण्यासाठी, तोवर माहीत नसलेल्या पण अत्यावश्यक अशा दोन दुव्यांची प्राप्ती होते. कोणत्याही स्वरूपाचा बुद्धीला न पटणारा पण सर्वस्वी आपल्या मनातील भावनांच्या आहारी जाऊन, मनात तोवर साठलेल्या रागाला - **ब्रिटिश परंपरा व**

**संस्कृतीनुसार** गोंडस स्वरूप देऊन ब्रिटिश राज्यकर्ते महाराजांवर हल्ला चढवीत होते. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या या कृतीतून दिल्ली दरबारात जे कांही प्रत्यक्ष घडले त्याबद्दल त्यांची प्रतिक्रिया व्यक्त करीत नव्हते. दुसऱ्या कुठल्यातरी घटनांबद्दलचा आपल्या मनातील राग त्यांनी मुलायम शब्दात आविष्कृत केला होता. **डॉ. बॉटमोर** यांनी विशेषकरून महाराजांची त्या 'दिल्ली दरबारातील' वागणूक ही सर्वसामान्यपणे तशी सामान्यच होती असे सूचित केले आहे; त्यामुळेच या अगोदरच्या छेदकात केलेल्या विधानाला पुष्टी मिळते. खरे म्हणजे असे होते की महाराज आपल्या संस्थानात ज्या काही सामाजिक हालचालींच्या व डावपेचाचा अवलंब करीत होते, त्याची ब्रिटिश राज्यकर्त्यांना चांगलीच जाण होती. त्यामुळेच ते चिंताग्रस्त होते. या कारणासाठीच, महाराजांनी उघडपणे केलेल्या एखाद्या राजद्रोह्याच्या कृतीचे निमित्त करून त्यांनी पदच्युत करण्यासाठी ते कमालीचे उत्सुक होते. **कोपलँड** यांनी लिहिलेल्या 'सयाजीराव गायकवाड व राज्यद्रोह' या आपल्या लेखात ब्रिटिश सरकारच्या संतापाचे कारण, प्रामुख्याने जाधव/देशपांडे यांनी केलेला कट हे होते असे प्रतिपादन केलेले आहे. पण पंडिताचा हा युक्तिवाद कसा बरोबर नाही हे येथवरच्या प्रतिपादनातून स्पष्ट झालेले असावे. जाधव/देशपांडे कट (?) ही घटना ही आणखी एका कितीतरी मोठ्या घटनाक्रमाचा भाग होता. तसेच विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात महाराजांनी केलेल्या गनिमी काव्याचा अवलंब करून केलेल्या संघर्षाच्या एकंदर इतिहासाच्या संदर्भात त्या सर्व घटनांचा अर्थ संपूर्णपणे स्पष्ट होतो, वा जाणून घेता येतो. ब्रिटीश राजकर्त्यांची आणखी एक अडचण होती. इ. स. १८५७ चे बंड वा स्वातंत्र्य युद्ध अथवा (कै) प्रा. ग. र. फाटकांनी वर्णिलेली 'शिपाई गर्दी' या इतिहासकालीन घटनेचा ब्रिटिश राज्यकर्त्यांनी फारच धसका घेतला होता. त्याचा परिणाम असा झाला की 'दिल्ली दरबार' या प्रकरणात त्यांना फारच काळजीपूर्वक पावले टाकावी लागत होती. एखादी चुकीची कृती केली तर इ. स. १८५७ सारख्या उठावाला- त्यांनी ती 'शिपाई गर्दी' वाटत नव्हती- आपण प्रोत्साहित केले असे होईल. नेमके तेच त्यांना टाळावयाचे होते. म्हणूनच महाराजांनी पुरस्कारलेला आणि प्रत्यक्ष अंमलात आणलेल्या 'आधुनिक आणि पाश्चिमात्य' सुधारणावर त्यांना उघडपणे प्रत्यक्ष हल्ला करता येत नव्हता. असे होते तरी 'चांगले प्रशासन व राजवट' या संबंधात ब्रिटीश राज्यकर्त्यांनी पुकारलेला जो मोठा आकृतीबंध होता, तोच आपण धोक्यात आणित आहोत असे त्यांनी केलेल्या विरोधातून सिद्ध झाले असते. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या या विचारसरणी-बद्दल महाराजांची अटकळ अचूक अशीच होती. 'दिल्ली दरबारातील तो' प्रसंग घडल्यानंतर आपण ज्याची आजवर वाट पहात होतो, ती संधी आयतीच आपल्या हाती आली आहे असे ब्रिटिश राज्यकर्त्यांना वाटले. निदान ती संधी आपणास प्राप्त झाली आहे असा विश्वास त्यांना वाटत होता. हिंदुस्थानातील ब्रिटीश राजवट ही ज्या कशाचे प्रतिक आहे, हे बादशहा या व्यक्तिकरवी, ते प्रतिक प्रत्यक्ष मानवी रूप धारण करते, असा ब्रिटीश राज्यकर्ते बडेजाव मिरवीत असत. या ठिकाणी ब्रिटिश राज्यकर्ते या 'दिल्ली दरबारचा' उपयोग, ब्रिटिश राज्यकर्ते कशा करता करून घेणार होते, हे ध्यानात घेतले पाहिजे. या प्रसंगाच्या निमित्ताने

दोन अत्यंत महत्त्वाचे धोरणविषयक निर्णय ते जाहीर करणार होते **(एक)** कलकत्ता ही तत्कालीन हिंदुस्थानची राजधानी तेथून हलवून दिल्ली या शहरात हलविण्यात आली होती. **(दोन)** बंगालची जी फाळणी करण्यात आली होती ती रद्दबातल ठरविण्यात आली होती. हे दोन्ही निर्णय ते राज्यकर्ते जाहीर करणार होते. या दोन्ही कारणामुळे बादशहाचा हा जाहीरपणे हा जो 'अपमान' करण्यात आला होता, याला अधिक नाट्यपूर्ण करण्यात आणि तो अतिशयोक्तपणे करण्यात ब्रिटीश राज्यकर्त्यांना फारच मदत झालेली होती.

ते काहीही असो. महाराजांना बदनाम करण्याची शक्ति मर्यादित होती. पण हा प्रसंग अतिशयोक्त स्वरूपात प्रक्षेपित केला जात होता हेच मुळात लक्षणीय आहे. **डॉ. बॉटमोर** यांनी आपल्या लेखात असे नमूद केले आहे की दिल्ली दरबारचा वार्तापट चित्रपटगृहातून ज्यावेळी प्रक्षेपित केला जात होता, तेव्हा प्रेक्षकांनी प्रत्यक्षात 'मूक' स्वरूपातच प्रतिसाद दिला होता. **मँचेस्टर गार्डियन** या ब्रिटिश वृत्तपत्राने याबावत असे म्हटले होते की "सध्या जो वार्तापट प्रक्षेपित केला जात आहे त्याची चर्चा खास वार्ताहाराने केली आहे. त्यात 'राज्यद्रोह' हा तसा नव्हताच" एक मुद्दा या ठिकाणी तितकासा स्पष्ट नाही. प्रेक्षक कोणता वार्तापट बघत होते? महाराज ज्या वार्तापटात होते, तो वार्तापट जर ते पहात असतील तर प्रेक्षकांना हे स्पष्टपणे दिसून आले असते की महाराजांवर करण्यात येणारा 'राजद्रोहा'चा आरोप अतिशयोक्त होता. म्हैसूरचे महाराज ज्यात होते, तो वार्तापट जर ते पहात असतील, तर प्रेक्षकांची 'मूक' प्रतिक्रिया हेच दर्शविते की त्यांचाही निष्कर्ष 'राज्यद्रोहाचा' आरोप हा अतिशयोक्त होता. याचे कारण बादशहा जॉर्ज यांचा भयानक अपमान ज्यामुळे होईल असे त्यांच्या मते म्हैसूरच्या महाराजांनी काहीही केलेले नव्हते. असे जर होते तर बडोद्याच्या महाराजांनी दिल्ली दरबारात केलेल्या वर्तनाबद्दल तोच निष्कर्ष काढावा लागला असता. याचाच अर्थ दरबारातील घटनेमुळे उडालेला गदारोळ आणि त्याला देण्यात असलेला ब्रिटिश राज्यकर्त्यांचा पाठिंबा याची कारणे वेगळीच होती. या सर्वांवरून अशा निर्णयास यावे लागते की विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात महाराजांनी पुरस्कारलेल्या आणि प्रत्यक्ष कार्यवाहीत आणलेल्या सामाजिक सुधारणा हेच त्या ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या प्रक्षोभामागचे कारण होते. त्याच बरोबर केवळ तर्काला अनुसरून असेही प्रतिपादन करता येईल की आरंभीची प्रतिक्रिया समजा ती म्हैसूरच्या महाराजांविरुद्ध होती- तर त्यातून असा निष्कर्ष काढावा लागतो की म्हैसूरच्या महाराजांनी बादशहा जॉर्ज यांच्या समोर केलेले वर्तन बादशहांचा अपमान करणारे होते; (बडोद्याच्या महाराजांनी तशाच प्रकारचे वर्तन केले होते) म्हणून प्रक्षोभ निर्माण झाला. हा निष्कर्ष तर्कशास्त्राच्या नियमाला धरून असला तरी त्या दोन कारणासाठी चुकीचा आहे. **(एक) भोपालच्या बेगम साहेबांनी** म्हैसूरचे महाराज आणि सयाजीराव महाराज यांच्यासारखेच- तंतोतंत तसेच- वर्तन बादशहा जॉर्ज यांच्या समारे दिल्ली दरबारात केले होते. पण त्यामुळे कोठचेही वादळ निर्माण झाले नाही. (दोन) हे अशा प्रकारचे वर्तनच 'राज्यद्रोह' आविष्कृत करते असे जर ब्रिटिश राज्यकर्त्यांना वाटले असते. तर हे दोन-महाराज आणि भोपाळच्या बेगम साहेबा यांच्या विरुद्ध ब्रिटीश सरकारने कृती

करावयास हवी होती, पण प्रत्यक्षात तसे काहीही घडले नाही. एवंच **गोमाँत** कंपनीने तयार केलेल्या वार्तापटात दिसणाऱ्या म्हैसूरचे महाराजाविरुद्ध जी प्रतिक्रिया व्यक्त झाली होती ती बादशहा जॉर्ज यांचा अपमान केला गेला आहे म्हणून नव्हती. परंतु वार्तापटात दिसणारा तो नरेश हे **सयाजीराव महाराज** आहेत अशी कल्पना व त्यानुसार केली जाणारी हाकाटी याचा परिपाक म्हणजे ती प्रतिक्रिया. दिल्ली दरबार भरविण्याअगोदरच महाराजांना पदच्यूत करण्याचे वारे वहात होते. निदान ब्रिटिश राज्यकर्त्यांत तसा एक गट होता. **कोपलँड** या संबंधात पुरावा सादर करताना 'हिंदुस्थानातील ब्रिटिश सरकारने, ग्रेट ब्रिटनच्या सेक्रेटरी ऑफ स्टेट यांना पाठविलेल्या एका खलित्यात म्हटले होते' हिंदुस्थानच्या व्हाईसरॉय साहेबांनी काही वेगळे धोरण पत्करले अथवा **सयाजीराव महाराजांना** पदच्युत करावे अशी सूचना केली ...... त्याहीपेक्षा अधिक कठोर कारवाईची शिफारस करण्यास ......... आपण मागे पुढे पहाता नये ....... हे अशा प्रकारचे धोरण विषयक पाऊल उचलल्यानंतर जी विरोधी टीका होईल ती स्वीकारताना, ऐकताना वा वाचताना आपल्या मनाची शांती ढळू न देता, त्यास सामोरे जाण्याची आपण सिद्धता ठेवली पाहिजे.'

दिल्ली दरबाराचे निमित्त करून महाराजांना पदच्च्युत करण्यात आले नाही हे खरे आहे. पण तो प्रसंग घडलेला असल्याकारणाने ते तसे पेचातच आले होते. बडोदे संस्थानाकडे असलेले अधिकार आणि आपले अधिकार या संबंधात ब्रिटिश सरकारबरोबर वाटाघाटी करताना त्यांना पूर्वी जे स्थान व प्रतिष्ठा होती. ती कमी होण्यात त्याचा परिणाम झाला होता. या बाबतीतील महाराजांची क्षमता अगदी लक्षणीयपणे कमकुवत झाल्याचे दिसून येत होते. महाराजासारख्या आदरणीय आणि लोकप्रिय नरेशाला पदच्युत करण्याची ब्रिटिश राज्यकर्त्यांची इच्छा असली तर ते एकंदर परिस्थितीत शहाणपणाचे ठरणार नाही हे राज्यकर्त्यांना चांगले ज्ञात होते. महाराजांना पदच्युत केल्यास पहिल्या महायुद्धाची छाया पसरत आहे हे स्पष्टपणे दिसत असताना, आपण महाराजांना 'जिवंत हुतात्मा' बनवून टाकू अशी भिती त्यांच्या मनात होती. हे सारे लक्षात घेऊन, गोंधळाची मन:स्थिती असलेल्या आणि आपण कमकुवत झालो आहोत याची योग्य जाण असलेल्या बडोदा नरेशाला त्याच्या गादीवर राहू देणे हे ब्रिटिश राज्यकर्त्यांना पसंत व सुखदायक होते. महाराजांनाही हे चांगले ज्ञात होते की, **आपण बडोदा नरेश या स्थानावरून जर दूर झालो, तर बाहेर राहून आपणास जनतेचे हित पहाता येणार नाही आणि तिच्या भल्यासाठीही काहीही करता येणार नाही.** हे ध्यानात घेऊन ब्रिटीश राज्यकर्त्यांनी केलेली टीका आणि कान-उघाडणी त्यांनी स्विकारली. बडोदे संस्थानच्या गादीवर असलेले **सयाजीराव महाराज** हे आपले स्थान त्यांनी कायम राहील याकडे अधिक लक्ष दिले. मि. निकोल्स या पंडिताने याबाबत काढलेला निष्कर्ष हा मात्र बरोबर आहे. संरजामशाही व्यवस्था धोक्यात येऊ नये, ती धोक्यात आणण्याचा प्रयत्न कोणी केल्यास त्यास प्रतिबंध करावा, या हेतूंने ब्रिटिश सरकार व सयाजीराव महाराज या दोघांनीही या गाजलेल्या प्रकरणाबाबत जास्त आरडा-ओरडा न करता, ते इतिहासजमा होऊ दिले. निदान सयाजीराव महाराजांच्या मनात

'सरंजामशाही व्यवस्था' कायम टिकवून धरण्याचे अजिबात नव्हते. या संबंधीचा उल्लेख या अगोदरच येऊन गेला आहे..ब्रिटिश सरकार व त्यांचा जो संघर्ष होता तो लक्षात घेऊन त्यांनी एक दूरगामी विचार केला होता. म्हणूनच त्या संघर्षही डावपेचाचा एक भाग म्हणून त्यांनी सत्ता स्थानावर रहाण्याचा निर्णय घेतला होता. तसे केल्याने वसाहतवादाची जी कार्यक्रम पत्रिका होती, तिचा प्रतिकार त्यांना चालूच ठेवता येणार होता. एवंच **सयाजीराव महाराजांनी** या प्रकरणात घेतलेला निर्णय आणि व्यक्त केलेली प्रतिक्रिया व्यवहारीच होती.

**४ निष्कर्ष**

बडोदे संस्थानातील सामाजिक सुधारणात अंर्तभूत असलेले आधुनिकीकरण आणि वसाहत विरोधी कार्यक्रम या दोघांची महाराजांनी घातलेली सांगड, या घटनेकडे ब्रिटीश राज्यकर्त्यांचे लक्ष वस्तुत: वेधले गेले होते. महाराजांनी फक्त सामाजिक सुधारणांचा कार्यक्रम हाती घेतला असता, तर राज्यकर्त्यांनी ते फारसे मनावर घेतले नसते. पण महाराज विशिष्ट ध्येय नजरेसमोर ठेऊन हे आधुनिकीकरण करीत आहेत हे जाणण्याइतके ब्रिटीश राज्यकर्ते खासच चतुर होते. महाराज 'आधुनिकीकरणाचा' सातत्याने संदर्भ देत असत. पण त्यातूनच वसाहतवादाची प्रकृती काय आहे आणि वसाहतवादाच्या प्रतिकाराची प्रकृतीही काय असावयास हवी याबद्दल महाराजांची सूक्ष्म व तरल अशी जाण या संदर्भामुळेच उघड होत होती, उदा. इ. स. १९०९ साली वडोदे महाविद्यालयात भाषण करताना महाराजांनी म्हटले होते, "राजकीय अस्वस्थतेची भावना निर्माण होण्याचे एकमेव कारण शिक्षण क्षेत्रातील प्रगती आहे असे म्हटले जाते असे आमच्या काहीवेळा कानावर येते. शिक्षणामुळेच मानवाच्या कल्पना विस्तारित होतात. म्हणूनच समाजात राजकीय अस्वस्थता असणे हे अगदी आवश्यकपणे वाईटच (evil) असते असे नाही. याचे कारण सुशिक्षित व्यक्ती आपल्या मनात आवश्यकपणे अधिक उंचीच्या अपेक्षा निर्माण करणारच. त्या साध्य करण्यासाठी ते धडपड करणार. असे झाले की जी विद्यमान परिस्थिती आहे त्यात असंतोषाची भावना निर्माण होणार हे ओघानेच आले. खरे म्हणजे असे आहे की कोणत्याही प्रकारचा असंतोष समाजात नसणे हे त्या समाजाची इतिश्री होत असल्याचे लक्षण आहे. महाराजांनी याच सुरात शिक्षणाबद्दलची चर्चा आणखी थोडी पुढे नेली. 'आधुनिकता या विचारात सक्रीय असा चांगल्या अवस्थेकडे घेऊन जाणारा सरळ रेषेतील विचार अनुस्यूत असतो. आधुनिकता आत्मसात केलेल्या सामाजिक संस्थामुळे शिक्षणाचा विकास होतो. या विकसित शिक्षणाची निर्मिती व विद्यमान परिस्थितीची (महाराजांना वसाहतवादामुळे निर्माण झालेली परिस्थिती असे सांगायचे आहे) दुर्बिणीखाली घालून केली जाणारी तपासणी ही अगदी आवश्यकपणे, या विकसित शिक्षणाची निर्मिती होती.' हेच बालबोध अशा वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास शिक्षणाचा उपयोग आणि ते कोठच्या ठिकाणी प्रस्तूत आहे हे पहाणे, याचे परिणाम, आणि खुद्द प्रगती कोठच्या दिशेने होते आहे हे पहाणे ही सारी बिगर वसाहतवादी अगर वसाहतवादाशी संबंधीत नसलेली निर्मिती आहे.

ब्रिटीश राज्यकर्त्यांनी 'आधुनिकते'चे धोरण नेटीवानी (देशी लोकांनी) स्विकारावे

यासाठी प्रोत्साहन दिले होते त्या धोरणात कोठच्या गोष्टी अनुस्यूत आहेत हेही सांगितले होते. परंतु नेटीवानी (महाराजांनी) 'आधुनिकता' या संकल्पनेचा 'ताबा' घेतल्यानंतर या संकल्पनेची जी वाटचाल ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या मनात होती, त्याऐवजी या संकल्पनेने अगदी विरुद्ध दिशेने वाटचाल करण्यास सुरुवात केली होती. म्हणजे आधुनिक संस्था ही वसाहतवादाच्या हाती असलेली शस्त्रे वा अवजारे असे वाटणाऱ्या लोकांत नेटीवांचे परिवर्तन झाले होते. तथापि आधुनिकता स्वीकारली आणि तिचा वापर केला याचा अर्थ 'आधुनिकता' ही नेटीवांच्या मालकीची झाली होती असा नव्हता. वसाहतवादी धोरणाची प्रत्यक्ष कार्यवाही करणारे जे कोणी होते, ते वसाहतीतून जाण्याच्या अवस्थेत आल्याचे ते द्योतक होते. एवंच वसाहतवाद या कल्पनेमागचा जो आशय होता त्यात बदल झाला होता. नेटीवांच्या आधुनिकतेने त्या संकल्पनेला अभिप्रेत असलेला कार्यक्रम आपलासा केला होता, आणि आधुनिकतेने कोठच्या दिशेने आगेकूच करावी या बाबत वसाहतवाद्यांचा जो विचार व संकल्पना होती त्याला आव्हान दिले होते. त्याचे असे आहे, बँकेसारखी संस्था, लोकशाही सारखा नवा विचार व कल्पना यांचा उगम कदाचित नेटीवात झाला नसेल, पण त्या इत:पर ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या मालकीच्या राहिल्या नव्हत्या, या स्थळी आणखी एका मुद्दा आवर्जून नमूद केला पाहिजे. वसाहतवादी दृष्टिकोनातून पहाता महाराजांनी पुरस्कारलेल्या सुधारणा विचारात घेण्याच्या लायकीच्या सुद्धा नाहीत या त्यांच्या उपहासी भावनेमागचा मतितार्थ लक्षात घेणे आवश्यक आहे. बडोदे संस्थानातील सुधारणा ही पाश्चिमात्याची नक्कल आहे असे सांगताना त्या सुधारणा पाश्चिमात्यांची नक्कल करणाऱ्या असल्या तरी त्या त्याची सर्वस्वी बरोबरी करीत नाहीत-थोडक्यात त्या बिगर पाश्चिमात्य आहेत असे गर्भितपणे ब्रिटिश राज्यकर्त्यांना सुचवायचे होते. हे त्याचे विचार लक्षात घेतले म्हणजे मग श्री शिल्लक काय रहाते? ब्रिटिश राज्यकर्त्यांकडे एखाद्या कल्पनेची व विचाराची मालकी होती. ती त्यांची मालकी काढून घेतल्यानंतर मूळ मालकाला (ब्रिटिश राज्यकर्त्याला) स्थानभ्रष्ट व्हावे लागते; तसेच या सुधारणा संकल्पनांची व्याप्ती ज्यांनी एखाद्या चौकटीत बंदीस्त करून त्यांची प्रस्थापना केली, तर मग त्या सुधारणांनी आगेकूच कशी करावी याचे अधिकार त्यांच्याकडे सोपविणे क्रमप्राप्त होते. बडोदे संस्थानाबाबत विसाव्या शतकाच्या पहिल्या काही दशकांची विचार करता, त्या आधुनिकीकरणात अनस्यूत असलेल्या सुधारणा कोठच्या दिशेने आगेकूच करणार आहेत, हे **सयाजीराव महाराजांच्या** राष्ट्रवादी विचारसरणीने स्पष्ट शब्दात बंदिस्त केले होते. ब्रिटिश हिंदुस्थानातील राष्ट्रवादी वृत्तपत्रे गट यांचा वारंवार, व भरघोसपणे सातत्याने वृद्धींगत होत जाणारा पाठींबा, दलित वर्गाकडून महाराजांचा होणार स्वीकार आणि त्याजबरोबर बडोदे संस्थानातील प्रजाजनांचे अपरंपार प्रेम हे सारे एकाबाजूला व दुसरीकडे इ. स. १९११ सालच्या दिल्ली दरबारात घडलेल्या घटनेबद्दल राष्ट्रवादी आणि ब्रिटिश राज्यकर्ते या दोघांच्या भिन्न प्रतिक्रिया, हे सर्व लक्षात घेतल्यानंतर आपण महाराजांच्या गनिमी काव्याच्या लढतीबद्दल जो निष्कर्ष काढला तो किती वाजवी आहे हे सिद्ध होते.

---

